# THE BOOK WAS DRENCHED

brown
book

# अमर मरण



सुशील परभूत



किमत ] पुणे [ ४॥ रु

“ए टेल ऑफ् टू सिटीज़” या सुप्रसिद्ध कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

# पुनर्जन्म

. . १ . . . .

“ बरीच जुनी हकीगत आहे ती मिस मॅनेट, फार जुनी म्हणजे काय, म्हटली तर आहे म्हटली तर नाही, पण तशी जुनीच म्हणायची हकीगत म्हटल मी, पण गोष्ट म्हणाना आमच्याच बँकेच्या एका ठेवीदाराची आहे ती गोष्ट फारसा त्रास नसला झाला तुम्हाला तर आत्तांच सांगेन म्हणतों मी. कारण तासुद्धां नसेल झाला तुम्हाला आल्याला ’

‘ तयारी आहे माझी मिस्टर लॉरी तसा कांही त्रास झाला नाहीं मला. हं सांगा ’

‘ आमच्याच अशीलाची आहे ती गोष्ट हो, अशीलच म्हणतों आम्हीं आमच्या लोकांना, एक फ्रेंच गृहस्थ होता तो एक शास्त्रज्ञ, चांगला गाढा विद्वान— म्हणजे काय डॉक्टर ’

“ बोव्हेचे तर नव्हेत ? ”

‘ होय ! बोव्हेचेच डॉक्टर मॅनेटसारखेच —— म्हणजे तुमच्या वडिलांसारखे तेहि गृहस्थ बोव्हेचेच होते आणि तुमच्या वडिलांसारखे तेसुद्धां पॅरिसमध्ये चांगलेच नांवाजलेले होते. माझी व त्यांची ओळखहि तिथलीच. ओळख आपली कामाच्या निमित्तानेच झालेली पण चांगली दाट ओळख. त्या वेळीं मीच प्रतिनिधि होतों म्हणा तिथला आमच्या बँकेचा, आणि तोसुद्धां— ओः ! चांगला वीस वर्षे म्हणाना

“ त्या वेळीं म्हणजे कधी मिस्टर लॉरी ? ’

‘ नव्हे, वीस वर्षांपूर्वीची सांगतों आहे मी हकीगत. त्यांची पत्नी ही इंग्लिश होती. मीहि एक त्यांचा ट्रस्टीच होतों. पुष्कळ फ्रेंच लोकांचे त्यांच्यासारखेच टेलसनच्या बँकेशींच सर्व व्यवहार चालत. असा एक ना दोन कितीतरी लोकांचा ट्रस्टी म्हणून मी काम करीत होतों तेव्हां. पण हे सर्व व्यावहारिक संबंध बरं का मिस मॅनेट. त्यांत ना कांहीं स्नेह की कांही आपुलकी. भावनेबिवनेचा यात कांही संबंध नाहीं. अनेक लोकांशी संबंध येतो असा आमचा. रोजच येतो म्हणा. इथूनतिथून साऱ्याच व्यक्ति आम्हांला सारख्या. अकडून बकडे आणि

बकडून ककडे, असे सारखे फिरत असायचे आम्ही. म्हणजे सांगायच आहे काय मला कीं, आमच्याजवळ भावना हो चीज नाहीं, आम्ही आपले नुसते एक यंत्र. तर काय सांगत होतों मी —"

"पण माझ्याच वडिलाची हकीगत दिसते आहे ही मिस्टर लॉरी; आणि मला तर आत असं वाटत आहे — आपली दृष्टि त्याच्याकडे स्थिरपणें लावीत, ती म्हणाली — "कीं आमच्या बाबांच्या नतर दोनच वर्षांनीं आईहि मला सोडून गेल्यानतर, तुम्हींच मला वाटत मला इकडे इग्लटला घेऊन आलांत. हो, अगदी निक्षून सांगतं आहे माझं मन तसं ' "

त्यांच्या गुडघ्यावर ठेवलेला तिचा तो थरथरणारा नाजुक हात लॉरींनी हळुवारपणें कुरवाळला, आणि मोठ्या प्रेमानं तिला हळुहळू थोपटीत नि मध्येच उजव्या हातानं आपलो हनुवटी चोळीत किंवा आपल्या पाढऱ्या केसांवरून हात फिरवीत, त्यांच्या चेहऱ्याकडे निश्चल दृष्टि लागलेल्या त्या नाजुक चेहऱ्याकडे ते प्रेमळपणें कांहीं वेळ पहात होते.

"होय, मिस मॅनेट, मीच होतों तो आणि आता तुमच्या लक्षात येईल, माझे सर्वांशीं असलेले संबंध कसे नुसते रुपये, आणे, पैचे असतात ते, केवळ व्यवहारापुरते, अधिक कांऽऽहीं नाहीं कारण बघा, अगदीं एकदांसुद्धां त्या नंतर मी तुम्हांला कधीं भेटलों नाहीं छे, एकदांसुद्धां नाहीं ! टेल्मन बॅंकेच्याच देखरेखीखालीं आहांत तुम्ही तेव्हांपासून, आणि मीहि बॅंकेसाठीं अशी देखरेख अनेकांसाठीं करतोंच आहें तेव्हापासून. भा – व – ना ' वेळ कुणाला आहे त्यांच्याशीं खेळायला म्हणा सधिच नाहीं त्याना मुळीं तशी. माझं सारं आयुष्य म्हणजे कोरडे रुपये – आणे – पै, रुपये – आणे – पै —"

आपल्या धंद्याचं असं रूक्ष वर्णन केल्यानंतर फिरून एकदां आपले दोन्ही हात मस्तकावरून फिरवून आपले आधींच चापूनचोपून बसवलेले केस त्यांनीं परत नीट बसवले, आणि तिच्या चेहऱ्याकडे परत आपली दृष्टि लावली.

"तर काय सांगतों मी — तुम्ही म्हणतां, तसं इथपर्यंत आहे खरं साम्य या गोष्टीचं तुमच्या वडीलांशीं. पण आतां मात्र फरक आला हं. तुमचे वडील जर तसे कालवश झाले नसते त्या वेळीं — अं हं, अशा दचकू नका ! किती दचकलांत तुम्ही ! "

किती बावरल्यासारखी दिसत होती आतां ती ' आपल्या दोन्ही हातांनीं

तिनें त्याचें मनगट घट्ट धरलें होतें, आणि आपादमस्तक ती आवेगानें थरथरत होती.

" अं हं — अं हं, असं नाहीं, मिस मॅनेट !" त्यांच्याकडे असहायपणें पहात असलेल्या तिच्याकडे वत्सलतेनें पहात नि तिच्या पाठीवरून प्रेमळपणें हात फिरवीत मवाळीच्या स्वरांत लॉरी म्हणाले. "थोड्या शांत व्हा, मिस मॅनेट— अशा घाबरून जाऊं नका तुम्ही इतक्या — व्यवहाराचा प्रश्न आहे हा. तर काय म्हणत होतों मी —"

पण त्यांच्यावर खिळलेल्या त्या असहाय दृष्टीनें त्यांच्याहि मनांत गोंधळ उडाला होता आणि ते परत बोलण्याचे थोडेसे थांबले. आणि जरा वेळानें फिरून एकदां खाकरून त्यांनीं पुन्हा सुरुवात केली — " म्हणजे सांगायचं काय कीं, डॉक्टर मॅनेट हे जर त्या वेळीं कालवश झाले नसते, ते जर नुसते अचानकपणें कोणालाहि कांहीं पत्ता न लागतां नुसते नाहीसे झाले असते; म्हणजे अदृश्य झाले असते म्हणाना, किंवा कुठे कुणाचा तर्कसुद्धां चालणार नाहीं अशा ठिकाणीं कोणा अज्ञात व्यक्तीच्या असुरी आकसामुळें किंवा सूडाच्या भावनेनें एखाद्या भयंकर तुरुंगाच्या भीषण खोल खड्ड्यांत जिवंतपणींच गाडले गेले असते, आणि तेंहि अनंत काळपर्यंत; आणि त्यांच्या प्रियपत्नीनें त्यांचा नुसता पत्ता कळण्यासाठीं राजेमहाराजे, राण्यामहाराण्या, उमराव, धर्माध्यक्ष आणि झाडून सारे दरबारी मुत्सद्दी यांच्या दीनवाण्या विनवण्या करून आपल्या दांतांच्या कण्या केल्या असत्या, आणि तरीहि त्यांचा कांहींच मुद्दा पत्ता कुणालाहि कळला नसता, तर मिस मॅनेट, मी सांगतों आहे त्या गृहस्थांची गोष्ट म्हणजे तुमच्याच वडिलांचा तो इतिहास झाला असता."

"कृपा करून अधिक स्पष्ट सांगाना, मिस्टर लॉरी."

" होय, होय, तेंच करणार आहे मी. पण मघासारख्या —?"

" नाहीं, नाहीं; अगदी शांतपणें ऐकेन मी सारं. पण असलं हें अर्धवट सत्य नाहीं सोसवणार मला."

" शाबास ! खूप धीरानें बोलतां आहांत तुम्ही हां, असाच धीर पाहिजे. केवळ एक व्यवहाराची गोष्ट आहे ही नुसता व्यवहार म्हणूनच समजा तुम्ही — आणि व्यवहार म्हणजे व्यवहार, तो तसाच उरकला पाहिजे. हं ! तर काय, मोठी

धीराची बाई होती डॉक्टरांची ती पत्नी — मोठीच धीराची. पण इतका विलक्षण मनस्ताप त्या बाईनीं सोसला होता या दुर्दैवी घटनेमुळें, की आपल्या अपत्याला-"

" मुलगी होती नाहीं का ती ? "

" होय, मुलगीच अ ह, गोष्ट आहे ही आपली-अस घाबरायच नाही तुम्ही. तर — इतका मनस्ताप सोसला होता त्यानीं कीं, त्यानी आपल्या मनाचा एक ठाम निश्चय केला की आपल्या मुलीला कांहीं तिच्या पित्याविषयी अशी शंकाकुशंकांच्या नि आशानिराशेच्या वेदनांच्या चटक्यांची झळ म्हणून लागू द्यायची नाहीं तिला असच सांगायच कीं, तिचे वडील कालवशच झाले — अरे, अरे, अशा माझ्या पुढें नका गुढघे टेकू ! माझ्या पुढें कशाला बर अस"

" केवळ सत्यासाठीं. मेहेरबानी करून तें निर्भेळ सत्य मला ऐकू दे !"

" मला असा गोंधळून नका टाकू मिस मॅनेट, माझ काम मला केलच पाहिजे पण मी जर असा गोंधळून गेलों तर माझी जबाबदारी मी कशी पार पाडूं ? कामाच्या वेळीं डोक कस अगदीं लख्ख पाहिजे आणि तुम्हीहि नका अशा बावरून भेदरून जाऊ पाहूं ह, सागा पाहू, नवे नवे किती ते ? म्हणजे समजेल मला, तुम्ही शांत झाला आहांत कीं नाहीं तें ह, बोला !'

त्यांच्या पुढें गुढघे टेंकून बसलेल्या त्या व्यक्तीनें कांहींच उत्तर केलं नाहीं. पण लॅरीनीं हळूच तिला उठवून आपल्या खुर्चीवर बसवल्यानतर आणि तिच्या पाठीवर हळूहळू थोपटल्यानतर तिचाहि गोंधळ व भीति जरा कमी झाली. आणि आपल्या हातांत असलेला तिचा हात आतां तितकासा थरथरत नाहीं असें प हून त्यांनाहि जरा धीर येऊन त्यानां बोलण्यास परत सुरवात केली.

" ह, आतां ठीक ! असाच धीर दाखवा जरा. आपल्याला आपल काम उरकायचं आहे. त्यासाठींच आलो आहांत तुम्ही इथें नाही का ? आणि अति-शय महत्त्वाचं पण आपल्या अगदीं उपयोगी असच काम आहे तें तर, तुमच्या आईन तम ठाम ठरवलं कीं अनिश्चितपणाची ही झळ आपल्या मुलीला कांहीं लागूं द्यायची नाहीं पण तुमच्या पित्याची कांहींतरी बातमी लागावी म्हणून आपल्या प्रयत्नांत खड म्हणून तिनें बिचारीनें पडू दिला नाहीं. भगीरथ प्रयत्न चालले होते तिचे सारखे, पण यश म्हणून कांहीं तिला आल नाहीं. आणि अखे-रीस — दोन वर्षांच्या असाल, मला वाटत त्या वेळीं तुम्ही — झुरून झुरून आणि निराशेनें हाय खाऊन बिचारी मरून गेली आणि तुम्ही हीं गेलीं सोळासतरा

वर्षे आपला पिता तुरुंगांत अजून पिचतो आहे की तिथेंच बिचारा झिजून झिजून मरण पावला, अशा अनिश्चितपणाच्या वेदनांच्या दडपणाखालीं झुरत न राहतां, अज्ञानाच्या सुखांत, अशा लहानाच्या मोठ्या झालात"

परत कांहीं क्षण त्यांचे डोळे त्यांचे समोरील त्या सुवर्णकेशावृत अवनत मस्तकावर स्थिरावले. त्यांचे डोळे जणु काय सोळा वर्षांपूर्वी त्यांनीं जपून इंग्लंडांत आणलेली दोन वर्षांची ती गोजिरवाणी गुबगुबीत बालिकाच त्या ठिकाणीं आता पहात होते.

"तसे कांहीं फार पैसे नव्हते तुमच्या वडिलांचे. आणि जे कांहीं होते ते तुमच्या नि तुमच्या आईच्या नांवानें केले होते. त्याबद्दल कांहीं नवीन माहिती किंवा आणखी कांहीं इस्टेट असल्याचा शोध असा कांहीं आम्हांला लागलेला नाहीं. पण —"

आपल्या हातावरील तिच्या हाताची पकड घट्ट होत आहे असं त्याना वाटलं आणि ते थांबले त्या बालिकेच्या चेहेऱ्यावरील अस्वस्थतेची जागा आतां दारुण वेदना आणि भीति यानीं घेतलेली स्पष्टपणें त्यांना दिसत होती.

"पण आतां त्यांचा — नक्की पत्ता लागला आहे ते जीवत आहेत. खूप बदलले आहेत — अगदीं ओळखू येणार नाहींत, इतके बदलले आहेत ते, अगदीं मरणोन्मुखदेखील असतील, नाहीं कुणी म्हणावं ' पण आपण देवावर भरवसा टाकू या सारा. निदान हयात तरी आहेत ते आत्तां पॅरिसमध्येंच त्यांच्या एका जुन्या नोकराच्या घरीं ठेवलें आहे त्यांना, आणि तिकडेच आपण निघालों आहोंत त्यांना ओळखण्यासाठी म्हणुन मी, आणि त्यांच्या उरल्यासुरल्या जीवनात आपल्या प्रेमाची संजीवनी ओतून तें आनंदपूर्ण करण्यासाठीं, म्हणुन तुम्ही.'

तिचं सर्वांग अतिशय आवेगानें आतां थरथरत होतें, नि त्यानाहि तें समजत होतें स्वप्नांत बोलल्यासारखी, अतिशय हळू पण स्पष्टपणें नि भेदरलेल्या आवाजांत ती बोलत होती. —

"माझे बाबा ' काय दिसणार आहे मला तिथें — माझे बाबा, की त्यांचे भूत!"

"शांत व्हा, शांत व्हा, मिस मॅनेट ! " आपल्या हातानें तिचा हात हळुवारपणें दाबीत लॉरी म्हणाले. "सर्व कांहीं तुम्हांला आतां स्पष्टपणें कळलें आहे-वाईट नि चांगल दोन्हीहि ! त्या दुर्दैवी जीवाकडेच आपण आतां निघालों

आहोंत. आणि थोड्याच तासांचा आपला हा प्रवास नीट पार पडला कीं, त्यांचीच प्रेमळमूर्ति तुम्हांला दिसणार आहे थोडा धीर धरा आतां."

"बाबा — बाबा — माझे बाबा !" त्याच अत्यंत भावविवश आवाजांत पण अतिशय हळू, ती आपल्याशींच पुटपुटत होती.

"एकच राहिलं फक्त आतां," तिचें लक्ष वेधण्यासाठीं आपल्या शब्दांवर थोडा जोर देत लॉरीनीं परत सुरवात केली "कांहीं वेगळ्याच नांवाखालीं त्यांचा पत्ता लागला आहे, त्यांचं खरं नांव विस्मृतींत विरून गेलं किंवा मुद्दाम दडवून ठेवलं, असं कांहींतरी झालं. त्या तपशिलांत शिरण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं. तसंच केवळ बेजबाबदारपणामुळें ते तुरुंगांत झिजत पडले, कीं कोणी त्यांचा दावा साधून त्यांना तिथें मुद्दाम असें यातनांनीं भाजून काढलें, याचाहि तपास करण्यांत आतां अर्थ नाहीं. आणि शिवाय तें आणखी धोक्याचंहि आहे म्हणा — त्या सगळ्यावर आतां पडदा टाकायचा, तें इतिहासांत जमा झालं म्हणून समजायचं आणि निदान कांहीं दिवस तरी कांहींहि करून त्यांना फ्रान्सच्या बाहेर काढून न्यायचं — एवढी प्रख्यात आमची टेलसन बँक आणि मी तिचाच प्रतिनिधि ना, पण त्या गोष्टीचा उच्चार म्हणून नाहीं कधीं करीत आम्ही ! कागदाचं एखादं चिटोरेंसुद्धां त्याबाबतींतलं सांपडायचं नाहीं माझ्याजवळ. आमचा आपला परवलीचा एकच शब्द आहे म्हणाना — पुनर्जन्म. कांहींहि करावा त्याचा अर्थ. अरे, पण हें काय ! कुठेंच लक्ष दिसत नाहीं हिचं, अं ! मिस मॅनेट, मिस मॅनेट !"

जशी खुर्चींत होती तशीच अगदीं निश्चल आणि मूकपणें — पूर्णपणें संज्ञाशून्य अशी ती ताठ बसली होती तिला बाह्य जगाची कसलीच म्हणून जाणीव असल्याचं दिसत नव्हतं त्यांच्या चेहेऱ्याकडे तिच्या डोळ्यांची सारखी टक लागलेली आणि मघांच्या त्याच त्या दारुण वेदना आणि भीति याच्या सुस्पष्ट छटा तिच्या चेहेऱ्यावर कोरल्यासारख्या आतांहि दिसत होत्या त्यांच्या हातावरील तिची पकड इतकी घट्ट होती कीं ती सहज सोडवणंहि त्यांना अशक्य होतं म्हणून आपल्या जागेवरून मुळींसुद्धां न हालतां त्यांनीं मोठ्यानें मदतीसाठीं हांका मारल्या.

पण इतर कोणी आंत येण्यापूर्वी एक राकट पुरुषीबाई पिसाटासारखीच धांवत आंत आली. तिच्याकडे घाईघाईनें केलेल्या एकाच दृष्टिक्षेपांत, त्या लाल

बावळ्याचा भडकपणा लॉरीच्या लक्षांत आला. अंगावरचे सारे कपडेचसे काय पण चेहेरामोहरा नि डोक्यावरचे उत्शृंखल केशगुन्छहि त्या व्यक्तीचे रक्त-वर्णच होते. आंत आल्याबरोबर एखाद्या एडक्याच्या रगेल धडकीसारखाच आपल्या हाताचा लॉरींच्या छातीवर धक्का देऊन तिनें त्यांना दूर केलें, आणि आसनभ्रष्ट होऊन नि आपल्या पायांवर तोल कसाबसा सांवरीत लॉरींची स्वारीहि मागील भिंतीच्या आश्रयानें आपली पुन्छगति कशीबशी थांबवीत असतानांच त्यांच्या मनांत आलें "बाप रे ! काय प्रचंड आहे हें प्रकरण !" आणि तशा स्थितींतहि त्यांना थोडी मौज वाटली

"बघता काय असे मुडद्यासारखे सारे !" आतां आंत आलेल्या नोकरांवर डोळे गरगरवीत तो लाल बावटा कडाडला. "चला निघा सारे आणि घेऊन या काहीं तरी, मुर्दाड मेले बघता रे काय माझ्याकडे ? काय जखीणबिखीण वाटलें का काय तुम्हाला मी ? चला, उलथा इथून लौकर आणि काहीं कांदा बिंदा नि गार पाणी या घेऊन धांवत. नाहीं तर पहा माझ्याशींच गांठ आहे !"

कडक लक्ष्मीच्या त्या कडकडण्याबरोबर धांवतपळतच सारेजण ते ते जिन्नस आणण्यासाठीं खोलीबाहेर पडले. आणि तिनेंहि मग अतिशय हळुवार-पणें त्या मूर्छित बालिकेला आपल्या हातांत अलगद उचलून जवळच्याच कोंचा-वर नेऊन निजविलें, आणि अतिशय कोमलपणें तिच्या संतप्त मस्तकावरून हात फिरवीत, नि तिच्या गळ्याजवळील कपडे सैल करीत, तोंडावर हळुहळू फुंकरीत "माझी बाई ती ! काय झालं माझ्या बाईला !" असं मोठ्या प्रेमळपणें पुटपुटत, तिला सावध करण्याचे प्रयत्न करण्यास सुरुवात केली.

"आणि तुम्ही हो !" लॉरींकडे वळून रागानें डोळे गरगरवीत तिनें विचा-रलें: "ही काय तुमची मेली सांगण्याची रीत कीं काय, इतकी पोरीला अगदीं घाबरून टाकलीत ती ? बघा, बघा आपले प्रताप, कशी प्रेतासारखी पांढरी फटक पडली आहे माझी बाई ती ! आणि म्हणे मी बॅंकर. अहाहा, दिवे ओंवाळा !"

कांहींच उत्तर न देतां गरीब बिचारे लॉरी तिच्याकडे नि त्या मूर्छित बालिके-कडे आळीपाळीनें पहात स्वस्थ उभे होते इतक्या वेळांत नोकरांनीं आंत आण-लेल्या पाण्याच्या आणि स्मेलिंग सॉल्टच्या मदतीनें ती बालिकाहि आतां हळुहळु शुद्धीवर येत होती. आणि ती कडक लक्ष्मीहि तिच्याकडे मोठ्या वत्सलतेनें पहात आपल्या खांद्याशीं तिचें मस्तक धरून तिला हळूहळू थोपटीत बसली होती.

" बर दिसतं आहे आतां नाहीं थोड ?" लॉरीनीं विचारलें.

" पण तुम्ही काय दिवे लावलेत त्यांत ? माझी बाई ती ! "

" मला वाटत, आपणहि मिस मॅनेटबरोबर फ्रान्सला येणार असाल नाही ?" परत एकवार लॉरीनीं जरा थाबून नम्रपणें विचारलें.

" नाहींतर कशाला आलें असतें इथे आदळायला ! " उत्तरादाखल आवाज आला. " काय वाटत तुम्हांला ? "

पण त्याना काय वाटत होत तें सागण्याच्या भरीस न पडता, त्या बालिकेला आतां शात झोंप लागते आहे हें पाहून लॉरीनीं तिथून हळूच काढता पाय घेतला.

---

#### .... २ ....

अगदीं दुकानाच्या दारासमोरच दारूचें तें भलें मोठें पिंप खालीं पडून पार छिन्नविच्छिन्न झालें होतें ! जणू काय इतक्या दिवसांच्या सतत मद्यपानामुळें त्याच्या शरीरात कांहींच त्राण न उरल्यामुळें त्या लहानशा धक्याबरोबर त्याचा हृदयभग झाला होता, आणि आंतील तांबड्या लाल दारूचे प्रवाह त्या फुटक्या पिंपांतून रस्त्यावरील धुरळ्यात मनसोक्त लोळत सैरावैरा वाट फुटेल तसे वहात होते. लहानमोठ्या खडबडीत दगडानींच सारा रस्ता बांधून काढलेला असल्या-मुळें आणि बाजूला गटार मुळींच नसल्यानें सैरावैरा वहाणारे ते मद्यप्रवाह एकदम गुप्त होणें शक्य नव्हतें. तरीहि अचानक लाभलेल्या या सुवर्णसधीचा फायदा घेण्यासाठीं आसमतांतील सारा जनसमर्द आपआपले सारे उद्योगधदे एकदम थांबवून वखवखलेल्या गिधाडांच्या घिसाडघाईनें त्या दुकानाकडे धांवत सुटला होता. खालीं रस्त्यालाच तोंड लावून कांहींनीं तें मद्य प्राशन करण्यास सुरुवात केली होती कांहीं मातीचे लहान लहान बंधारे घालून तयार केलेल्या डबक्यां-तुन तो ओंजळीनें पीत होते आणि आपल्या अर्धांगालाहि त्याचा हिस्सा मुक्त-हस्तें देत होते. कांहींजण डोक्याचे रुमाल सोडून ते त्या डबक्यांत बुडवून आपली व आपल्या मुलाबाळाची तहान ते तोंडांत पिळून भागवीत होते कांहीं एवढेहि दैववान नसलेले, रस्त्यावरील मिळेल तो ओघळ मिटक्या मारीत चाटीत होते, तर कांहीं त्या पिंपाचे दारूत मुरलेले फळ्यांचे तुकडेच अधाशा-

सारखे चाटीत बसले होते. रस्त्याच्या दगडीपणामुळें सांडलेल्या दारूचा एक थेंबहि फुकट जाणे जरी शक्य नव्हते तरीहि अल्पावधींतच त्या बुभुक्षित गिधाडांच्या हल्ल्यापुढें तो रस्ता चाटूनपुसून इतका साफसूफ झाला कीं, पाण्याच्या बालद्या ओतून आणि खराट्यानें घासून सुद्धां तो इतक्या थोड्या काळांत इतका स्वच्छ आणि कोरडा ठणठणीत खास झाला नसता.

मद्यप्राशनाचा हा समारंभ चालला असता, त्या साऱ्या लहानथोरांच्या आरडाओरड्यानें आणि हसण्याखिदळण्यानें कानठळ्या बसण्याइतका तो रस्ता दुमदुमत होता. स्त्रीपुरुष, म्हातारेकोतारे, पोरबाळ अशा झाडून साऱ्या मानवी व्यक्तींनीं कांहीं काळ तिथें नुसता हैदोसदुल्ला घातला होता. पण रस्त्यावर दारूचा एक थेंबहि शिल्लक न राहतां सर्व कांहीं साफ झाल्यानंतर, आस्ते आस्ते त्या कंगालांचा नाच थांबून नेहमींची शांतता परत त्या रस्त्यावर पसरूं लागली. अर्धवट चिरलेल्या ओंडक्यामधील आपली करवत आरकशी परत विम्मेपणें ओढूं लागले; आपले आंखडलेले हाडकुळे हातपाय शेकण्याचें काम अर्धवट सोडून उठलेल्या त्या अस्थिचर्म म्हातारीनें राखेनें विझलेले कोळसे फुलविण्यास कण्हत कुंथत परत सुरुवात केली, आगावर [illegible] पाघरलेले आणि थंडीनें कुडकुडणारे ते दुर्दैवी जीव आपल्या जीर्णशीर्ण घरकुटांच्या तोटक्या उबेंत परत गुप्त झाले आणि तिथें वारमहा नांदणारें तें भयाण शांततेचें साम्राज्य, जसें कांहींच घडलें नाहीं अशा आविर्भावानें त्या सर्व भागावर फिरून एकदा नेहमीसारखें भकासपणें पसरलें.

रस्त्यावर सांडलेल्या त्या तांबड्यालाल दारूनें आपल्या अस्तित्वाच्या खुणा मात्र आतां जिकडे तिकडे पसरून ठेवलेल्या दिसत होत्या. पुष्कळांचे हातपाय-तोंडें, कपडेसुद्धां रक्तलांछित दिसत होते. श्रांत होऊन रस्त्यावरच बैठक मारलेल्या नि तिच्या शुष्क स्तनांना तोंडीत असलेल्या त्या भेसूर बालकाला पाजीत बसलेल्या स्त्रीच्या डोक्याचा रुमालहि आतां तांबडा दिसत होता. अधाशासारखे पिंपाचे तुकडेच चाटीत बसलेल्या कित्येकांची तोंडें रक्तालिप्त व्याघ्रमुखासारखी भयंकर दिसत होतीं. आणि एकानें तर तेवढ्यांतच त्या लाल चिखलांत आपलीं बोटें बुडवून जवळच्याच भिंतीवर तो भीषण शब्द मोठ्या अक्षरांत लिहिला — र क्त.

होय, तोहि काळ आता लौकरच येणार होता. त्या लालभडक दारूनें ते

रस्ते असेच परत शिंपले जाणार होते — आणि आत्तांसारखींच अनेकांची शरीरें त्याच लाल रंगानें अशींच भेसूरपणें रंगलीं जाणार होतीं !

पण आत्तांची ही क्षणिक गजबज सोडली तर सेंट अॅटॉईनवर — पॅरिसच्या या उपनगरावर — भकास औदासीन्याचे काळे कुट्ट ढग आकाश झांकोळून नेहमीं नांदत असायचे आणि औदासीन्याच्या या कृष्णवर्ण मेघांची छाया प्रतिदिनीं उलट अधिकच उग्र भीषण मात्र होत चालली होती. दु ख, दारिद्र्य, उपासमार, रोगराई, दैन्य, औदासीन्य या साऱ्या मृत्युदेवतेच्या भूतगणांचें एकजिनसी अधिराज्य या साऱ्या उपनगरावर नेहमींच अविच्छिन्नपणें चाललेलें असे. जिकडे पहावें तिकडे प्रत्येक सजीवनिर्जीव वस्तुमात्रावर उपासमारीचा भेसूर छाप ठळकपणें मारलेला कोणालाहि दिसून येई उपासमारीच्या या दारुण पिळवणकीं-तून लहानथोर, बालवृद्ध, स्त्रीपुरुष कोणी कोणींच सुटलेलें दिसत नव्हतें ! जिकडे पहावें तिकडे अकालीं करपलेले असे असंख्य जीव फाटक्यातुटक्या चिंध्यांनीं कसेंबसें देहरक्षण करीत, कडक थडीच्या प्रखर प्रहारांनीं घायाळ होत, आपलें असंतुष्ट खुरटलेलें जीवन घटकापळांनीं घालवीत होते. तीव्र असमाधानाचे, असंतोषाचे, जळजळीत स्फुलिंग, जीवावर उदार होऊन मागें उलटलेल्या एखाद्या हिंस्र पशूसारखे, कांहींच्या अन करणांत फुलून डोळ्यांवाटे आपली चमक मधून मधून स्फुट अस्फुटपणें व्यक्त केल्यावांचून मात्र कधींकधीं रहात नसत. रात्रीच्या भयाण गड्द काळोखांत, मधूनच उच खांबावर लटकून काळो-खाची भेसूरता अधिकच वाढविणाऱ्या कंदीलाकडे दृष्टि जातांच, कांहींच्या डोळ्यांपुढें त्या ठिकाणीं दंडपशाहीच्या भीषण गिरणीत साऱ्यांना भरडून काढणाऱ्या–संपत्तीच्या नि अधिकाराच्या मदानें उन्मत्त झालेल्या उच्चवर्गीयांची नाजुक मुंडकीं लटकत असताना, आजहि दिसत होतीं. पण तो काळ अजून यावयाचा होता. त्या भीषण आगामी वादळाचा चालू झालेला अस्फुट पायरव, फाटक्यातुटक्या चिंध्यांनीं झांकलेल्या, खंगलेल्या, जीर्णगात्रांत आशेचा सुखद उबारा उत्पन्न करीत होता पण उंच उंच हवेल्यांतून आणि भव्य राजप्रासादा-तून वागडत असलेल्या चटोल लक्ष्मीपुत्रांच्या कानावर मात्र अजून तो मुळींच जाऊं शकत नव्हता.

मॉ. डेफार्जचें तें दारूचें दुकान रस्त्याच्या अगदीं कोपऱ्यावरच बांधलेलें होतें. आसपासच्या इमारतींच्या मानानें तें दिसतांहि होतें सुस्थितींत. आंगांत

एक पिवळसर कुडतें आणि कमरेला एक हिरवी विजार अडकवून, दारूच्या एकेका थेंबासाठीं चाललेल्या समोरील धांवपळीकडे पहात तो स्वस्थपणें उभा होता. " माझी कांहींच चूक नाहीं यांत, " मधेंच आपले खांदे उडवून तो म्हणाला, " तो गाडीवानच जबाबदार आहे त्याला. हव असलं तर आणतील दुसरं; आपल्याला काय."

इतक्यात त्याची दृष्टि भिंतीवर तीं रक्ताक्षरें लिहीत असलेल्या व्यक्तीकडे जाऊन तो ओरडला, " काय रे जॅसपर्ड, काय वेड लागलय काय तुला ? काय चाललय काय तुझं ? " आणि दुकानाखालीं उतरून चारदोन पावलं टाकून तो त्या भिंतीजवळ गेला आणि खालचा थोडा चिखल घेऊन त्यानें तीं अक्षरें पार पुसून टाकलीं. " इथें हें भर रस्त्यांत रे कशाला ? दुसरं कांहीं ठिकाणच नाहीं का रे हें असल लिहून ठेवायला ? " तो म्हणाला आणि आपले चिखलानें भरलेले हात जॅसपर्डच्याच कपड्यांना पुसून त्वरेपणें पावलें टाकीत परत आपल्या दुकानांत शिरला.

मॅडम डेफार्ज, त्याचें अर्धांग, नेहमींसारखेंच दुकानातील काउटरच्या मागें बसली होती. त्या दोघां पतिपत्नींच्या प्रशस्त, कणखर शरीराकडे दृष्टि जातांच अगदीं एकमेकासाठींच विधात्यानें त्याना खास घडलें असलें पाहिजे, असंच कोणीहि म्हणाला असता. धिप्पाड शरीर, राकट चेहेरा, मस्तवाल गर्दन, पोलादी मनगट, जहरी खुनी डोळे या सर्वच बाबतींत त्यांचें एकमेकाशीं पूर्ण साम्य होतें. बाईच्या भल्या सपाट्या हातात जाडजूड चांदीच्या आगळ्या दिसत होत्या. गळ्याभोंवती आणि डोक्यावरहि लाल मफलर गुंडाळला होता. पण कानांतील मोठ्या बाळ्या मात्र काळजीपूर्वक त्यानीं अनावृत्तच ठेवल्या होत्या बाईंना आवाज आणि वर्तन नेहमींच हुकमी असें असायचें. एखाद्या अधिष्ठात्री देवतेसारख्याच त्या आपल्या हातांतील विणकामावर सारखी दृष्टि लावून काउंटरवर बसलेल्या असत आत्तां मात्र त्यांचे यजमान आंत आले, त्या वेळीं त्यांचा हात चांदीच्या दातकोरण्यानें आपल्या हस्तिदती बत्तिशीची साफसुफी करण्यांत गुतला होता. मॉ. डेफार्ज आत आल्याबरोबर बाई आपलें काम न थांबवतांच नुसतें खांकरल्या आणि आपल्या भरदार काळ्या भुवया उचावून त्यानीं त्याच्याकडे पाहून डोळ्यांनीं, कोणी नवीन गिऱ्हाईक आंत आलें आहे कीं काय तें पहाण्यास त्याला सूचना दिली.

त्या परिचित सूचनेप्रमाणें डेफर्जेने आपले गरगरीत डोळे साऱ्या दुकानावरून फिरवले. तिकडे कोपऱ्यांत एक स्थूल मोठेसे गृहस्थ आणि एक तरुण बालिका बसलेली त्याच्या दृष्टीस पडली इतर सर्व किती वेळापासून तसेच दुकानांत बसलेले होते. त्या कोपऱ्याकडे दृष्टि जाताच आपल्याकडे पाहून त्या प्रौढानें त्या बालिकेस कांहीं खूण केल्याचेंहि त्याच्या दृष्टीस पडलें.

"हे कोण आले आहेत नवीन शिष्ट?" डेफार्ज आपल्याशींच पुटपुटला; "माझ्या तर कांहीं कोणी ओळखीचे दिसत नाहींत."

पण आपण जणू काय त्या दोन नवागत अपरिचितांना पाहिलेंच नाही अशा आविर्भावानें काउटर जवळच उभ्या असलेल्या तीन गिऱ्हाइकांबरोबर त्यानें बोलण्यास सुरुवात केली.

"मग कसे काय आहे जॅकस?" त्या त्रिमूर्तीपैकीं एकानें डेफार्जला विचारलें. "सांडलेली दारू सगळी चाटून पुसून साफ झाली कीं नाहीं?"

"अरे अगदीं थेंबन् थेंब जॅकस," डेफार्जनें उत्तर दिलें.

त्या व्यक्तीच्या या नाम निर्देशाबरोबर मॅडम डेफार्ज दात कोरीत असताच एकवार हळूच खाकरली आणि तिनें आपल्या भुवया किंचित् वर उडवल्या.

"मला वाटतं किती तरी वर्षांत असली मेजवानी त्यांना मिळाली नसेल" त्या त्रिमूर्तीपैकीं दुसरी व्यक्ती उद्गारली "नुसती कोरडी भाकर नि यातनाच यायच्या यांच्या नेहमीं वांट्याला. नाहीं जॅकस?"

"असं खरं, जॅकस" डेफार्जनें प्रत्युत्तर दिलें.

परत एकदा झालेल्या या व्यक्ति नामोच्चारानें डेफार्जबाईना दांत कोरीत कोरीतच आपल्या भुवया उंचावीत खाकरल्यासारखें केलें.

"हं! गरीब बिचारे!" हातांतील ग्लास खालीं ठेवीत नि ओठ चाटीत त्या त्रिमूर्तीतील तिसरा उद्गारला "नेहमींच बिचाऱ्यांचीं तोंड अशीं कडवट-लेलीं असायचीं आणि कसे तरी दिवस कंठीत असायचे बिचारे, नाही जॅकस?"

"बरोबर आहे तुम म्हणणं जॅकस." डेफार्जकडून उत्तर आलें.

त्याच विशेषनामाचा ह्या तिसऱ्या वेळेला झालेल्या उच्चाराबरोबर हातातील दातकोरणं खालीं ठेऊन मॅडम डेफार्जनें आपल्या भवया उंचावल्या आणि बसल्याच जागेवर ती थोडी अस्वस्थपणें चुळबुळली.

"अगदी बरोबर !" तिचे यजमान पुटपुटले "सद्गृहस्थ हो, या आमच्या मालकीणबाई !"

त्या तीनहि व्यक्तींनी मस्तकावरून आपल्या टोप्या काढून त्याना मोठ्या नम्रपणें अभिवादन केलें डेफार्जबाईनींहि चटकन त्याच्याकडे एकवार दृष्टिक्षेप करून नि आपलें मस्तक किंचित झुकवून त्याचा स्वीकार केला आपल्या सभोंवार मग सहज पाहिल्यासारखें करून त्यांनीं आपलें विणकाम उचललें आणि त्यांत त्या पूर्ववत शांतपणें गढून गेल्या

"वर तर, राम राम मडळी" आपल्या पत्नीवरून आपली दृष्टी न काढतांच डेफार्ज म्हणाला "तुम्हाला हवी असलेली ती खोली वर पांचव्या मजल्यावर आहे. इकडे डावीकडेच आहे वर जायचा जिना, तिकडून अगणांतून अं, पण तुमच्यांतील एकाला माहीतच आहे कीं तो मग काय ? राम राम, तर मडळी"

आपले पैसे चुकते करून ते तिघेहि जिन्याकडे वळले डेफार्ज अजून तसाच आपल्या पत्नीकडे पहात उभा होता इतक्यात त्या कोपऱ्यातील प्रौढानें पुढें येऊन त्याला जरा बाजूला बोलाविलें

'काय हुकूम साहेब ?' त्याच्याबरोबर जात डेफार्ज म्हणाला

दोन चार मिनिटेंच त्याच हळहळू संभाषण चाललें होतें. मधेंच एकदां डेफार्ज एकदम चमकला आणि त्यानें आपले कान नीट टवकारले, आणि एक दोन सेकदांतच तो बाहेर पडला. तो प्रौढ गृहस्थ आणि त्यानें खुणावतांच ती तरूण बालिकाहि त्याच्या मागोमागच बाहेर पडली. मॅडम डेफार्ज मात्र आपण जस काहींच पाहिलें नाहीं अशा आविर्भावानें अगदीं शांतपणें हातातील विण कामाच्या सुया चपळाईनें चालवीत होत्या

त्याच्यापुढे चार दोन मिनिटेंच त्या त्रिमूर्ती वर गेलेल्या जिन्याजवळ तीं तिघोहि येऊन पोंचलीं अधाऱ्या बोळकडींतील अधाऱ्या जिन्याच्या पायरीजवळच खाली गुढघे टेकून आपल्या जुन्या धन्याच्या कन्येला डेफार्जनें अभिवादन केलें, आणि तिचा हात आपल्या ओठाशी नेला. पण त्याच्या या सर्व कृतींत मार्दव म्हणून कुठेंच दिसून येत नव्हतें. उलट त्याच्या डोळयांतील जहरी लहरींना भरती आल्यासारखी मात्र आता दिसत होती.

"जरा सावकाश ह, पायऱ्या जरा उंच आहेत." तो राकट आवाजांत पुटपुटला.

" एकटेच आहेत का ते आंत ?" लॉरीनी विचारलें.

"एकटेच! तर दुसर कोण असणार तिथें?" पहिल्याच आवाजांत उत्तर आलें.

" पुष्कळ बदलले आहेत नाहीं ते ? "

" हां ! " आपल्या हाताची मूठ भितीवर जोरानें आदळून डेफार्ज उद्गारला. लॉरींचें अत करण मात्र त्या उत्तरानें अधिकच जड झालें.

सभोंवार पसरलेल्या घाणीच्या कुबट ऊग्र दर्पामुळें आणि जिन्याच्या चढेपणामुळें धापा टाकीत, मधूनच घाण असह्य होऊन आपला श्वास कोंडून धरीत लॉरी आणि मिस मॅनेट आपला प्रवास मोठ्या कष्टानें करीत होतीं मृत्युलोकापलीकडे असलेल्या नरकवासाचा हा छोटासा नमुनाच जणुं तीं दोघें आत्तां अनुभवीत होतीं. परतु या सर्व नरकवासातून कार्यसिद्धीच्या आशेनें जाणें त्यांना आज भागच होत त्यांचा वाटाड्या त्यांच्या पुढें निमूटपणेंच चालला होता आणि तीं दोघेंहि आपल्याच खेदजड विचारांत चूर होऊन कशीबशीं त्याच्या मागोमाग जात होतीं पण त्यांच्या सुदेवानें अखेरीस त्यांना शेवटचा टप्पा गांठला आणि डेफार्जनें आपल्या कोटातील किल्ली बाहेर काढून ती हातांत घेतली.

"म्हणजे असच बद असत कीं काय दार नेहमीं ?" लॉरीनीं विचारलें.

"अर्थातच," डेफार्जचें ताठर उत्तर आलें

" इतकी आवश्यकता वाटते तुम्हाला यानी ?"

" अस तर खर."

" कां बर ?"

" कां ? इतकी वर्षं कडीकुलुपांत राहिले आहेत ते असे, की दार जर उघड टाकलं खोलीच तर भीतीनें त्यांच्या जीवाच काय होईल याची मला कल्पनाहि करवत नाहीं. चला, पुढें."

अतिशय हळू आवाजांत चाललेल्या त्यांच्या या सभाषणांतील एक अक्षरहि त्या तरुणीच्या कानांत शिरलें नव्हतें मनांत उसळलेल्या असंख्य विचारांच्या नि भावनांच्या काहूरानें आणि भयद शका कुशकांच्या वेदनांनीं ती बिचारी अगदीं हतबल होऊन गेली होती. आणि लॉरींच्या लक्षांत तिची ही अवस्था

येऊन तिचा हात त्यांना जर घट्ट पकडला नसता तर ती बिचारी केव्हांच खालीं कोसळलीहि असती.

"धीर धरा, धीर धरा आता, मिस मॅनेट ' एक दोन क्षणांचा हा ताण जरा सहन करा कीं मग तुमच्याच हातांत आहे सारं, हें विसरूं नका. हं चला ' " तिला धीर देत लॉरी म्हणाले, आणि तिला आपल्या हाताचा आधार देत ते पुढें चालू लागले

आणखी एकदोन वाकणें घेतल्यानतर एका लहान खोलीजवळ तीं येऊन पोंचलीं. डेफार्जनें आपल्या हाताची खूण करून मागील दोघाना थोडें थांबविलें आणि दाराच्या फटीतून एक दोनदां नीट डोकाऊन पाहून दारावर टक् टक् असा आवाज केला. मग अतिशय सथपणें हातांतील किल्ली कुलुपाला लाऊन तितक्याच सथपणें त्यानें खोलीचें दार उघडलें, आणि आंत डोकाऊन तो काहीं तरी पुटपुटला. क्षीण आवाजात तसच एक पुटपुटणें उत्तरादाखल आलें आणि डेफार्जनें मागें वळून लॉरींना आत जाण्यास खुणावलें. लॉरींना मिस मॅनेटकडे दृष्टिक्षेप केला, पण भावनाच्या प्रबळ आवेगानें तिची शरीरयष्टी आपाद मस्तक थरथरत होती. लॉरींनी आपला हात तिच्या कमरेभोंवती लपेटून तिला घट्ट धरून उभे केलें "अस काय मिस मॅनेट, असा धीर नका सोडू आतां ! चला, आंत चला." तिची ती अनुकपनीय अवस्था पाहून स्वत च गहिवरून लॉरी म्हणाले.

"मला नाही धीर होत; भीति वाटते आहे मला." सर्वांग शहारत ती म्हणाली.

"अ ह ! अस नाहीं आतां भिऊन चालणार आपल्याला." तिला धीर देत लॉरी म्हणाले, आणि तिच्या कमरेभोंवतालची हाताची पकड घट्ट करून त्यांनीं तिला हळुवारपणें जवळ जवळ उचलूनच खोलीच्या आंत ठेवलें.

डेफार्जनें परत एकदा किल्ली बाहेर काढून दार आंतून बद केलें आणि किल्ली आपल्या हातात धरली. या सर्व क्रिया शक्य तितक्या धसमुसळेपणानें मोठ्यानें आवाज करीत तो उरकीत होता. आणि मग ताठरपणें सावकाश पाउलें टाकीत तो खिडकीजवळ गेला आणि भिंतीला पाठ टेकून स्वस्थपणें उभा राहिला.

खोली कसली ती, लाकूडफाटा आंत ठेवण्यासाठीं तयार केलेला खोलीवजा एक ठेंगणा नि अधारा माळा होता तो. डेफार्ज आत्तां उभा असलेल्या खिड-

कोंतूनच काय येईल तितकाच आंतला उजेड. त्या अधाऱ्या उजेडाला नेहमीं सरावलेल्या माणसालाच काय ते कांहींहि काम करायला तिथें आत दिसलें असतें. पण आत्ताहि आंत कोणीतरी दाराकडे पाठ करून नि खिडकीकडे तोंड करून काम करीत होतें पांढऱ्या शुभ्र केशांनें आच्छादलेल्या मस्तकाचें कोणी तरी, एका ठेंगण्या बांकावर खालीं वांकून जोडे शिवण्याचें काम अगदीं एक-तानतेनें करीत बसलें होतें.

---

.. ३ . .

" गुड डे ! " खालीं हातांतील जोड्यावर दृष्टी लावलेल्या त्या वृद्धास उद्देशून डेफार्ज उद्गारला.

एक क्षणभरच तें वृद्ध मस्तक वर उचललें गेलें आणि अतिशय दूर अतरा-वरून वहात आल्यासारख्या अस्पष्ट हळू आवाजात त्या अभिवादनाचा स्वीकार झाला—

" गुड डे ! "

" आज अजूनही चालल आहे काम ? "

बऱ्याच वेळाच्या स्तब्धतेनंतर तें मस्तक परत एक क्षणभर वर उचललें गेलें नि त्याच आवाजात उत्तर आलें, " होय चालल आहे " या वेळेस मात्र खोल गेलेले दोन डोळे डेफार्जवर जरा स्थिरावले आणि परत ते पूर्ववत् खालीं आपल्या कामावर खिळले.

त्या व्यक्तीच्या आवाजांतील ती क्षीणता कांहीं विलक्षण भीतिदायक नि हृदय हलविणारी अशी होती अशक्तपणा नि तुरुगवासाचा जरी त्यांत काही भाग असला तरी अनेक वर्षांच्या एकांतवासाचा आणि सक्तीच्या मोनाचा तो दारुण परिपाक होता. कितीतरी दूरवरच्या काळांत उच्चारल्या गेलेल्या शब्दाच्या प्रतिध्वनींच्या अखेरच्या क्षीण अस्पष्ट लाटेसारखा, तो दुर्बल वाटे आणि मानवी आवाजांतील चैतन्य नि अनुरणन त्यांतून कायमचंच लुप्त होऊन गेल होत. एकेकाळच्या सुंदर मोहक गुलाबी रगाच तें जणु आता एक विटकं झालेलं जुनेर होत. खालून खोल थडग्यांतून उठणाऱ्या आवाजासारखाच तो दबल्या-

सारखा, गुदमरल्यासारखा आतां कानांना वाटे. आणि ओसाड वाळवंटांत उपासमारीनें तडफडून प्राण सोडणाऱ्या एखाद्या निराश जीवाच्या अखेरच्या आर्त नादासारखी त्याला आलेली केंविलवाणी धार कानांना असह्य होई.

तसेंच आणखी कांहीं क्षण मूकपणें त्या वृद्धाचें काम चाललें होतें. फिरून एकदां तीच क्षीण दृष्टि डेफार्जच्या चेहेऱ्याकडे शून्यपणें लागली. जणु काय खिडकी-जवळ उभ्या असलेल्या त्या मानवी व्यक्तीचें ती विमनस्कपणें मशोधन करीत होती.

"थोडासा अधिक उजेड करणार आहे मी इथें," त्या वृद्धावरून आपली दृष्टि न चाळवतां डेफार्ज म्हणाला; "चालेलना?"

त्या वृद्धानें आपलें काम थांबवून शून्यपणें आपल्या आजुबाजूला नजर फिर-वली आणि मग वर डेफार्जवर आपली दृष्टि लावली.

"काय म्हटलत?"

"थोडा अधिक उजेड चालेल ना?"

"चालवलाच पाहिजे चालवून मला." पहिल्या शब्दावर थोडा जोर देत उत्तर आल.

अर्धवट उघडलेलें दार आतां पूर्णपणें उघडलें गेलें आणि प्रकाशाचा पूर्ण स्रोत आत पसरला त्या वृद्धाची आकृति आता स्पष्टपणें दिसु लागली त्याच्या मांडीवर एक अर्धवट शिवलेला शु पडला होता आणि आसपास चामड्याचे तुकडे आणि हत्यारें पसरलीं होतीं त्याची पांढरी शुभ्र दाढी आणि डोक्याचे लांब केस विस्कळीतपणें पसरले होते चेहेरा खोल खगलेला, पण त्याच खोल-पणामुळे खूप मोठे दिसणारे नि अजून काळयाभोर असलेल्या भुवयांखालील डोळे मात्र, विलक्षण चमक दाखवीत होते आगांतील फाटक्या विटक्या कप-ड्यांतून त्याचें जीर्ण शीर्ण शरीर दृष्टीस पडत होतें; आणि त्याच्या साऱ्या कप-ड्यांवर, शरीरावर नि कातडीवर ही जीर्णपणाची दैन्यवाणी एकच छटा मुक्तपणें वावरतांना दिसत होती. त्यानें आपला एक हात त्या डोळे दिपवणाऱ्या प्रकाश स्रोताच्या आड धरला होता किती क्षीण, झिजलेला दिसत होता तो! आपलें काम थांबवून अगदीच तो समोर निश्चलपणे पण शून्यपणें पहात स्वस्थ बसला होता आपल्या आजूबाजूला दृष्टिक्षेप केल्यावांचून तो कोणाकडे पहात नव्हता. जणु काय त्या परिचित वस्तूंकडे दृष्टि टाकून आपण जाग्यावरच आहोंत याचीच

तो प्रत्येक वेळीं खात्री करून घेई. पण त्याच्या तोंडांतून मात्र अजून कसलाच उच्चार होत नव्हता.

" आजच करणार काय तुम्ही हा शू पुरा ? " लॉरीना पुढें येण्यास खुणाऊन डेफार्जनें विचारलें.

" काय म्हटलंत ? "

" आजच करणार का तो शू पुरा ? "

" असं नव्हे. पण तसच मला वाटतं. पण कोण जाणे. "

पण त्या प्रश्नानें आपल्या कामाची त्याला आठवण होऊन त्यानें परत टाके घालण्यास सुरवात केली

मिस मॅनेटला दाराजवळच ठेऊन लॉरी पुढें येऊन डेफार्जजवळच उभे राहिले. एकदोन मिनिटांनीं त्या वृद्धानें वर त्यांच्याकडे पाहिलें. त्या दुसऱ्या व्यक्तीच्या आगमनानें त्याला कांहीच वाटल्याचें दिसलें नाहीं त्यानें फक्त आपला थरथरणारा हात उचलून ओठाजवळ एकदां नेला आणि तो परत खालीं करून स्वस्थपणें आपल्या कामाला पुन्हा सुरवात केली. एक क्षणही त्याच्या या हालचालीला लागला नसेल.

" तुमच्याकडे आले आहेत हे, पाहिलेत ? " डेफार्जनें विचारलें.

" काय म्हटलंत ? "

" हे एक पाहुणे आले आहेत."

आपला हात न थांबवताच त्या वृद्धानें नुसतें एकदां वर पाहिलें.

" हें पहा, या गृहस्थांना चांगली पारख आहे या कामाची." डेफार्ज म्हणाला. " हातांतला तो शू दाखवा त्यांना. ह, बघा हो, आणि कोणत्या जातीचा हा शू आहे हें सांगाल का या पाहुण्यांना ? "

" बायकाचा शू आहे तो. अगदीं आजच्याच फॅशनचा आहे तो. मी कांहीं प्रत्यक्ष पाहिलेला नाहीं पण हा एक नमुना आहे आपला." लॉरींच्या हातां-तील शूकडे अभिमानानें पहात तो वृद्ध म्हणाला.

" आणि याच्या मेकरचं काय नाव ? " डेफार्जनें विचारलें

आतां हातांत कांहीं नसल्यानें त्या वृद्धानें आपली उजवी मूठ एकदोन क्षण डाव्या हातावर ठेवली, मग डावी उजव्यावर ठेवली नि मग आपला हात एकदां दाढीवरून फिरवला. आणि कांहीं वेळ एक क्षणहि मध्यें न थांबतां

त्याच्या हातांचा हा चाळा चालू राहिला. एकदां उत्तर केल्यानंतर असाच तो नेहमीं स्वप्नांत वावरल्यासारखा शून्यांत विलीन होई आणि आपल्या या गाढ तंद्रींतून तो लौकर भानावरहि येत नसे.

" माझं नांव विचारलत तुम्ही ? "

" हो, हो."

" नंबर एकशेंपांच, नॉर्थ टॉवर."

" एवढच ? "

' नंबर एकशेंपांच, नॉर्थ टॉवर."

आणि एक क्षीण सुसकारा टाकून त्यानें कामाला सुरवात केली.

" तुमचा कांहीं धंदा नव्हे हा ? " लॉरींनीं त्यांच्याकडे निश्चलपणें पहात विचारलें.

त्या वृद्धानें आपले खोल गेलेले डोळे मदतीच्या आशेनें डेफार्जवर लावले. पण तसें कांहींच न झाल्यानें एकवार जमिनीकडे पाहून त्यानें लॉरींकडे आपली दृष्टि वळवली.

" धंदा नाहीं माझा हा ? हां, नाहीं, माझा कांही तो धंदा नाही. पण—मी शिकलों तो इथें, माझा मीच परवानगीच मागितली — "

परत तो थांबला नि हाताच्या मुठी चाळविण्याचा त्याचा चाळा कांही क्षण पुन्हा चालू झाला, डोळे भकासपणें कोठें तरी पाहू लागले. पण अखेरीस जरा वेळानें त्याची दृष्टि लॉरींच्या मुखावर खिळली, आणि तो एकदम चमकला. झोंपेंतून जागा झाल्यासारखी त्यानें बोलण्यास परत सुरवात केली

" परवानगीच मागितली मी तशी आणि मग खूप दिवसांनीं ती एकदांची मिळाली तेव्हांपासून चालल आहे हें माझ."

लॉरींच्या हातून तो शू घेण्यासाठीं त्यानें आपला हात त्यांच्या पुढें केला. लॉरी तसेच निश्चलपणें त्याच्या चेहेऱ्यावर दृष्टि लावून उभे होते.

" मॉ. मॅनेट, माझी नाहीं ओळख पटत आपल्याला ? "

त्या वृद्धाच्या हातांतून तो शू खालीं गळून पडला आणि तो लॉरींकडे स्थिर दृष्टीनें पहात स्वस्थ राहिला.

" मॉ. मॅनेट " — डेफार्जच्या खांद्यावर हात ठेवीत लॉरी म्हणाले – " हाहि माणूस नाहीं तुम्हांला ओळखत ? पहा, नीट पहा त्याच्याकडे आणि इकडे

माझ्याकडे हे बघा. कोणी जुना परिचित बॅंकर, बॅंकेचं कांहीं कामकाज, कोणी जुना नोकर, जुना काळ कांहीं कांहीं नाहीं आठवत तुम्हांला, मॉ. मॅनेट ?"

अनेक वर्षांचा तो वृद्ध बंदी त्या दोघांच्या चेहेऱ्यांकडे आळीपाळीनें टक लावून पहात स्वस्थ बसला होता. त्याच्या विशाल भालप्रदेशावर होत असलेल्या सूक्ष्म हालचालींवरून विस्मृतींच्या घनदाट कुंद धुक्यांतून बाहेर पडण्यास धडपडत असलेल्या प्रकाश किरणांसारखी, स्मृतीची कांहींतरी जागृति चिन्हें आता कोणालाहि दिसली असतों. आणि त्याच तऱ्हेची काहींतरी विलक्षण मनःक्षोभाची चाललेली खळबळ, दाराजवळ उभ्या असलेल्या त्या तरुणीच्या चेहेऱ्यावरहि आतां जणूं काय सवादी स्वरांसारखी उमटलेली दिसत होती. किती तरी वेळां त्या वृद्धाकडे तळमळून सारखी दृष्टि लागली असतां तिचे हात आतुरतेनें त्याला आपल्या हृदयाशीं घट्ट धरून कुरवाळण्यासाठीं पुढेंमागें होत होते, आणि ओंठ अधीरपणें त्यांना हांक मारण्यासाठीं सारखे फुरफुरत होते.

पण त्या वृद्धाच्या भालप्रदेशावर विस्मृतीची कृष्णछाया परत एकदा पूर्णपणें पसरली त्याचे डोळे आता शून्यपणे त्या दोघांच्या चेहेऱ्याकडे आळीपाळीनें पहात, आस्ते आस्ते आपल्या हातांतील कामावर पुन्हा पूर्ववत् स्थिरावले, आणि अखेरीस त्यानें एक दीर्घ निःश्वास सोडून आपल्या कामास सुरुवात केली.

"ओळखलत तुम्ही त्यांना ?" डेफार्जनें त्याला हळूच विचारलें.

"होय. पण थोडा वेळच आरभीं अशक्यच वाटल होत तें, पण कुठें तरी निश्चित पाहिला आहे मी तो चेहेरा, होय पण जरा दूर—हां जरा दूर व्हा !"

दाराजवळील आपली जागा सोडून ती बालिका त्या वृद्धाच्याजवळ सरकली होती. पण त्याला घट्ट कवटाळण्यासाठीं अधीर झालेल्या त्या बालिकेकडे त्याचें अगदी पूर्ण पूर्ण दुर्लक्ष होतें, आणि कांहीं विलक्षण भयद शांतपणें त्याचें खालीं मान घालून आपलें काम चालू होतें.

एक शब्दहि कोणी बोलत नव्हतें कीं कसलाच आवाज कोणी करीत नव्हतें. एखाद्या प्रेताकृतीसारखी त्याच्याजवळ ती निश्चल उभी होती नि त्याचें खालीं पाहून काम चाललें होतें.

अखेरीस त्याला एका हत्याराची जरूर लागली. तें घेण्यासाठीं त्यानें आपला हात ती उभी असलेल्या बाजूकडे नेला, आणि ती अरी उचलून तो कामाला लागणार तोंच त्याच्या दृष्टीस तिच्या झग्याचें टोक पडलें. त्यानें आपले डोळे

वर करून तिच्याकडे पाहिलें. ते दोघे घाबरून एकदम पुढें झाले; पण तिनें आपल्या हाताने खुणाऊन त्यांना थांबवलें. त्यांना वाटत असलेली भीति तिला मुळींच वाटत नव्हती

काहीं विलक्षण तऱ्हेनें तो वृद्ध तिच्याकडे टक लावून पहात होता, आणि जरा वेळानें काहीं बोलण्यासाठीं त्याच्या ओठांची हालचाल सुरू झाली पण ओठांची ती धडपड काहीं क्षण तरी निष्फळ झाली. अखेरीस आस्ते आस्ते सुस-कारे टाकीत काहीं शब्द बाहेर आले —

" हा काय प्रकार — ? "

तिच्या नेत्रांतून मूकपणें आतां अश्रू खालीं पाझरत होते. आपले हात ओंठाशीं नेऊन त्याच्या दिशेनें तिनें त्याचें चुंबन घेतलें. आणि जणुं काय त्याचेंच मस्तक आपल्या छातीशीं आपण कवटाळीत आहों अशा आविर्भावानें ते तिनें मग आपल्या छातीवर दाबले

" जेलरची तर मुलगी नव्हे तुम्ही ? "

तिनें नकारार्थी मान हलविली

" मग कोण तर ? "

स्वत:च्या आवाजावर तिचा ताबा नसल्यानें काहींहि न बोलतां ती खालीं बांकावर त्याच्याजवळ बसली. त्यानें एकदम आपलें आंग चोरलें, पण तिनें आपला हात त्याच्या हातावर ठेवला. त्या हस्तस्पर्शाबरोबर काहीं सुखद संवे-दना त्याच्या सर्वांगातून सळसळल्या, हातांतील अरी त्यानें हळूच खालीं ठेवली आणि तिच्या चेहेऱ्याकडे स्वस्थपणें टक लावली.

तिनें घाईघाईनें कसेबसे सावरलेले तिचे लांबसडक सुवर्णरंजित कॆस तिच्या गळयाखांद्यावर विखुरले होते. आपले हात हळू हळू लांब करीत त्यानें ते केश-गुच्छ हळुवारपणें उचलून त्यांचेकडे पाहिलें. विस्मृतीची छाया परत त्याच्या मस्तकांत पसरली आणि फिरून एक दीर्घ निःश्वास सोडून त्यानें आपल्या कामाला परत सुरुवात केली.

पण थोडाच वेळ. त्याच्या हातावरून आपला हात काढून तिनें तो त्याच्या खांद्यावर हळूच ठेवला. तो तिथेंच आहे कीं नाहीं हें पाहून आपली खात्री कर-ण्यासाठींच जणुं काय त्यानें दोन तीन वेळां तिकडे पाहिलें, आपल्या हातांतील अरी खालीं ठेवली आणि आपल्या गळयाजवळ हात नेऊन, बारीक चिंधीची

घडी असलेली, एक काळी मिचकूट दोरी गळयांतून काढली ती चिंधीची घडी आपल्या गुडघ्यावर धरून मोठ्या काळजीपूर्वक त्यानें ती उघडली आणि त्यांतून एकदोन लांब सोनेरी केस त्यानें बाहेर काढले. त्या दूर गतकाळांत किती वेळां तरी ते मऊ मऊ सोनेरी केस त्यानें हळुवारपणें कुरवाळले होते.

त्यानें परत एकदां तिचे केस आपल्या हातांत घेतले, आणि त्यांच्याकडे नीट निरखून पाहिलें. "होय, अगदीं तेच. पण हें कस ! कधीं बरं पण तें ! कधीं! "

त्यानें आपली दृष्टि तिच्यावर रोखली. तिचें तोंड पूर्णपणें उजेडाकडे केलें आणि आपल्या कपाळावरून हात फिरवीत पुन्हा एकदां तिच्याकडे नीट निरखून पाहिलें

—"माझ्या खांद्यावर डोकं टेकून ती मला त्या रात्रीं घट्ट बिलगली होती. मला आलेल्या नुसत्या बोलावण्यानेंच ती अतिशय भेदरली होती, पण माझं मन मात्र अगदीं शांत होत आणि तिकडे त्या नॉर्थ टॉवरमध्यें मला नेल्यानतर असे माझ्या कोटाच्या बाहीला चिकटलेले ते मला सांपडले. 'असू देत ना ते माझ्याजवळ ? माझं हें शरीर कांहीं नाहीं निसटून जाऊं शकत त्यांच्या जोरावर, पण हृदय मात्र शक्य आहे ' असच बोललों होतों मी. नक्की आठवत आहे मला."

या साऱ्याचा स्पष्ट शब्दोच्चार होण्यापूर्वी किती वेळ तरी त्याच्या ओंठांची चाळवाचाळव चालू होती. पण मग प्रथमोच्चारानतर मात्र ते सावकाश पण स्पष्टपणें बाहेर उमटले.

"पण हें कस काय ? तूच का ती ?" तो एकदम तिच्याकडे वळून म्हणाला.

त्याच्या त्या आवेशानें खिडकीजवळील त्या दोन व्यक्ति परत एकदां चमकून पुढे झाल्या. पण त्या बालिकेनें त्याना तसेंच थांबवलें त्या वृद्धाच्या बाहुपाशांत ती स्वस्थ बसली होती. "मेहेरबानी करून आमच्याजवळ नका येऊं; नि कांहीं बोलूंचालूंहि नका ! "

"अ ! कोणाचा बरं हा आवाज ?" तो वृद्ध उद्गारला, नि तिच्या आंगावरील आपले हात त्यानें उचलून एखाद्या वेड्यापिशासारखा आपल्या पांढऱ्या शुभ्र मस्तकावर जोरानें आघात केला. परत सर्व कांहीं शांत होऊन विमनस्कतेची लाट त्याच्यावर पसरली. आपल्या हातांतील चिंधीची पुन्हां नीट घडी करून आपल्या थरथरणाऱ्या हातानें त्यानें ती छातीजवळ धरली पण त्याची

दृष्टि मात्र अजूनहि त्या बालिकेच्या चेहेऱ्यावर खिळली होती आणि मान निराशेनें मधूनच हालत होती.

"छट्, मुळींच शक्य नाहीं तें! अह, मुळींच नाहीं! अशक्य, अगदीं अशक्य, फारच लहान आहेस तू नि किती गोंडस, छट्! बघ, माझ्याकडे बघ. हे असले हात नव्हते तिनें कधीं पाहिले, नि हा चेहेरा पण नाहीं. आणि हा आवाज? अंह -- तिनें नव्हता तो कधीं ऐकला. ती आणि तो -- कितीतरी वर्षां पूर्वीची आहे ती गोष्ट, अगदीं दूर दूरची --- कितीतरी युग लोटलीं त्याला; पण.... नांव काय ग तुझं बाळ?"

त्याच्या आवाजांत आलेल्या मार्दवानें अगदीं विरघळून जाऊन त्याच्या कन्येनें त्याला घट्ट मिठी मारली "बाबा, बाबा!" ती कळवळून बोलत होती. "जाऊं दे तें सारं. आज नको कांहीं मला विचारूं इथें, सांगेन -- सार सार कांहीं मग सांगेन मी तुम्हांला केव्हांतरी, पण बाबा --- बाबा, आज नुसते माझ्या मस्तकावरून आपला हात फिरवून मला तुमचा प्रेमाचा आशीर्वाद मात्र द्या ---!"

त्याच्या निस्तेज शुभ्रकेश मस्तकाला बिलगूनच ते मऊ तकतकीत सुवर्णरंजित नाजुक केशगुच्छ विखुरले होते. स्वातंत्र्याचें तेजस्वी तेजोवलयच जसे कांहीं त्या वृद्ध मस्तकाभोंवतीं आतां तळपत होतें.

--- "बाबा, माझा आवाज आत्ता ऐकल्याबरोबर, सुरेल संगीतासारखा तुमच्या कानाला गोड लागणारा तो आवाज तुम्हांला आज आठवला असेल. पण त्याचा आतां हा अस्पष्ट, अपूर्ण प्रतिध्वनीच तुम्हांला यापुढें दुर्दैवानें ऐकायचा आहे. तुमच्या बाहूंत विश्रब्धपणें विसावलेलें, या माझ्या मस्तकासारखें दिसणारें तें लाडकें मस्तकही बाबा, तुम्हांला आतां निष्ठुर दैवानें बघायला मागें ठेवलें नाहीं. तुमचा दुर्दैवी जीव इथें असा, पिंजऱ्यांतील पाखरासारखा निष्फळपणें तडफडत असतां, तुमची ती प्रियपत्नी तिकडे त्या वैराण स्मशानासारख्या घरांत कणाकणानें झिजत निराशेनें परलोकची वाट चालत होती. आतां हा एकच एक आशातंतु तुम्हांला दैवानें मागें ठेवला आहे. पण तुमचं हें दु:खपूर्ण जीवनमात्र आतां पूर्णपणें सफल आहे खास तुम्हांला अकारण छळलेल्या तुमच्या या मायदेशाला रामराम ठोकून आपण आज इंग्लंडला निघून जाऊ या आणि परमेश्वरी कृपेनें एकमेकाच्या प्रेमळ संगतींत आपण आतां आनदानें राहू या. परमेश्वराचीच खैर झाली. पहा, पहा --- किती शांतपणें

त्यांच्या डोळ्यांतून हे अश्रु आतां खालीं पाझरत आहेत ! किती — किती धीर आला आहे मला त्यानीं ! ”

त्या वृद्धाचें मस्तक त्या बालिकेच्या हृदयावर असहायपणें स्थिरावलें होतें आणि डोळ्यांतून मूक अश्रूंची जशी सततधार चालू होती. अनंत वर्षांच्या भोगलेल्या दारुण आपत्तीनंतर आशेच्या नुसत्या सुखद प्रथम स्पर्शाबरोबर त्या वृद्धाची झालेली ती विव्हलावस्था, कोणाचेंहि हृदय हलविण्यास पुरशी होती. आणि म्हणूनच तिकडे त्या दोघां पितापुत्रांकडे निश्चलपणें पहात उभ्या असलेल्या खिडकीजवळील त्या दोन व्यक्तींच्या डोळ्यांतही अश्रूंना एकच गर्दी केली.

मग कितीतरी वेळ निश्चल नीरव वातावरणात ती खोली जशी कांहीं पूर्णपणें बुडून गेली होती प्रबळ भावनांनीं हादरत असलेला त्या वृद्धाचा जीर्ण देहही आता सुखद शांत निद्रेंत — तुफानानंतरच्या प्रशांत शांततेंत विलीन झाला होता. त्या बालिकेच्या हृदयावर विसावलेलें त्याचें श्रांतमस्तक, तिच्याच ऊबदार बाहूंचा आश्रय घेऊन खालीं विश्रब्धपणें पहुडलें होतें, आणि तीहि तशीच त्याला एखाद्या लहान पोरासारखा पोटाशीं कवटाळून निजली होती नि तिच्या सोनेरी केसांची पातळ रेशमी शाल प्रकाशाच्या प्रखर झोतापासून त्याच्या जीर्ण मुखाचें रक्षण करीत होती. त्या निद्रित वृद्ध देहाला उचलून तिच्या अवघडलेल्या हातांना मोकळे करण्यासाठीं आपले डोळे पुशीत पुढें येणाऱ्या लॉरींना तिनें हातानें खुणावून थांबवलें आणि ती म्हणाली: — “असंच जर आपल्याला आतां पॅरिस सोडून निघून जातां आलं तर फार बरं, मला वाटतं.”

“ पण त्यांना सोसेल ना तो सारा त्रास ? ” लॉरींनीं विचारलें.

‘ इथें या भयाण जागेंत राहण्यापेक्षां तें बरं, मला वाटतं.”

“ खरं आहे याचं म्हणणं, ” जवळच उभा असलेला डेफार्ज म्हणाला. “ आणखी असं कीं जितके लौकर ते फ्रान्सपार होतील, तितके बरं, आणू का गाडी बोलावून ? ”

“ मला वाटतं तें काम मी केलेलं अधिक बरं ” कामाच्या उल्लेखाबरोबर त्यांच्या अंगांतील कामकरी जागा होऊन लॉरी म्हणाले.

“ आम्हांला राहू द्या इथें असंच तुम्ही दोघंहि गेलांत तरी चालेल ” मिस मॅनेट म्हणाली “ तसं कांहीं भ्यायचं कारण नाहीं तुम्हांला. बघा किती शांतपणें ते आतां झोंपले आहेत ते. तेवढं दार मात्र परत बंद करून घ्या म्हणजे

झाल. तुम्ही आम्हांला येथून न्यायला येईपर्यंत मी घेईन त्यांची पूर्ण काळजी, कांही काळजी नको तुम्हांला त्याची !"

पण तस तें त्या दोघांना पटत नव्हत. त्यांच्यापैकीं कोणीतरी एकानें तिथें थांबावं असच त्यांना वाटत होत. पण गाडी ठरवून आणण्याशिवाय आणखी कागदपत्राची, परवान्यांची व्यवस्थाहि त्यांना करायची असल्यानें आणि सूर्यही आतां मावळतीकडे चांगलाच झुकला असल्यानें, अखेरीस आपसात कामाची वाटणी करून घेऊन आणि त्या दोघा पितापुत्रींना तशींच तिथें सोडून ते लग-बगीनें मग खोलीच्या बाहेर पडले.

खिडकींतून त्या पोट माळ्यांत येत असलेला सूर्यप्रकाश आतां आस्ते आस्ते कमी होत होता तरी तशीच आपल्या शरीराची चाळवाचाळव न करता ती बालिका आपल्या पित्याला कवटाळून निजली होती त्या वृद्धाचा श्रांत देहही तितक्याच शांतपणें निद्रासुखाचा आनंद घेत पहुडला होता. क्रमाक्रमानें खोलींतील सूर्यप्रकाश कमी होऊन अंधकाराची काळी छाया आंत दाटू लागली तीं दोघेंहि अजून तशींच शांतपणें तिथें पहुडलीं होतीं. खोलींतही आतां अंधार चांगलाच दाटला होता; तरीहि त्या वृद्धाची कांहींच हालचाल होत नव्हती; अखेरीस दाराच्या फटींतून दिव्याचा उजेड आंत घुसला आणि लॉरी नि डेफार्ज दार उघडून आंत शिरले

आपल्या हातांतील दिवा आणि सामान खालीं त्या लाकडी बांकावर ठेवून डेफार्जनें लॉरींच्या मदतीनें त्या वृद्धाला त्याच्या त्या गाढ निद्रेंतून जागा करून नीट बसतें केलें.

त्या वृद्धाच्या त्या जीर्ण मुद्रेवरून त्याच्या अंतःकरणांत चाललेल्या विचारांचं गूढ कोणत्याच मानवी बुद्धीला त्या वेळीं आकलन करणें केवळ अशक्य होतें. घडलेल्या गोष्टींची स्मृति, त्याच्याशीं झालेलें इतरांचें संभाषण किंवा आपण मुक्त झाल्याची जाणीव त्याला होती कीं नाहीं, हेंहि एक मोठें गूढच होतें. त्यानीं त्याच्याशीं कांहीं तरी बोलण्याचा खूप प्रयत्न केला. पण त्याचे ते सर्व प्रयत्न पार निष्फळ ठरले. त्याचा पूर्ण स्मृतिभ्रंश झाला की काय अशीहि दारुण शंका त्यांच्या मनाला शिवल्याशिवाय राहिली नाहीं पण अखेरीस त्यानीं त्याला तसेंच राहू द्यावयाचें ठरविलें. अजूनपर्यंत कधी दिसला नाहीं इतक्या

आवेगानें आपलें मस्तक तो मधूनच घट्ट धरी, मधूनच आपल्या कन्येच्या मृदु आवाजानें मवाळून त्याची चर्या उल्लसित होई. आणि ती बोलूं लागली कीं मोठ्या प्रेमानें तो तिच्याकडे आपली निश्चल दृष्टि लावी.

बिन तक्रार आज्ञापालनाच्या दीर्घकाल सवयीनें तो आपले खाण्यापिण्याचे व कपडे आंगावर चढविण्याचे सर्व व्यवहार आतां निमूटपणें उरकीत होता. आणि मग सर्व उरकल्यानतर त्याच्या कन्येनें आपला हात त्याच्या हातांत गुफतांच मोठ्या अभिमानानें आपली मान ताठ करून नि तिचा हात घट्ट पकडून हातांत दिवा घेऊन पुढे झालेल्या डेफार्जच्या मागून तो जिन्याच्या पायऱ्या उतरू लागला. कांही पायऱ्या उतरल्यानतर जरा थावून त्यानें वर खाली बाजूला अशी आपली दृष्टि चौफेर फिरविली

" ओळखते आहे तुम्हाला ही जागा, बाबा ? इथे आलां होता तुम्ही कधी ?"

" काय म्हटलत ? "

पण तिनें प्रश्नाचा पुनरुच्चार करण्यापूर्वीच जणु काय तो पुनरुच्चार झालाच असें समजून तो म्हणाला

" नाहीं, कांहीं नाहीं आठवत, कितीतरी वर्षं झालीं त्याला. "

त्याचा अर्थ तुरुगातून आपण तिथें आल्याचें त्याला कांहीं स्मरत नाहीं असच ते सारे समजले तिकडे तो हळु आवाजांत पुटपुटत होता, ' नबर एकशें पांच नॉर्थ टॉवर, ' आणि त्या दुर्गम टॉवरच्या भिंतीच आपण सभोंवार पहात आहों अशा आविर्भावानें तो समोर पहात होता. खाली चौकांत आल्याबरोबर खदका वरील पुलाजवळच आपण आलों अशा कल्पनेनें त्यानें आपली चाल न कळतच बदलली पण खदकावरील तो पूल कुठेंच न दिसल्यानें आणि समोर उघड्या रस्त्यावर उभ्या असलेल्या गाडीकडे दृष्टि जातांच त्यानें आपल्या कन्येचा हात सोडून दिला आणि परत आवेगानें आपलें मस्तक घट्ट पकडलें.

रस्त्यांत किंवा मार्गे दुकानांत कसलीच वर्दळ आतां चाललेली दिसत नव्हती सगळीकडेच अगदीं शुकशुकाट झाला होता आणि एक प्रकारच्या औदासीन्याची अस्वाभाविक शांतता चोंहीकडे पूर्णपणें पसरली होती. फक्त एकच सजीव व्यक्ति — मॅडम डेफार्ज दाराजवळील खांबाला टेंकून विणकामाच्या सुया चपळाईनें चालवीत कांहींहि पहात नसल्यासारखी उभी होती.

तो वृद्ध बदी आंत गाडींत चढला पण खालीं बसतां बसताच त्याला आपल्या

हत्यारापात्यारांची नि त्या अर्धवट शिवलेल्या शूची आठवण झाली. त्या उच्चारा-बरोबर चपळाईनें आपल्या यजमानांच्या आधीं मागें वळून चारदोन मिनिटांतच तें सारें सामान मॅडम डेफार्जनें गाडींत आणून टाकलें, आणि परत कांहींच न केल्या पाहिल्यासारख्या त्याच खांबाला टेंकून तिच्या सुया चालू झाल्या.

त्या खडबडीत दगडी रस्त्यांवरून आपल्या चाकांचा खडखडाट करीत त्या उपनगरांतील अंधाऱ्या भयाण नि निर्मनुष्य रस्त्यांतून आणि पॅरिसच्या गज-बजलेल्या झकपक नि विलासी वातावरणातून वेगानें वाट काढीत, ती प्रवासी गाडी पॅरिस शहराच्या प्रवेशद्वाराजवळ येऊन थडकली. गाडी थांबतांच प्रवेश-द्वाराजवळील कंदीलाची हालचाल सुरू होऊन गाडीच्या आंवतीभोंवती त्यांचा प्रवास चालू झाला. गाडीच्या पुढील जागेवरून खालीं उतरलेल्या डेफार्जनें एका शिपाईबोवांस जरा बाजूला नेऊन कांहीं कुजबूज केली आणि हातांतील कागद त्याच्या पुढें केले शिपाईबुवानींही आपली टोपी जरा सरसावून हातां-तील कांदिल उच्च करून आंत गाडींत नीट न्याहाळलें, आणि आलबेलीची सूचना उच्चस्वरांत दिली. आणि गाडीवानाच्या कडकडलेल्या चाबकाच्या इशाऱ्याबरोबर चारी घोड्यांनीं त्या लोखंडी दिंडीबाहेर पडून भरवेगानें दौड-ण्यास सुरुवात केली.

नाक्यावरील आणि शहराच्या त्या प्रवेश भागातील दिव्यांचा उजेड मागें पडत चालला आणि मग वाढत्या रात्रीच्या त्या भयाण शांततेंत, वर आका-शांत अनंत ताऱ्यांचा अनंत काळापासून असाच मूकपणें चालत आलेला जागता पहारा, त्या भरधांव चालत असलेल्या प्रवासी गाडिवर अविच्छिन्नपणें चालू झाला.

— -

# भावबंधन

.... १ ....

होत खरच विलक्षण साम्य त्या दोघांच्या चेहेऱ्यांत. एक प्रौढ नि दुसरा तरुण—पण दोघांच्या चेहेऱ्यांतील तें साम्य मात्र कोणाच्याहि मनांत गोंधळ उत्पन्न केल्यावांचून खास राहिल नसत. आणि तसच झाल त्या दिवशीं. सिडने कार्टन बसल्या जागेवर उभा राहून स्वत कडे आणि चार्लस् डार्नेकडे हस्तनिर्देश करून, मं' कीं तो, कोणाविषयीं तुम्ही बोलत आहात? म्हणून त्यानें ठांसून विचारताच आतापर्यंत आत्मविश्वासानें बोलत असलेला तो सरकारी साक्षीदार गडबडला आणि सरकारी पुराव्यातील तो प्रभावी दुवा तुटून खालीं गळून पडला. संशयाचा फायदा आरोपीस मिळाला आणि कायद्यावर आधारलेल्या राजसत्ते-विरुद्ध युद्ध पुकारण्याच्या भयकर आरोपांतून चार्लस डार्नेला न्यायदेवतेनें मुक्त केलं आणि त्या भयकर राजद्रोह्याची मान फांसावर लटकलेली पाहण्याच्या आसुरी आनदासाठीं हापापलेल्या लडनमधील बेलगामी टोळभैरवांची त्या दिवशी दारुण निराशा झाली.

कोर्टांपुढील आत्तांपर्यंत मानवी तमासगिरांनी गजबजून गेलेला तो व्हराडा आता अ र्धा तासातच जवळ जवळ रिकामा झाला होता. फक्त साक्षीदार म्हणून कोर्टांत यावं लागलेले टेलसन बॅंकेचे मि. लॉरी डॉक्टर मॅनेट् आणि त्यांची तरुण कन्या ल्यूसी, आरोपीचे सॉलिसिटर आणि त्यांचे बॅरिस्टर मि स्ट्रायव्हर नि त्याचे सहकारी मि सिडने कार्टन् बधनमुक्त झालेल्या चार्लस डार्ने सभोंवार गोळा होऊन मृत्यूच्या भीषण दाढेंतुन मुक्त झाल्याबद्दल त्याचें आता अभिनदन करीत तिथं उभे होते.

पॅरिसमधील दारू दुकानाच्या त्या चिंचोळ्या काळोखी माळयावर जोडे शिवीत बसलेल्या वृद्धाला, डॉक्टर मॅनेटच्या स्वरूपांत आतां कोणीहि ओळखणं कठीण होत. त्यांचा तो उमदा बुद्धिमत्ता दर्शक चेहेरा आतां नेहमीं समाधानानें फुललेला असा दिसे. त्यांच्या दीर्घ बदीवासाची स्मृति अत करणाच्या

कोनाकोपऱ्यांत कुठेंतरी आतां खोल दडून बसली होती नि अगदीं क्वचित् प्रसंगीं ती जागी होऊन त्यांच्या चेहेऱ्यावर तें जुनें विमनस्कतेचें, हतबलतेचें भकास स्वरूप वावरतांना परत दिसत असे आणि गतस्मृतींचें तें भेसूर भूत असं जागं होण्यासाठीं कांहीं बाह्य साधनांची आवश्यकता लागे असंहि नाहीं केव्हां तरी, कशानें तरी तें जागें होऊन त्यांच्या आतां समाधानी असणाऱ्या चेहेऱ्या-वर विषण्णपणाची ती छाया मधूनच पसरे, एवढें मात्र खरें. त्यांच्या त्या विषाद-पूर्ण जीवनाशीं परिचित असलेल्या त्यांच्या निकटवर्ति स्नेह्यांस त्याचें कांहींच आश्चर्य वाटत नसे इतर लोकमात्र तशा अवस्थेंत त्यांना वेडेच समजत असत. त्यांची एक लाडकी कन्याच काय ती त्यांना त्या अशा मधून मधून ग्रासणाऱ्या राहूच्या तडाक्यातून सोडवून आणण्यास समर्थ ठरे. तिचा गोड आवाज, नाजुक लाडीक हस्तस्पर्श आणि मोहक मुखाचं दर्शन, गतस्मृतींच्या पकडींत हतबल बनलेल्या डॉक्टर मॅनेटच्या शरीरांत जणु नवसंजीवनच उत्पन्न करीत. डॉ. मॅनेटच्या बंदीवासापूर्वीचा भूतपूर्व सौख्य काल आणि बंदीवासानंतरचा आजचा वर्तमान या दोघांची त्या भीषण खदकावरून बेमालूम सांधेजोड कर-णारा, त्यांची ल्यूसी हा जणुंकाय नाजुक पण चिवट असा रेशमी गोफच होता. आणि तिच्या सुदैवानें डॉक्टर मॅनेटनां लागणारं हें आगंतुक नि आकस्मिक ग्रहण आता जवळ जवळ संपुष्टांतच आलं होतं.

—बॅरिस्टरसाहेबांचे मन पूर्वक आभार मानून चार्लस डार्ने त्या पितापुत्रींना निरोप देऊन आतां कोर्टाच्या दाराशीं उभा होता त्याच्या खांद्यावर कोणी तरी हात ठेवला तो चमकून मागें वळला बॅरिस्टर सिडने कार्टनची हसत-मुख पण दारूची नशा चढत असलेली मूर्ति त्याच्या दृष्टीस पडली

" अगदीं विलक्षण आहे आपलं हें जग नाहीं ? या तुमच्याच प्रतिबिंबाशीं — माझ्याशीं — असं इथें एकटच बोलत राहणं तुम्हांला मोठं चमत्कारिक वाटत असेल नाहीं, मि. डार्ने ? "

" मला तर अजून झोंपेंत वावरल्यासारखंच वाटत आहे. माझे पाय परत या जगांत पडले आहेत असं अजून मला पूर्णपणें वाटतच नाहीं आहे मि. कार्टन."

" कांहीं आश्चर्य नाहीं त्यात; त्या दुसऱ्या जगाच्या अगदीं दाराशींच तुम्हीं

उभं असल्याला कांहीं फार काळ नाहीं लोटला. हा तुमचा आवाज सुद्धा किती क्षिण येतो आहे पहा. ”

“ अतिशय दमल्यासारखं झाल आहे खर मला. ”

“ अरे मग गृहस्था, त्या पोटाची कांहीं सोय पहा कीं ! आपण तर बुवा मघाशींच, तीं बावळटं तुम्हाला या जगांत ठेवायच कीं परलोकांत, याचा काथ्याकूट करीत असतांच पोटपूजा उरकली. चला, मी दाखवतों तुम्हांला एक मनपसत ठिकाण ”

त्यानें आपला हात मग डॉर्नच्या हातांत गुफून लडगेटहिलवरून भटकत भटकत फ्लीटस्ट्रीट वरील एका उपाहारगृहांत तो शिरला. आणि नोकरानें दाखवलेल्या एका छोट्या खोलींत शिरून आतील खुर्चीवर त्यानें आसन ठोकलें. नोकरांन ताट वाढून आंत आणून ठेवल्यावर आणि चार्लस डॉर्ननें स्वस्थपणें भोजनास सुरुवात केल्यावर तोहि आपली पोर्टवाइनची बाटली पुढें ओढून दारूचे घुटके घेत त्याचेकडे पहात बसला

“ कां, आतां तरी आलात कीं नाहीं या जगांत मि डॉर्ने ? ”

“ असं थोडस वाटत खर पण अजून सार काहीं स्वच्छ नाहीं झाल स्थळकाळाचा थोडा गोंधळ आहे अजून शिल्लक. बाकी ठीक आहे पण. ”

“ मोठें समाधान वाटत असेल नाहीं मग ? ” काहीशा कडवटपणें कार्टन म्हणाला आणि त्यानें आपलें ग्लास परत भरलें.

“ माझ्याविषयीं म्हणाल, तर मला आपल हें जग विसरावसच वाटत त्यांत काहींच आनद नाहीं माझ्या सारख्याला—हें अमृत मात्र सोडून ह—म्हणजे आपल कांहीं साम्य नाहीं या एवढ्या बाबतीत आणि तसच म्हटल तर, तुमच माझ कसल्याच बाबतींत नाहीं साम्य. ”

त्या साऱ्या दिवसांतील एकदर घडामोडींना अस्वस्थ झाल्यामुळें आणि त्याच्या सारख्याच दिसणाऱ्या त्या विचित्रवल्लीच्या सहवासानें अधिकच अस्वस्थ झालेल्या डॉर्नन यावर काहीच उत्तर दिलें नाहीं तो नुसता कार्टनकडे पहात स्वस्थ होता.

“ तुमच जेवण उरकल आहे आता मिस्टर डॉर्ने, मग आपण आतां तिच आरोग्य चिंतू या कीं. ”

“ अ, कुणाच म्हणतां तुम्ही ? ”

'अहो, तुमच्या अगदीं जिभेवर आहे कीं तें नांव."

"बर तर, मिस मॅनेट !"

"हां हां, मिस मॅनेट !" कार्टन उद्गारला आणि त्याच्या चेहेऱ्याकडे निरखून पहात एका दमात त्यानें तें ग्लास संपवले आणि तें तसेंच आपल्या खांद्यावरून मागे भिरकावलें, आणि त्याचा खळ्ळ असा झालेला आवाज विरल्यानतर टेबलावरील घटा वाजवून त्यानें दुसरें ग्लास आणण्यास फर्मावलें.

"मोठी गोड छोकरी आहे नाहीं ती मि. डार्ने, नि हस्त स्पर्श ही किती नाजूक !" नवीन आणलेलें ग्लास भरीत कार्टन म्हणाला.

डार्नेच्या चेहेऱ्यावर रागाची छटा उमटली आणि त्यानें नुसतें "हं," असें उत्तर केलें.

"किती सहानुभूति दाखवीत होती तुमच्यासाठीं ती ! अगदीं ग्याळवर जीव होत होता नुसता तिचा तुमची साक्ष चालली असतां आपण तर बुवा केवळ तेवढ्या सुखासाठी शिक्षासुद्धा भोगायला तयार झालों असतों "

साक्षीच्या या उल्लेखानें कार्टननें केलेल्या कामगिरीची डार्नेला आठवण होऊन त्यानें विषयाला कलाटणी देऊन त्यानें केलेल्या मदतीबद्दल त्याचे मन पूर्वक आभार मानले

"अ ! आभार मानण्यासारखं त्यांत कांहींच नाहीं आणि मी तरी तें का केल, कोण जाणे ! पण मला एक प्रश्न विचारायचा आहे मि डार्ने.

"खुशाल विचारा, आनदच वाटेल मला त्यात."

"मला तुम्ही आवडतां अस खरच वाटत तुम्हांला ?"

"मी नाही काहीं सांगू शकत तसा विचारच नाही केला मी त्याचा." गोंधळून जाऊन डार्ने म्हणाला.

"पण आतां तरी करा कीं"

"तुम्ही वागलांत तरी निदान खरे तसे; पण तस असेलस मात्र वाटत नाहीं."

"बरोबर आहे मि. डार्ने, आहे, चलाख आहे तुमची बुद्धी !"

"तरीसुद्धां मला वाटत आत्ताच हें बिल मी द्यायला कांहीं हरकत नाही. आणि मित्रभावानेंच आपण एकमेकांचा निरोप घेऊ या."

"ठीक आहे; पण आणखी एक बाटली मागवा माझ्यासाठी"

बिलाचे पैसे चुकते करून आणि कार्टनला गुडनाइट करून चार्लेस डार्ने आपल्या जागेवरून उठला. परत सलामी न देतां कार्टनही आपल्या जागेवरून उठला त्याच्या हालचालींत कांहींतरी मूक गर्भित आव्हानासारखी किंवा बेगुमानपणाची छटा उमटली होती ' एक अखेरच ह, मिस्टर डार्ने मला नशा चढली आहेस वाटत तुम्हांला ? " त्यानें डार्नेकडे पहात विचारलें.

" तुम्ही विचारताहाच तर सांगतों कीं, तस थोडस खर "

" मग त्याच कारणही तुम्हाला कळलच पाहिजे मी एक निराश पोटभरू आहे, मिस्टर डार्ने. या भरल्या जगांत मी कोणासाठी किंवा कोणीहि माझ्या-साठी कांही तळमळत नाही — "

"अतिशय दु खाची गोष्ट आहे ही मि. कार्टन. पण अधिक सदुपयोग करतां आला असता तुम्हांला तुमच्या बुद्धीचा."

" कदाचित् असता, किंवा नसताही पण तुम्हाला इतका अभिमान वाट-ण्याचं काहीं कारण नाही; केव्हा काय प्रसंग येईल कोणावर तें कोण सांगेल गुडनाइट ! " कार्टन एकदम उद्गारला.

खोलात मग एकटाच राहिल्यानतर टेबलावरील मेणबत्ती उचलून भिंतीवरील आरशा जवळ स्वत च सूक्ष्म निरीक्षण करीत तो कांही क्षण उभा राहिला.

' तुला आवडतो आहे तो छोकरा ? ' आपल्याच प्रतिबिंबाकडे पहात तो पुटपुटला. " पण तुझ्यासारखाच दिसणारा तो तुला काय म्हणून आवडावा ? नि त्याच्यांत काय आहे असं, सांग पाहू पण, सैताना काय अवस्था करून घेतली आहेस तू आपली स्वत ची ' अ ' स्वत च्या आयुष्याची तूच अशी धूळ-धाण केलीस म्हणून तुला बजावणाऱ्या त्या तुझ्या जिवत प्रतिबिंबाला पाहून, तुला मोठ गोड वाटत असेल नाहीं वा ' फारच चांगल कारण आहे तुला तो आवडण्याच, नाहीं ? सांग, आजच त्याच्याजागी तू उभा असतास तर, ते गोड गोड निळे निळे डोळे तुझ्याकडे तसेच प्रेमानें लागले असते नाही ? आणि तो लाडीक चेहेरा तसाच तुझ्यासाठी तळमळून पांढरा फटक पडला असता, नाही? बोल, खर बोल, कशाला उगाच चोरून ठेवतोस ' उ — द्वेष — द्वेष करतो आहेस तू त्याचा '—"

तो मागे वळला आणि आपल्या मनांतील ती खळबळ दारूच्या पेल्यांच्या मदतीनें त्याने पार दडपून टाकली. त्याचे डोळे आतां जड दिसू लागले, देहाला

बधिरता आली आणि हातावर डोकें टेकून थोड्याच वेळांत तो घोरूंही लागला. टेबलावर अस्ताव्यस्त पसरलेल्या त्याच्या केसांकडे दृष्टि लावून ती मंद तेवत असलेली मेणबत्ती मात्र संथपणें त्याच्यावर कितीवेळ तरी पहारा करीत होती.

* * *

अजूनही तो नशाबाज तसाच गाढ निद्रेत निमग्न होता. मद्यपानाची ही त्याची संवय बरीच जुनी आणि त्या काळाला अगदी धरून होती. असाच त्या काळां-तील बहुसंख्य समाज मद्यपी होता सामान्य माणसाच सुद्धां त्या काळच रोजच मद्यप्राशन आज या काळांत आपल्याला अतिरंजित असच वाटेल इतका फरक याबाबतींत काळानें आतां घडवून आणला आहे. मद्यपानाच्या या चढाओढात कायदेपंडितांचें स्थानही मानाचेंच असे विद्वत्तेत नेहमा इतराच्या पुढें असलेला हा समाज याबाबतात सुद्धां नेहमा आघाडीलाच असे. मग स्वत च्या अक्कल-हुषारीवर इतरांना मागे टाकीत विसेषणानें पुढें येत असलेले बॅरिस्टर स्ट्रायव्हर तरी याला अपवाद कसे असायचे ? सेशन्स कोर्टात प्रवेश केल्यापासून फारच थोड्या अवधींत कीर्तिमंदिराच्या पायऱ्या झपाट्यानें चढत ते वर येत होते. आणि अलीकडे तर बॅरिस्टर साहेबांची कोर्टांत प्रामुख्यानें हजेरी नाही असा एकहि दिवस जात नव्हता किंगस् बेंचमधील त्या विग्धारी वकीलांच्या रांगेतून उठून बाहेर येणारा त्याचा लालबुंद चेहेरा, सूर्यफुलांच्या माजलेल्या ताटव्यातून जोराच्यानें सूर्याला सामोरे जाणाऱ्या एखाद्या मोठ्या थोरल्या सूर्यफुलासारखाच उठून दिसे. जिभेचा मोठा पातळ, प्रसंगावधानी, धीट आणि ग्रक्तागूक्ताची फिकीर न करणारा प्राणी म्हणून आरंभी जरी त्यांचा लौकिक होता, तरी खट-ल्यांत पुढें आलेल्या पुराव्याच्या नि बिन पुराव्याच्या प्रचंड ढिगाऱ्यांतून विरुद्ध-पक्षाचें मर्मस्थान नेमकें हरण्याचें कौशल्य मात्र त्यांच्या आगांत नव्हतें, असच त्यांच्या व्यवसायबधूंना वाटे. पण त्यांच्या दारांत कामाची वर्दळ जशी वाढू लागली तशी याही गुणांत त्यांची बुद्धिमत्ता आपला प्रभाव दाखवू लागली. आणि कामाच्या वाढीबरोबर याही गुणाची वाढ गणितश्रेढीनें होऊं लागली.

आणि सिडने कार्टन, आळशांचा तो अनभिषिक्त बादशहा, स्ट्रायव्हर साहे-बांचा बडा दोस्त. दोघेहि मद्यपानाला एकदां बसले की किती बाटल्यांचा मग

फशा उडेल याचा कांहींच नियम नव्हता. प्रत्येक खटल्यांत कार्टन स्टायव्हरच्या बरोबर कोर्टांत हजर असायचाच. आणि कोर्ट उठेपर्यंत कोटाच्या खिशांत हात घालून वर तक्तपोशीकडे आपली नजर लाऊन तो नेहमीं स्वस्थपणें बसलेला सर्वांना दिसे रात्रीच्या त्यांच्या पीत्वा पीत्वा पुन पीत्वाच्या कार्यक्रमांत सुद्धां ते असेच नेहमी अभिन्न देह असायचे आणि सकाळच्या राम प्रहरांत झुकांड्या खात घरी जात असलेली कार्टनची स्वारी तर अनेकांनीं पाहिली होती. कोर्टां-तील वकील वर्गाच तर अस ठाम मत झाल होत कीं कार्टन कधीच पुढल्या रांगेंत झळकणार नाही, पण त्याच्या चपल बुद्धिमत्तेची मदत मात्र स्ट्रायव्हरला चांगलीच उपकारक ठरेल आणि म्हणूनच ' सिंहशृगालौ, ' अस या दुकलीचं नांव कोर्टांत गमतीन पडल होत.

घड्याळांत दहाचा ठोका पडल्यानतर ठरल्याप्रमाणें हॉटेलांतील नोकरानें कार्टनसाहेबांस निद्रेंतून जागें केलें पाच दहा मिनिटांच्या कसून केलेल्या प्रयत्ना-नतर साहेब जागे झाले आणि डोक्यावर आपली टोपी कशीबशी ठेऊन नि बाहेर पडून आपल्या दोस्ताच्या ऑफिसच्या दिशेनें चालण्यास त्यांनीं सुरवात केली बाहेरील त्या थंडगार वाऱ्यानें त्याच्या मद्यजड मेंदूस लौकरच चांगली तरतरी आली आणि त्यांनी चारदोन मिनिटांतच आपल्या इष्टस्थानीं प्रवेश केला रात्रीची वेळ असल्यानें नोकरचाकरांच्या ऐवजी खुद्द साहेबबहादु-रांनीच दार उघडून त्यांचें स्वागत केलें त्यांचेहि कपडे कांहींसे अस्ताव्यस्त दिसत होते आणि डोळ्यांतहि मदिरेची चमक स्पष्टपणे उमटली होती

" थोडा उशीर झाला तुला, सिडने, " स्ट्रायव्हर म्हणाले

' काहीं नाहीं. रोजचीच आहे आपली वेळ. "

दोघेहि मग आतील एका लहानशा खोलींत शिरले. सर्व खोलीभर भिंतीला पुस्तकांच्या अलमाऱ्या लावल्या होत्या आणि मध्यभागच्या एका चकचकीत टेबलावर मद्यप्राशनाचा सर्व सरंजाम अगदीं जय्यत तयार दिसत होता. टेब-लाच्या सभोंवार कागदांचा ढिगारा अस्ताव्यस्तपणें पसरला होता आणि कोप-ऱ्यांतील कोळशाची शेगडी चागली धडाडून पेटली होती.

" थोडी झाली आहे वाटत आज आधींच सरबराई, सिडने ? "

" काय दोनतीनच झाल्या असतील मला वाटत ! आजच्या आपल्या अशी-लानीं केली कृपा झाल. "

" बाकी तुझा तो मुद्दा मोठा सुंदर होता ह, सिडने. आली कुठून तुला ती स्फूर्ति ? मोठी मौज उडाली त्यान ! "

" त्याच्या त्या उमद्या चेहेऱ्यान केल तें काम, त्यानं खेंचलं माझं लक्ष तिकडे आणि माझ्या आपल मनांत आल कीं, दैवानें जर खैर केली असती तर आपणहि तसेच गुलजार दिसलों असतों "

" अरे दैव, दैव काय बोलतो आहेस वेड्या ' ह चल; कामाला लागं या पण आपण आतां "

शृगाल महाशयानीं मग कुरकुरत कुरकुरत आंगातील कोट काढला आणि शेजारच्या खोलीत जाऊन थडगार पाण्यांत एक टॉवेल बुडवून थोडा पिळून तो त्यानें आपल्या मस्तकाभोंवती गुंडाळला आणि टेबलावरील बाटल्या जरा बाजूस सारून खालील कागद त्यानें पुढे घेतले, आणि थोड्याच वेळांत आपल्या कामांत तो गढून गेला. तिकडे स्ट्रायव्हर्राहि जवळच्या एका कोंचावर ऐसपैस पसरून कांहीं बारीकसारीक कामांचे कागद चाळीत स्वस्थपणें पडला होता मधूनच कामांत गर्क झालेल्या आपल्या दोस्ताकडे तो दृष्टि लावी आणि समाधानानें मान हलवीत हात जवळील मद्य चषकाचा मनमोक्त आस्वाद घेत आपलें वाचन तो परत चालू करी कार्टनच्या समोरील कागदांचा पसारा आस्ते आस्ते कमी होत चालला होता आणि टेबलाजवळील रिकाम्या बाटल्यांची संख्या वाढत चालली होती. मधूनच तो उठून आंतल्या खोलींत जाई आणि आपल्या मस्तकावरील वाफाळलेला टॉवेल परत पाण्यात चांगला बुडवून डोक्याभोंवती तो गुंडाळीत, तो आसनस्थ होई. पहाटेचा तीन वाजल्याचा ठोका घड्याळांत पडला आणि सिडने आपलें काम संपवून टेबलाजवळून उठला. दोघांहि दोस्तांचा मग ते कागद पुढे घेऊन कांहीं वेळ खल झाल्यानंतर सिडनेनें तो आतां परत वाफाळत असलेला आपल्या मस्तकाभोंवतीचा टॉवेल काढून दूर भिरकावला आणि एक भली सपाटी जांभई देऊन त्यानें आपले हातपाय मनसोक्तपणें लांब केले.

" चल, परत एकवार चांगला बार ठासूं या आपण आतां, " स्ट्रायव्हरनें सूचना केली. आणि सिडनेनेंहि अविलंबित्वानें तिचा स्वीकार केला

" आजच्या त्या तपासणींतील तुझे मुद्दे कसे अगदीं ठासर होते. " पोटांत

एकदोन ग्लास रिचवल्यानंतर स्ट्रायव्हरनें सभाषण पुन्हा चालू केलें. " प्रत्येक प्रश्न म्हणजे तोफेचा गोळा होता जसा. "

" नेहमींच असं ठासर असत माझ्ं काम, होय कीं नाहीं ? "

" मी नाहीं नाकारीत. पण आज असा उसळला आहेस कां ? या पचचा एक पेग मार पाहू आणि थंड हो जरा. "

सिडनेहि मागें सरणारा वीर नव्हता. त्यानें तो पेग केव्हांच पोटांत रिचवला.

" असाच होता आमचा हा जुना शाळासोबती नेहमीं. " त्याच्याकडे पहात आपली मान हलवीत त्याच्या आजी व माजी आयुष्याचें जणु पर्यालोचन करीत स्ट्रायव्हर म्हणाला. " तेव्हांसुद्धां घड्याळाच्या लबकासारखा दोन विरोधी अवस्थांत तू फिरायचास नेहमीं सिडने, आत्तां उल्हास तर दुसऱ्याच क्षणाला विषाद ! "

" हं ! " सिडने सुस्कारत उत्तरला. " होय ' तोच सिडने नि तेंच त्याचं दैव. तेव्हा सुद्धा असाच मी नेहमीं दुसऱ्या मुलाच लेखन करायचा, पण स्वत चं मात्र कधीं मधीं "

" पण का ? "

" परमेश्वरास ठाऊक ! माझी जातच तशी मला वाटत "

कोटाच्या खिशांत हात घालून आणि पाय समोर लांब करून शेगडीकडे पहात तो बसला होता

" कार्टन, तुझा मार्ग म्हणजे नेहमी असाच दुबळा त्यांत कांहीं उत्साह किंवा ध्येय म्हणून कांहीं नाहीं पण माझ्याकडे पहा. " गभीरपणें त्याच्याकडे पहात स्ट्रायव्हर म्हणाला.

" ए, जाऊदे रे तें ! " दिलखुलास हसत कार्टन उद्गारला. " तें प्रवचन नको बाबा झोडूं माझ्या पुढें ! "

" कस सपादन केल मी हें सार ! " स्ट्रायव्हरनें पुढें चालू केलें. " कसं उरकतों आहें मी हें सारं ? "

" अरे, कांहीं थोड मला पैसे चारून. नाहीं का ? पण हें व्याख्यान कशाला ? तुला जसं हव तसंच तूं करतो आहेस, नि मला हव तस मी. पण नेहमींच तूं असा अघाडाला होतास आणि मी आपला — पिछाडीला. "

" पण आघाडी काबीज करावयाची होती मला, जगात आलों तेव्हांच नव्हतो कांहीं मी तिथें: होतों का, सांग "

" अस्मादिक हजर नव्हते त्या सुप्रसंगीं ! पण मला वाटतं तिथेच होतास तूं " कार्टन म्हणाला आणि पुन्हा तो मुक्तकंठ हांसला आणि दोघांनींही मग हास्याची फेर झाडली.

" अरे शाळेंत असतांना काय किंवा कुठे काय, तू आपल्या रांगेत तू शिर लास आणि मी माझ्या आणि मग तिकडे पॅरिसमध्यें कायद्याचा अभ्यास करीत असताना सुद्धा तु कुठें तरी निश्चिनपणें प्रगत होत होतास आणि मी नेहमींच असल्या जागींच घोटाळत होतों "

" आणि दोष कोणाचा तो महाराज ? "

" तुझाही आहे कीं त्यात थेडा भाग, मला वाटतं. सारख कांहीं तरी करीत राहण्यात आणि इतराना बाजूला ढकलून पुढें येण्यांत तू नेहमीं इतका गर्क होतास कीं अस गजत पडून राहण्याशिवाय मला दुसरा मार्गच नव्हता. पण जाऊं दे तें ' नि आता ही नवीन दिवसाची हमरी प्रभा आपल्यापुढें उमलत असतांना, असल हें जुन पुराण उदासवाण चर्वित चर्वण कशाला. जाण्यापूर्वी जरा विषय पालट करशील कीं नाहीं. "

" बर तर आजच्या त्या सुंदर साक्षीदाराच आरोग्य चिंतू या आपण " हातांतील ग्लास वर धरीत स्ट्रायव्हर म्हणाला. " आतां तर गोड विषय आहे कीं नाहीं ? "

पण सिडनेच्या मुखावर औदासीन्याचीच छटा उमटत होती

" सुंदर – साक्षीदार, " हातांतील ग्लासाकडे पहात तो पुटपुटला " बस्स झाले आतां हे साक्षीदार, पण हा कोण तुझा सुंदर साक्षीदार ? "

" अरे ती, डॉक्टरांची चित्रामारखी छोकरी, मिस मॅनेट. "

" ती सुंदर ? "

" नाहीं ? सुंदर नाहीं ती ? "

" अं हं ! "

" म्हणजे ? अरे प्राण्या, पण साऱ्या कोर्टाचे डोळे तिच्यावर खिळले होते आज ! "

" खड्ड्यांत गेल सार कोर्ट ! त्याला काय समजतं सौंदर्यांत? सोनेरी केसांची नुसती शेळपट बाहुली ती ! "

" वा वा, सिडने, मला तर तेव्हां वाटल कीं, त्या सोनेरी बाहुलीनच तुला विरघळवल. त्याशिवाय दिसल होय रे तुला, तिला काय होतं आहे तें ! "

" म्हणजे ' एकादी छोकरी — सोनेरी बाहुली किंवा कोणी तरी, आपल्या अगदीं नाकाच्या शेंड्याजवळ बेशुद्ध पडत असतांना बघायला काय दुर्बीण लागते होय? वा ऽऽ ' आपण आरोग्य चिंतू तिच, पण ती सुदर म्हणून नाहीं कबूल करणार मी. पण आतां हें पुरें, झोंपलच पाहिजे मला आतां."

तो खालीं रस्त्यावर आला बाहेर सकाळचा गार वारा उदासवाणा वहात होता आकाश ढगांनीं झांकोळल होत, टेम्सच काळभोर पाणी आवाज न करता मदपणें वहात होत आणि आसमतांतील सर्व वातावरण ओसाड वाळवटामारख कसं चैतन्यशून्य अस दिसत होत. समोर धुळीचे लहान लहान लोट आपल्या आगाभोंवती पिंगा घालीत वाऱ्याबरोबर इतस्ततः वहात होते, नि जणू काय दूर अतरावरील वाळवटांतील वालुकाकण वर उसळून त्याचे पहिले तुषारस्रोतच आतां त्या साऱ्या शहराला ग्रासून टाकीत होते

सभोंवार पसरलेल्या त्या उदास वातावरणांत, स्वत ऱ्या आयुष्याचा खेळखडोबा केलेला कार्टन घराच्या गच्चीवर समोर पहात स्वस्थ उभा होता. समोरच्या त्या वैराण वाळवटांत कांहीं सुदर सुखस्वप्न मृगजळासारखीं त्याच्या डोळ्यासमोर तरळत होतीं. उमद्या आशा — आकांक्षा, आत्मत्याग नि चिकाटी जशीं मारीं त्याच्या समोर आतां उभीं राहून, त्या मोहक सौख्य मदिरांतील विशाल दालनें, आणि त्यांतील मोहक प्रेमळ ललनागण, त्याला खुणावीत असलेलीं त्याला दाखवीत होतीं. तिथल्या जीवन लतिकांवर बहरलेलीं रसरशीत गोड फळें त्याला मोह पाडीत होतीं आणि ते सूर्यप्रकाशांत चमकत झुळझुळ वाहणारे आशेचे पाट त्याच्या डोळ्यांना सुखवीत होते पण सार एकक्षणच. दुसऱ्याच क्षणीं तें मोहक गुलाबी स्वप्न त्याच्या दृष्टीपुढून विरूनहि गेलें. एक दीर्घ सुस्कारा टाकून जिन्यावरील आपल्या खोलीत तो शिरला आणि कशा तरी पसरून ठेवलेल्या त्या बिछान्यावर आंगांतील कपडे न काढतांच त्यानें आंग टाकलें.

त्याच्या मस्तकाखालील ती उशी विफल अश्रुधारांनीं आतां भिजत होती

---

.... २ ....

चार महिने होऊन गेले होते आता त्या गोष्टीला सकाळच्या वेळचं प्रसन्न उबदार वातावरण लंडन शहरावर पसरलं होत आणि मनाच्या प्रसन्न अवस्थेतच क्लार्कनवेलमधील आपल्या निवासस्थानांतून बाहेर पडून नेहमींप्रमाणें त्याही रविवारीं डॉक्टर मॅनेटच्या घराच्या रोखानें जार्व्हिस लॉरींची स्वारी हलतडुलत चालली होती अलीकडे दर रविवारींच ते आपलें भोजन डॉक्टर मॅनेट व ल्यूसी यांच्या प्रेमळ संगतींत उरकून सर्व दिवस तिथेंच मनमुराद गप्पा गोष्टी करीत घालवीत असत. निदान त्या दिवसापुरते तरी नेहमी रुपये आणे पैन्या रुक्ष व्यवहारात निमग्न असणारे मि. लॉरी कांही वेगळयाच वातावरणात विहरतांना आढळत असत. असे त्या दिवसापुरते तरी स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व विसरून, डॉ. मॅनेटच्या कुटुंबांतील एक अविभाज्य घटकच ते बनून जात अतिशयच आनंद वाटत असे त्याना त्या घरात आगामी आनंदाच्या त्या घटकेची ते आठवड्यांतील साही दिवस जसे अगदीं आतुरतेनें वाट पहात बसलेले असत. आणि आत्ताही त्याच आनंदाच्या आशेनें ते प्रसन्नपणें तसे डोलत डोलत डॉक्टर मॅनेटच्या घराजवळ येऊन पोंचले आणि त्यानीं दारावरील घंटा वाजवली

"आहेत का डॉक्टर घरात?" दार उघडणाऱ्या बाईला त्यांनीं विचारलें

"येतील आतां इतक्यांत"

"आणि मिस ल्यूसी?"

"त्याही येतील आतां."

"आणि आपल्या मिस प्रॉस?"

आतां मात्र उत्तर देण्याची बाईला पंचाइत पडली. काय द्यावें उत्तर, आहेत म्हणाव कीं नाहींत? कारण मिस प्रॉसची लहर कशी असेल त्याचा काय नियम.

"पण मी तर आतां आलोंच आहे," तिचा गोंधळ पाहून लॉरी म्हणाले, "मी जातों वर."

त्यानीं वर जाऊन आंत प्रवेश केलेली ती खोली म्हणजे आपल्या मालकिणीच्या अभिजात रसिकतेच मूर्तिमत प्रतीकच होत. मिस मॅनेटला आपल्या त्या जन्मभूमीची जरी कांहींच आठवण नव्हती तरी त्या रसिक शहराची

सौंदर्याभिरुची नि कोंड्याचा मांडा करण्याचं नाजुक कौशल्य निसर्गत च जस तिच्या आंगांत उतरल होत. खोलीतील प्रत्येक वस्तू कशी दिसण्यात तर साधी पण मोठी टापटिपीनें नि चोखंदळ वृत्तीनें एकमेकाना पार्श्वभूमीप्रमाणे होऊन आपल्या सभोंवार सौंदर्यनिर्मिती करीत होती. प्रसन्नपणें आपल्या सभोंवार पहात उभ्या असलेल्या मिस्टर लॉरींना खोलीतील प्रत्येक वस्तू जशी काहीं अभिमानानें, कां कशी आहे आमच्या मालकिणीची अभिरुची, असें मूकपणेंच आव्हानपूर्वक सवाल करीत होती. आणि मिस मनेटवर आधींच निहायत खुष असलेले बिचारे लॉरी तरी, निर्भेळ पसतीखेरीज दुसरं काय उत्तर देणार होते ?

ल्युसीच्या खोलीला लागूनच डॉक्टराची कन्सल्टिंग रूम — आणि इथेंच सगळ्यांचें जेवणखाणहि उरकत असे — आणि त्याच्या पलीकडे त्यांचें शय्यागार. तिथेच खोलीच्या एका कोपऱ्यांत, वापर नसलेला एक ओबड धोबड ठेंगणासा बांक आणि त्यावर त्याची तीं जोडे शिवण्याचीं सारी हत्यार, सेंट अ‍ॅटॉईनमधील त्या दारू दकानाच्या पाचव्या मजल्यावरील भिकार अधाऱ्या खोलीतल्या प्रमाणेंच, आतांहि तशीच पसरलेलीं दिसत होतीं

" आपल्या हालअपेष्टांची हीं स्मृतिचिन्ह अजून कशाला यानीं जवळ बाळगलीं आहेत कोण जाणे ! " तिकडे दृष्टि जाऊन लॉरी उद्गारले.

" त्यांत कसल आल आहे एवढ आश्चर्य ? " एकदम आवाज झाला नि लॉरींनीं दचकून तिकडे पाहिलें

डोव्हरमधील रॉयल जॉर्ज हॉटेलच्या आवारात पांच वर्षांपूर्वी प्रथम परिचय घडलेल्या त्या रक्तवर्ण, रक्तकेश नि रक्तवस्त्र मिस प्रॉसची त्यांना आता सुपरिचित झालेली मूर्ती कमरेवर दोन्ही हात ठेऊन त्याच्यापुढें खडी झाली होती.

" मला आपल वाटल — " लॉरी म्हणत होते

" कुणी विचारल होत गूळ खोबर देऊन ! " मिस प्रॉसनीं फटकारलें आणि मि लॉरींनीं तें मग तेवढच सोडून दिल.

" ह कशी काय आहे तबियत ? " त्याच कठोर आवाजांत पण जरा मवाळीनें प्रश्न आला.

" छान, चागली आहे आपल्या कृपेन," लॉरींनीं नम्रपणें उत्तर केलें; "आणि तुमची ? "

" आपली सुमारच."

"का बर ?"

"कां बरं ! मला माझ्या बाईची मोठी काळजी पडली आहे."

"कां बरं ?"

"अहो कां बर काय कपाळ ! जरा नीट बोला कीं माझं तर कपाळ उठेल अशानी" मिस प्रॉस म्हणाली "पण खरच मला मोठी काळजी पडली आहे"

"कारण कळेल कां मला त्याच ?"

"तिच्या जोड्याशी सुद्धां उभं राहण्याच्या लायकीचीं नाहींत, अशी माणस नाहीं मला खपत तिच्या जवळ आलेलीं." मिस प्रॉस म्हणाली

"कोण कोण येनात असे ?"

"कोण कोण ? अहो शेकडों !" मिस प्रॉस म्हणाली अशी अतिशयोक्ती करण्याची तिला खोडच होती.

"अस्सं !" काय बोलाव हें न समजून लॉरी उद्गारले

"अशीं हज्जार तऱ्हेची माणस येत असतात नेहमीं, तुम्ही ती सुरवात केल्यापासून —"

"मी सुरवात केली मिस प्रॉस ?"

"नाहीं ? त्या थडग्यांतून बाहेर कुणी आणल तिच्या वडीलांना ?"

"ओ ! ती सुरवात होय —" लॉरी म्हणाले.

"नाहींतर काय, अखेर ? बाई बाई ! पण तेव्हांपासून असमे येनाहेत ते मेले, तिला माझ्यापासून दूर करण्यासाठीं."

तिला वाटणार हें वैषम्य लॉरींना माहीत होत, पण आतां दीर्घ परिचयामुळें त्या खडबडीत बाह्य आवरणाखालील तिच्या प्रेमळ नि.स्वार्थी वृत्तीचीहि त्याना पूर्ण कल्पना आलेली होती स्त्रीजातींतील ही निर्मळ लागी प्रेमळ वृत्ती त्यांच्या परिचयाची होती. अंत करणाच्या या निःस्वार्थी जिवट सेवावृत्तीमुळें स्त्रीजाती विषयीं, जगाच्या व्यवहारांत मुरलेल्या मि. लॉरींना अतीशय आदर वाटे. आणि या देवतातुल्य व्यक्तींतच अलीकडे ते मिस प्रॉसचीहि गणना करू लागले होते.

"एकाचीहि कुणाची लायकी नाहीं मेल्याची माझ्या पोरीजवळ येण्याची. सोन्याचा तुकडा आहे माझा तो नि हे कसले मेले सगळे खापरखुटे !" मिस प्रॉस म्हणाली. "एक फक्त माझा सॉलोमन मात्र होता तिला जोड किती सुरेख दिसला असता जोडा दोघांचा. पण ती त्याला अवदसा आठवली ना !"

मिस्टर लॉरीनीं कांहींच उत्तर केलें नाहीं. कारण बाईंच्या त्या दिवळ्या भावाची कीर्ति त्यांच्याहि कानांवर आली होती, आणि मिस प्रॉसला सर्वस्वीं नागवून लोकांच्या घरीं अशी राबायला लावण्याच महत्कार्य केलेल्या त्या दिवाण्याला, चांगला जोड्यानें यथेच्छ बडवावा असच त्यांचं प्रामाणिक मत होत. पण तें या बाईंच्या समोर बोलण्याची मात्र कधींच सोय नव्हती. म्हणून त्यांनीं आपली विषयाला कलाटणीच दिली.

"बरं पण मिस प्रॉस, आपण आता एकटाच आहों इथे म्हणून आपला विचारतों, डॉक्टर ल्यूसीजवळ बोलताना कधीं त्या जोडे शिवण्याच्या काळाचा उल्लेख करतात का ?"

"अहं; कधींच नाहीं"

"आणि तरीहि तें सामान जवळ बाळगल आहे त्यांनी ?"

"हं !" आपली मान हलवीत मिस प्रॉस म्हणाली, "म्हणजे कांहीं ते स्वत:शींच नसतील त्याचा विचार करीत, अस नव्हे."

"पुष्कळ वेळा होत असेल का तस ?"

"अर्थात," मिस प्रॉस म्हणाली.

'आणि तुमची अशी कल्पना धावते — ' लॉरी विचारणार होते, पण मिस प्रॉसनें त्यांना एकदम खडसावलें —

"कल्पना कसल्या धावडवता कपाळाच्या, मिस्टर लॉरी !"

"बर बुवा राहिल; तुम्हांला अस वाटत का — म्हणजे तुमची अशी समजूत आहे का कीं, खूपच त्यांना त्याची आठवण होते म्हणून ?"

"हो, अस तर खर," मिस प्रॉस म्हणाली.

"आणि आपल्या त्या प्रदीर्घ बंदीवासाची कारण परपरा त्यांना काही आठवत असेल, अशी आहे का तुमची समजूत ?"

"माझी समजूत नाहीं नि कांहीं नाहीं. माझी बाळी मला काय एवढ तेवढ सांगेल, तेवढंच मला माहित."

"आणि तें काय — ?"

"तिला ठाम वाटतं कीं त्यांना आठवत आहे तें सार."

"आतां रागावू नका हं मिस प्रॉस, मी विचारतो आहे म्हणून. मी आपला आहे तुमच्यासारखाच साधाभोळा माणूस"

" साधाभोळा ? " मिस प्रॉसनें भुवया उंचावीत विचारलें.

" बर, राह्यल आमच आपल. तर काय म्हणणार आहे मी की, त्यांच्या-सारख्या देवमाणसानें त्या गोष्टीचा कांहींच उल्लेख कसा करू नये कुणाजवळ ? म्हणजे माझ्या सारख्याजवळ जरी नाहीं — म्हणजे तसा पुष्कळ जुना परिचय आहे माझा, आणि हल्लीं तर तो चांगलाच गाढ झाला आहे — पण आपल्या लाडक्या लेकीजवळ सुद्धां नाहीं ? मी काय म्हणतों मिस प्रॉस का, उगीच फाजील चौकशा नाहीं आहेत ह्या माझ्या. पण अतिशय आस्था आहे मला त्या बाबत "

" मला वाटत — माझी नी बुद्धी काय मेलीची पण, " त्याच्या शेवटच्या वाक्यानें जरा मवाळून मिस प्रॉस म्हणाली, " मला वाटत की अतिशय भय वाटत असाव त्यांना त्या गोष्टीच. "

" भय ? "

" होय भय. आणि उघड आहे त्याच कारण मला वाटत अगदी ती आठवणच भयकर आहे मुळीं आणि त्यांची ती स्वत ची विस्मृती पण त्यातू-नच निघाली आहे आपल्या भरल्या ससारातून ते कसे नाहीसे झाले आणि आता हे असे परत ससारांत कसे आले, याची आठवण झाली की परत तीच अवस्था येणार तर नाहीं, याविषयीं त्यांच तरी मन मी म्हणतें नि शक कस बनायच ? त्यानेंच मला वाटत ते तो अप्रिय विषय टाळतात."

असल्या पायाशुद्ध उत्तराची अपेक्षा मिस्टर लॉरीनी कधींच केली नव्हती. " खर आहे तुमच म्हणण " ते म्हणाले. " पण आणखी एक शका आहे माझी, मिस प्रॉस, कीं मनाचा असला कोंडमारा नेहमीं असण हें डॉक्टराच्या दृष्टीन इष्ट आहे का ? या प्रश्नानें अस्वस्थ होतों मी कधींकधीं, आणि म्हणूनच आज झाल तरी हा विषय मी तुमच्याजवळ काढला."

" काहीं इलाज नाहीं बाई, त्याला पण ' " मान हलवीत मिस प्रॉस म्हणाली. " त्या विषयाच्या नुसत्या वासानें सुद्धां ते अगदीं बेचैन होतात. आहे तच ठीक आहे झाल, आपला कांहीं इलाज नाहीं त्याला. मधूनच ते रात्रीचे कधी असे एकदम उठतात नि सारखे आपल्या खोलींत फेऱ्या मारीत राहतात आपल्या त्या जुन्या तुरुगांतल्या खोलींतच त्यांच मन जस, असं सारख मागे पुढे फेऱ्या मारीत असत. माझ्या पोरीन ओळखल आहे ते आतां सार. ती आपली मग

निमूटपणें उठते नि एक अक्षरही न बोलतां त्याचा हात घट्ट पकडून तशीच त्याच्याबरोबर फेऱ्या मारीत राहते आणि तिच्या त्या नुसत्या जवळ असण्या-नेंच ते हळूहळू शांत होतात मग."

बाहेर आतां पावलांचा आवाज ऐकू येऊं लागला आणि आपल्या जागेवरून उठून मिस प्रॉस म्हणाली, "हां पहा आलेच ती दोघ, आणि आता होईल त्या मेल्यांची पण सुरवात ! "

पावलांचा आवाज जवळच झाला आणि घाई घाईनें दाराजवळ जाऊन मिस प्रॉसनें दार उघडल्यानतर डॉक्टर मॅनेट व ल्यूसीनें आंत प्रवेश केला

इतर वेळीं रागीट नि तुसडा दिसणारा मिस प्रॉसचा चेहेरा आता आनदानें नुसता फुलला होता आपल्या लाडक्या ल्यूसीच्या अंगावरील शाल नि डोक्यावरील बॉनेट हलक्या हातानें दूर करीत तिनें तिच्या त्या घनदाट तुळतुळीत केसांवरून मोठ्या प्रेमानं हात फिरवला आणि तिला लाडीकपणानें थोपटीत तिच्या ल्यूसीनेंहि तिला, 'पुरे ग आतां, किती करशील कौतुक,' असे हळूहळू पुटपुटत तिच्याकडे मोठ्या प्रेमानें पाहिलें डॉक्टर साहेबहि त्या दोघींकडे प्रेमळपणें पहात, "खरच मिस प्रॉस फारीच लाडावली आहे तुम्ही तिला न हींतरी, असं तोंडानें म्हणत पण आपल्या नुसत्या दृष्टिक्षेपानेंच आपल तिच्यावरील ओसंडत असलेलें प्रेम व्यक्त करीत उभे होते आणि अजून पर्यंत संसार या नांवास पूर्णपणें पारखे असलेले मिस्टर लॉरीहि हृदय उचंबळून असल्या स्वर्गानंदाचा लाभ आपल्या उतरत्या वयात आपल्याला करून दिल्याबद्दल परमे-श्वराचे मनःपूर्वक आभार मानीत त्या प्रेमळ दृश्याकडे पहात किती वेळ तरी उभे होते

त्या तसल्याच प्रसन्न प्रेमळ वातावरणात गप्पा गोष्टी करीत नि मिस प्रॉसच्या पाककौशल्याचा मनमुराद आस्वाद घेत त्यांचें जेवण चाललें होतें तरी अजू-नहीं त्या चौघां व्यतिरिक्त कोणीहि माणसानें आंत येऊन मिस प्रॉसच डोक उठवलं नव्हतं तिने ते शेंकडो लोक अजून तरी कोणी उपस्थित झाले नव्हते, आणि तिचाही जीव म्हणून अगदीं आनदांत होता आणि मग जेवणानंतरच्या मद्यप्राशनाला सुरुवात झाल्यानतर तर मिस्टर लॉरींच्या हातांतील कप सारखा भरलेला ठेवण्याची खबरदारी तिनें आपल्याकडेच घेतली होती पण बाहेर दार वाजलं आणि चार्लस डार्नेनें सर्वांना अभिवादन करीत नेहमीप्रमाणें आंत प्रवेश

केला. मिस प्रॉसच्या कपाळावर आंठ्याचें जाळें पसरलें नि एकदोन सेकंदांतच तिनें बाहेर पाऊल टाकलें.

डॉक्टराची स्वारी आज अगदीं खुशींत होती. आणि त्या तशा प्रफुल्लावस्थेंत त्यांच्या नि त्यांच्या लाडक्या लेकीच्या चेहेऱ्यांतील साम्य अतीशय उठून दिसे. आत्तांही त्यांचा हात तिच्या खुर्चीच्या पाठीवर ठेवलेला होता नि तिचें मस्तक त्यांच्या खांद्यावर विसावलेलें असतांना त्या दोघांच्या चेहेऱ्यांतील साम्य मोठें आनंददायक होतें अनेक विषयांवर अतीशय उल्हासानें आज ते सारा वेळ बोलत होते इतिहासप्रसिद्ध जुन्या इमारतींच्या बांधकामाविषयीं त्यांची आतां चर्चा चालू होती

" डॉक्टर, तुम्ही लंडन टॉवर पाहिला आहे का कधीं नीट ? " चार्लस डार्नेनें मधेंच विचारलें.

" ल्यूसी नि मी गेलों होतों तिथें, पण आपला वरवरच पाहिला आम्हीं तो "

" मीहि पाहिला आहे तो, पण जरा निराळ्या नात्यानें " किंचित हसत पण रागाची छटा चेहेऱ्यावर येत असता डार्ने म्हणाला " एक मजेशीर गोष्ट ऐकली मी तिथें असतांना "

" कसली बाई ? " ल्यूसीनें विचारलें.

" कांहीं दुरुस्ती चालली होती तेव्हां त्या जुन्या तुरुंगाची कितीतरी दिवस न वापरलेल्या एका कोठडीत ते कामकरी आले आणि खालच्या दगडी जमिनीच्या दरजा ते भरीत असतां, एका दगडावर कांहीतरी ओबडधोबड हत्यारानें डी. आय. सी. अशीं कशीबशीं खोदलेला अक्षरें त्यांनीं पाहिलीं. मग जरा नीट निरखून पहातांच तें शेवटलं अक्षर सी नसून जी आहे असं त्यांना दिसलं. कुणाच्या तरी नांवाचीं तीं आद्याक्षरं असतील असं वाटलं आरंभी. पण एकानें त्यांचा डिग असा शब्दोच्चार केला आणि मग त्यांच्या डोक्यात प्रकाश पडून त्यांनीं तो दगड खणून त्याच्याखालीं पाहिलें कुणीतरी अज्ञात प्राण्यानें पेटीच्या आकाराचं काहींतरी तिथें लपवून ठेवलं होत."

" बाबा, बाबा, बरं नाहीं वाटत तुम्हांला ! " ल्यूसी उद्गारली.

डॉक्टर मॅनेट एकदम बसल्या जागेवरून चमकून उठून उभे राहिले होते आणि त्यांनीं आपल्या हातानीं आपलें मस्तक घट्ट दाबून धरलें होतें. त्यांच्या त्या उद्विग्न चेहेऱ्याकडे दृष्टी जातांच सर्वांच्याच तोंडचें पाणी पळालें.

" काहीं नाहीं बाळ, काहीं विशेष नाहीं. पावसाचे थेंब वाजले एकदम नि मी दचकलों."

त्यांनीं स्वतःला अतिशय चपळाईनें सावरलें होतें. पावसाचे मोठे मोठे थेंब आतां बाहेर खरेच पडत होते. आणि डॉक्टरांच्या चेहेऱ्यावर एक क्षणभरच उमटून दिसेनासे झालेले ते भाव आपण खरेच पाहिले कीं नाहीं अशी मि. लॉरीनाहि शंका आली.

" अशा बारीकसारीक आकस्मिक गोष्टींना मी अजुन असाच दचकतों, आणि आत्ता या पावसानेंच दचकलों मी " डॉक्टर परत सांगत होते.

मिडने कार्टननें आतां आंत प्रवेश केला पण मिस प्रॉसच्या शेंकडों लोकांचा अजून कुठेंच पत्ता नव्हता.

हवेंतील उष्मा आता बराच वाटला होता आणि खोलीच्या सर्व खिडक्या उघड्या टाकून जरी ते सर्वजण बसले होते तरी उकाड्याचा त्रास त्याना होतच होता त्यांच्या समोरील चहाचे कप उचलल्यानंतर सर्वजण त्या मोठ्या खिडकी-जवळ सरकले ल्युसी पहिल्यासारखीच डॉक्टराजवळ बसली होती, डार्ने तिच्या जवळच बसला होता आणि खिडकीला टेकून कार्टननें आसन ठोकलें होतें

" किती मोठाले येताहेत हे थेंब, पण किती सावकाश " डॉक्टर मॅनेट म्हणाले

" पण न थांबतां सारखे येताहेत थेंटे " कार्टननें पुस्ती जोडली

आगामी वादळाच्या हल्ल्यापासुन स्वतःचा बचाव करण्यासाठीं बाहेर रस्त्या-वर लोकांची आता एकच धांवपळ चालली होती कितीतरी लोकांच्या पायांचा आवाज त्यांच्या कानावर येत होता. पण प्रत्यक्ष अशी एकहि व्यक्ती त्याना दिसत नव्हती.

" असंख्य लोकांच्या पावलांचा आवाज होतो आहे पण तसा पाहिला तर मात्र अगदीं एकांत आहे इथे " बाहेरील आवाजाकडे कान देत डार्ने म्हणाला.

" आणि हे सार वातावरण कस गूढ गंभीर वाटत आहे — नाहीं?" ल्युसीने विचारलें " अशीच संध्याकाळची कधीं कधी बसतें मी इथे, आणि मग मला आपला भास होतो — पण आज हें बाहेर असं सारं भयाण नि गंभीर दिसत असतां त्या भासाच्या नुसत्या कल्पनेनेंच आंगावर कसे शहारे येत आहेत."

" आम्हालाहि होऊ द्या की त्यांत समभागी. "

" अ ह ! ज्याच्या त्यालाच असल्या कल्पना भयद गूढ अशा वाटतात; त्या अशा सांगतां नाहीं येत पण मला तर अनेक वेळां, अस इथें संध्याकाळच बसलेल असतांना वाटतं कीं, मला ऐकू येणारा हा पावलांचा प्रतिध्वनि आपल्या आयुष्यांत असा खरोखरीच कधीं तरी प्रवेश करणार आहे "

" येणारहि असेल तो आपल्या आयुष्यांत, कुणी सांगाव !" उदासपणें सिडने कार्टन उद्गारला

बाहेरील पावलांचा प्रतिध्वनि अजूनहि तसाच वाटल्या वेगानें त्या सर्वांच्या कानावर सारखा येत होता. कित्येक वेळां तर तो इतका जवळून ऐकू येई कीं, आपल्या त्या खिडकीखालींच तो होत आहे कीं काय असें वाटून सर्वांचेच डोळे तिकडे न कळतच वळत पण तो आवाज तिकडे दूर रस्त्यावर होत होता आणि त्यांच्या दृष्टिपथांत एकहि माणूस येत नव्हतें

" हा आवाज आपल्या सर्वांच्याच आयुष्यांत यायचा आहे मिस मॅनेट, कीं आपल्यांत तो वाटून जायचा आहे ? "

" मला नाहीं सांगता येत मिस्टर डार्ने, माझी वेडीची आपली कल्पना आहे ती, नुसता भास. त्याच्या आहारीं गेलें मी, नि मला वाटल कीं माझ्या नि माझ्या बाबांच्या आयुष्यात येणाऱ्या माणसाच्या पावलांचाच आवाज आहे तो "

" मीहि त्यांत एक भागीदार होतों ! " कार्टन म्हणाला. " कांहींहि अधिक न विचारतां किंवा कांहीं कमला करार वायदा न करता त्या आत्तां चमकलेल्या विजेच्या उजेडांत मलाहि दिसतो आहे तो प्रचंड लोकसमुदाय " खिडकीतून बाहेर डोकावून पहात असतां झालेल्या विजेच्या चमचमाटाकडे बोट दाखवीत तो म्हणाला " तो पहा, त्यांच्या पावलांचा आवाजहि मला ऐकू येतो आहे ! " बाहेर होत असलेला कडकडाट थांबल्यावर तो पुढे म्हणाला " ते पहा कसे धांवत पळत, रागानें वेडेपिसे होत आपल्याच दिशेनं उसळत येत आहेत ! "

बाहेर परत एकदां तो कानठळ्या बसवणारा आवाज काहा वेळ होत होता, आणि मग अगदीं आकाश फाटल्यासारख्या पावसाच्या सरीवर सरी विजेच्या थयथयाटांत किती तरी वेळ सुसाट खालीं कोसळत होत्या. पण मध्यरात्रीच्या

सुमारास मात्र त्यांचें तें तांडवनृत्य संपून चंद्राचें प्रसन्न बिंब त्या मुस्नात धरित्रीवर शांतपणें प्रकाशू लागलें.

सेंट पॉलच्या देवळांतील त्या भल्या मोठ्या घटेनें खणखणीतपणें एकाचा टोला दिला, आणि सर्वजण आपआपल्या जागेवरून उठले

"गुडनाइट मि कार्टन," मि. लॉरी म्हणाले. "गुडनाइट मि डार्ने."

"आपल्या सर्वांच्या आयुष्यांत अशी एकत्र रात्र घालविण्याचं भाग्य पुन्हां कधीं असेल काय!"

असेलहि कदाचित. किंवा भवितव्यता कदाचित कांही निराळ्याच तऱ्हेनें कालपटावरील त्यांची हलविणार असेल, कुणी सांगावें!

---

## .... ३ ....

राजशाही पॅरिसच्या त्या राजशाही हॉटेलांत मॉस्यूर दि मार्किस त्यादिवशी ते दर पंधरवड्यास देत असलेल्या राजशाही खान्यासाठीं आज उपस्थित झाले होते त्यांच्या त्या एकांत खाजगी खोलींत त्याच्या खास तैनातींतील नोकरांची त्यांच्याभोंवती धांदल चालली होती तिकडे चारचौघात आपला खाना आपल्या वैभवास साजेल इतक्याच नाजुकपणें उरकण्यासाठीं खान्याच्या पूर्वी थोडीशी बादशाही पोटपूजा उरकून घेण्याचा त्याचा नेहमींचा परिपाठ असे. आणि ती उरकून मगच ते बाहेरील त्या गजबजलेल्या प्रशस्त दिवाणखान्यांत मोजून पावलें टाकीत प्रवेश करीत आत्ताही नोकरांची एक चौकडी त्यांचें आवडतें चॉकोलेट त्यांना सादर करीत होती एक जण चॉकोलेटचें भांडें प्लेटवर धरून आदरपूर्वक जवळ उभा होता, दुसरा मालकांचा पांढरा शुभ्र रेशमी रुमाल त्याच्या मानेखालीं धरून उभा राहिला होता, तिसरा हातांतील सोनेरी चमच्यानें चॉकोलेट मालकांच्या घशाला सोसेल इतकेंच गरम ठेवण्याची कोशीस करीत होता, आणि चौथा तें तशाच एका सोनेरी चमच्याच्या मदतीनें मोठ्या आदरपूर्वक तें मालकांच्या नाजूक ओठांच्या आंत मोठ्या कौशल्यानें अलगत सोडून देत होता. या सर्व समारंभात कांही चूक झालेली मॉस्यूरनां

कधींच खपली नाहीं. कारण तसं झालं तर आपल्या विमलयश कुलाला कधींच न पुसला जाणारा तो कलकच लागेल अस त्यांचं प्रामाणिक मत होत.

मॉस्यूर दि मार्किसचें लक्ष कामापुरतें जरी दरबारी कामाकाजांत कधीं कधीं गढलेलें दिसलें तरी, नाचरग, ख्याली खुशाली, गाण बजावण नि खाना पीना यांतच त्याच अतरग स्वतःला नेहमी विसरून जाई. सर्व कांहीं काम स्वत त्याच गतीनें पुढें पुढें जात असतात, त्यांत आपण ढवळाढवळ करण्याच कांही कारण नाहीं, आणि साऱ्या कामाच पर्यवसान स्वतःची तुबडी थोडी फार तरी भरण्यांत झालच पाहिजे अशीच त्यांची कार्यपद्धति असे. स्वत.च्या चैन सुखसोयींबाबत तर सर्व जग हें आपल्याच सुखाकरता निर्माण झाल आहे, अशा अभिनिवेशानेंच त्यांची सर्व हालचाल होत असे. 'हें सार जग आणि त्यांतील साऱ्या चेतन अचेतन वस्तू मजयाचसाठीं आहेत,' हेंच त्यांच जम कांहीं एक ब्रीद-वाक्य होत.

स्वत ची ती छोटी हुजरी मपवून हातांतील रत्नजडित सोनेरी डबीतील सुगंधी तपकीर हळुवारपणें आपल्या नाजूक नाकपुड्यांत ओढीत मॅस्यूरदि मार्किस बाहेरील दिवाणखान्यांत आतां प्रवेश करीत होते. तो वैभवशाली प्रशस्त दिवाणखाना निमन्त्रित पाहुण्यांनीं, त्या राजशाही विलासी पॅरिसमधील नादान लक्ष्मीपुत्रांनीं नि त्यांच्या मापुक छेलछबेल्यांनी, आणि उच्च अधिकार पदस्थ तितक्याच नादान पण अहमन्य विलासी दरबाऱ्यांनी, नुसता गजबजून गेला होता युद्धकौशल्य आणि शौर्य यांच्या अभावानेंच तळपणारे लष्करी अधिकारी, दर्याचें कधीं तोंडहि न पाहिलेले दर्यासारग, स्वत च्या खाम खाऱ्यांचें शून्य ज्ञान असलेले मुलकी अधिकारी आणि ऐहिक सुखविलासांत आकंठ बुडालेले विषयासक्त धर्माध्यक्ष, या साऱ्या बड्या बापके बेट्यांची खानेसुमारी, त्या दिवाणखान्यांत चौफेर नजर फिरवल्याबरोबर कोणालाहि बसल्याजागींच करता आली असती. कांहींहि ज्ञान नसलेले पण सर्वज्ञतेची घमेंड मिरवणारे, असले वशिल्याचे बजरबट्टूच आपल्या मॉस्यूर दि मार्किसप्रमाणें अधिकाराच्या सर्व जागांवर वावरतांना तेव्हां दिसत असत. येन केन प्रकारेण स्वत ची तुबडी भरणाऱ्या, राज्ययन्त्रांतील सर्व राज वा वाममार्गावर असल्याच नादानाचा नाच त्या काळांत चालू होता आणि राष्ट्राचें किंवा राष्ट्रपुरुषाच्या असख्य घटकांचें उतू जात असलेलें दैन्य मात्र या कोणाच्याच धुंदकारलेल्या दृष्टीस कधींच पडत

नव्हतें. किंवा कांहींच्या चुकून कधीं पडलेंच तरी या क्रियाशून्य वाचाळांच्या अगडबंब शब्दजजाळांत तें बिचारें इतकें गुदमरून जाई कीं त्याची कधीं कुणाला ओळख पटणेंच अशक्य होऊन जाई; मग त्याच्या निवारणाचे खरे उपाय कृतींत कधीं काळीं उतरणें तर सुतराम अशक्यच होतें.

आणि विलासी पॅरिसमधील या सर्व बड्या अमलदारांच्या विलासी गृहमंदिराकडे जरी कोणी दृष्टि फिरवली असती तरी, स्वतःच्या निसर्गप्राप्त कर्तव्यांना कधींच मूठमाती देऊन, नि त्याच जुलमी निसर्गानें त्यांच्या उदरीं जन्मास घातलेल्या आपल्या कोंवळ्या बाळांना मोलाच्या मोलकरणींच्या आगावर टाकून, त्यांच्या त्या गृहांगना बाजारबसवीलाहि मागें टाकील अशी स्वतःच्या देहेच्या-मोहऱ्यांची भडक रंगरंगोटी करून, आजच्या खान्यासारख्या विलासी मंदिर वातावरणांत स्वच्छंद विहरतांना त्यांना दिसल्या असत्या अपत्यांना या जगाचें दर्शन घडविण्याव्यतिरिक्त मातेचें कोणतेंच कर्तव्य आस्थेवाईकपणें करण्याचें प्रयोजन या नाचऱ्या गृहदेवतांना कधींच वाटलें नाहीं गोरगरिबांच्या बोजड जायकांचेंच तें काम, आणि त्यांनीच तें केलें पाहिजे पण लक्ष्मीवंतांच्या घरांतील गाठीच्या घरांत प्रवेश करीत असलेल्या आजीबाईंनी मात्र झकपक पोशाक करून, विशीच्या आसपास पदन्यास करीत असलेल्या मुग्ध यौवनांसारखें असल्या खान्याच्या वेळीं हजर असण्याचें काम न चुकतां करीत असायच.

यजमानांचा आतां दिवाणखान्यांत प्रवेश झाल्याबरोबर त्या नटव्या वातावरणांत नवचैतन्याचा संचार झाल्यासारखा दिसूं लागला बाहेरील बाजूस बसलेल्या वाजंत्र्यांनी आपआपल्या वाद्यांवर जोरदार आघात करून वाद्यलहरींनीं तो दिवाणखाना दुमदुमून सोडला मॉस्यूर दि मार्क्वेस पाहुण्यांच्या रांगांतून अभिवादनांनी नि स्वागताची फेर झाडीत, हातांतील त्या रत्नजडित तपकिरीच्या डबीवर बोटांनें मधूनच ठोका देत हिंडूं लागले ललनागणांच्या नाजुक हास्यलहरींनीं नि सुवर्णवलयध्वनींनीं आणि मद्यचषकांच्या किणकिणाटानें तें सर्व वातावरण निनादून जाऊं लागलें, आणि मग टेबलावरील खाद्यपेयांचा समाचार अतिशय आपुलकीनें घेण्यास सर्वांनी सुरुवात केली.

तब्बल दोन तासांच्या अवधीनंतर तो खानपानसमारंभ आटोपून निमंत्रित पाहुणेमंडळी घरमालकांचा निरोप घेत दिवाणखान्याबाहेर पडूं लागली. दिवाणखान्याच्या दाराशींच यजमानसाहेब उभे राहून तपकिरीचा आस्वाद

मधूनच घेत नि देत सर्वांना निरोप देत होते शेवटच्या पाहुण्यानें बाहेर पाऊल टाकल्याबरोबर मॉंस्यूर दि मार्किसहि बोटांवरील तपकीर झटकीत, व्हरांड्याच्या दुतर्फा भिंतींना लावलेल्या पूर्ण उंचीच्या बिलोरी आरशांच्या रांगेंतून हस्त करीत खाली आंगणांत आले. साठीच्या उमरीचे होते आज ते तरीहि पण त्यांच्या पोशाकांतील ती टापटीप नि झकपक आणि चेहेऱ्यावरील तेज नि रंगेल-पणा अजून एखाद्या तरुणासारखाच कायम होता चेहेरा नितळ पण खुनशी, बारीक सरळ, पातळ आरक्त नाकपुड्या असलेलें नाक, ओठांची कुरेवाज ठेवण आणि निळ्या भोर डोळ्यांतील विलासी, जहरी पण क्रौर्याची चमक, त्या तांबूस गौर चेहेऱ्यावर खुनशीपणाची झांक उत्पन्न करीत नाही तर तसा त्यांचा चेहेरा त्यांची गणना नेहमीच सुंदर पुरुषांत करी.

साहेबांनी गाडींत पाऊल टाकलें आणि घोडे चौखुर उधळत धावू लागले. कोचमन जसा आंगांत आल्यासारखा, किंवा शत्रुपक्षावर वेगानें चाल करून जात असल्यासारखा वाटेंतील पादचाऱ्यांच्या अस्तित्वाची मुळींच दखल न घेता, बेगुमानपणें आपल्या घोड्यांना पिटाळीत होता बिचारे वाटसरू आपले प्राण वांचविण्यासाठीं त्याच्या वाटेंतून पळत पळत कसेबसे दूर होत गाडीच्या मालकालाहि याचें कांहींच न वाटून उलट अभिमान वाटल्यासारखाच तो त्या सैरावैरा पळणाऱ्या दुबळ्यांकडे पहात आंत बसला होता अशा तऱ्हेनें गरीबाच्या प्राणांची फिकीर न करतां आपल्या गाड्या चौफेर उधळीत रस्त्यानें जाण्याची त्या भाग्यवान् लक्ष्मीपुत्रांना सवयच होती आणि शहरांतील त्या दुर्दैवी कंगालांनाहि जीव असे मुठींत धरून रस्त्यांतून हिंडण्याची सवय झाली होती.

त्या दगडी रस्त्यांवरून आपल्या लोखंडी धांवांचा कानठळ्या बसण्यासारखा खडखडाट करीत, चिंचोळ्या कोपऱ्यांवरूनहि वेग तिळभरहि कमी न करतां ती गाडी तशीच बेगुमानपणें दौडत पुढें जात होती वाटेंतील बायाबापड्या भयानें किंचाळत दचकून बाजूला पळत, आपल्या पोरांना कसेंबसें जीवत ठेवीत होत्या आणि एकमेकाना घट्ट पकडून त्या तुफान घोड्याच्या टापांपासून स्वत ला बचावीत इतर दुबळे जीवही जीव घेऊन बाजूला होत होते अखेरीस त्या कारंजाजवळील कोपऱ्यावरून वडाडत पळत असतां गाडीच्या चाकाना कसला तरी बारीक धक्का बसला नि भयद किंचाळ्यांच्या झालेल्या आवाजानें चमकून ते पिसाटासारखे धावणारे घोडे दोन पायांवर उभे राहून थैमान घालू लागले.

ते घोडेच जर असे बुजले नसते तर गाडी तशीच काय झालें याची पर्वा न करतां पुढें दौडत गेली असती. मोडला असेल कोणाचा हातपाय फार तर, त्याची कोण पर्वा करतो, आणि काय म्हणून? पण तो घाबरलेला चपराशी आतां खालीं उतरला होता आणि आजूबाजूचे दहावीस हातहि घोडयांच्या लगामाला घातले गेले होते

"काय झाल रे?" बाहेर पहात शांतपणे मॉस्यूरनी विचारलें.

एवढ्या वेळांत डोक्याला लोकरीची गोंडे टोपी असलेल्या एका उंच काठीच्या माणसानें घोड्यांच्या टापामधून एक लहानसें मुटकुळें बाहेर काढलें होतें आणि कारजाच्या पायथ्याशीं तें ठेवून नि खालील चिखलांत बैठक मारुन एखाद्या जनावरासारखा तो ओरडत होता.

"माफ करा, मॉस्यूर दि मार्किस!" एक चिंध्या पांघरलेला माणूस नम्रपणे म्हणाला, "एक लहान मूल आहे तें!"

"पण ओरडतो आहे कशाला तो असा मुर्दाडासारखा? त्याचच आहे का तें?"

"होय मॉस्यूर—दुर्दैव बिचाऱ्याचं!"

त्या कारजाजवळील जागा थोडी खली होती. तो उंचेला माणूस तिथून एकदम उठून धांवतच गाडीजवळ आला आणि त्याला पाहून मॉस्यूरचे हात झटकन् तरवारीच्या मुठीकडे गेले.

"पार चेंगरुन गेला!" आपले हात आवेगानें वर उंच करुन त्याच्याकडे टक लाऊन पहात तो माणूस पिसाटासारखा किंचाळला. "ठार झाला आहे पार!"

चौकांतले सारे लोक आतां गाडीभोंवतीं गोळा झाले होते पण त्यांच्या चेहेऱ्यांवर संताप किंवा दहशतीचें कांहींच चिन्ह दिसत नव्हतें. किंवा कोणी कसलाच चकार शब्द काढीत नव्हता. मॉस्यूर दि मार्किसनीं आपले डोळे, आपआपल्या बिळांतून बाहेर पडलेल्या त्या भेदरट उंदरांवरून एकदां चौफेर फिरवले, आणि त्यांनी आपली पैशांची पिशवी बाहेर काढली.

"मला नवल वाटत मोठं तुम्हा लोकांचं," ते म्हणाले; "आपली नि आपल्या पोरांची एवढीहि काळजी घेतां येऊ नये तुम्हाला? कुणीतरी रोज असं

अडमडत असत रस्त्यांत. माझ्या घोड्यांचा पायबीय सुद्धां दुखावला असेल कदाचित् ह, हें बघ ! हें दे त्याला."

" आपल्या हुजऱ्याकडे त्यानीं एक सुवर्णमुद्रा भिरकावली आणि साऱ्यांच्या माना नि डोळे त्या दिशेला वळले. तो उंचेला म्हणूस परत एकदां भेसूरपणें किंचाळला, " अगदी पार चेंदामेंदा ! "

त्या गर्दीतून वाट काढीत आतां कुणीतरी पुढें येत होता. त्याला पाहिल्या-बरोबर कारंजाजवळील त्या गोळ्याकडे बोट करून तो दुर्दैवी पिता त्याच्या खांद्यावर डोकें टेकून स्फुदस्फुदून रडू लागला. कांहीं बायाहि आतां त्या थडगार गोळ्याजवळ उभ्या राहून मूकपणें अश्रू ढाळीत होत्या.

" मला कळल आहे सार बाबा," आत्तां आलेली ती व्यक्ति म्हणाली. "पण असा धीर नको सोडू गॅसपर्ड ! हें असल जिण जगण्यापेक्षां तें बापड देवाघरीं गेल, तेंच चांगल नाहीं का ? एका क्षणात बिचार कांहींहि यातना न होतां कस पार झाल ! एकदोन तास तरी अस सुखान जगलं असत का तें ? "

" शाबास ! मोठा तत्त्ववेत्ता दिसतोस तू." हसत हसत मार्किस उद्गारले. " नांव काय बर तुझं ? "

" डेफार्ज म्हणतात मला."

" आणि धंदा ? "

" दारूविक्या आहे मी, मॉस्यूर द मार्किस."

" अहो तत्वज्ञानी, ही घ्या तर तुम्हांला चिरीमिरी," त्याच्याकडे आणखी एक सुवर्णमुद्रा फेंकीत मॉस्यूर म्हणाले, " कायरे, घोडे आहेत ना शाबूत ? "

आणि पुन्हा त्यांच्याकडे दृष्टीहि न टाकतां ते मागें आपल्या गादीला टेकले. जशी कांहीं एखादी सामान्य वस्तूच त्यांच्या हातून फुटली होती आणि पैशाच्या मिजाशींत त्यांनीं तिची किंमतहि तितक्याच दिमाखांत देऊन टाकली होती. गाडी आतां चालूहि झाली असती. इतक्यात खण् असा आवाज करीत एक नाणें आंत गाडींत पडलें. बाहेरून कुणीतरी तें आंत भिरकावलें होतें.

" थांब रे, घोडे आवर ! " रागाचा पारा वर चढलेले मॉस्यूर म्हणाले. " कुणी भिरकावलं तें ? "

एका क्षणापूर्वीच डेफार्ज उभा असलेल्या जागेकडे त्यांनीं दृष्टि फेंकली. पण डेफार्ज तेथून निघून गेला होता नि तो दुर्दैवी पिता त्या जागीं गडबडां लोळत

होता — आणि त्याच्याच जवळ एक कृष्णवर्ण धिप्पाड स्त्री विणकामाच्या सुया चालवीत आतां उभी होती.

" भिकार कुत्रीं कुठली ! साऱ्यांना लेकांना अशींच गाडीखालीं तुडवून नरकांत रवाना केलीं पाहिजेत. कोण तो बदमाष आत्तां असा जवळ पाहिजे होता, मारे गाडीखालीं असा चुरडून सफा केला असता. "

संपत्तीच्या मदानें धुंद झालेल्या नि सत्तेचा निरंकुश उपयोग करण्यास चटावलेल्या असल्या मॉस्यूरची, अनेक वर्षांच्या अनुभवानें त्या दुर्दैवी जीवांना विलक्षण दहशत वाटत होती. ते सर्वजण आतांहि, हात तर काय पण आपले डोळेहि वर न करता नि एक अक्षरहि न उच्चारतां स्वस्थ उभे होते. ती एक धिप्पाड स्त्रीमात्र मॉस्यूरच्या चेहेऱ्याकडे बेडरपणें सारखी टक लावून पहात होती पण त्यानीं आपली दृष्टि एकदां तुच्छतापूर्वक तिच्यावरून फिरवली आणि गाडीवानास ' चलो,' असें म्हणून ते परत मागें गाडीला टेकले.

गाड्यांमागून गाड्या रस्त्यानें दौडत होत्या आणि लोक तसेच रस्त्यावर त्यांच्याकडे पहात उभे होते. आपल्या मृत बालकाला उचलून तो दुर्दैवी पिता आपल्या शोकाला मोकळी वाट करून देण्यासाठी केव्हांच तिथून निघून गेला होता. त्याच्याभोंवतीं उभ्या असलेल्या त्या बायाहि तशाच कारंजाजवळ त्याच्या वाहत्या पाण्याकडे आणि रस्त्यावरून गाड्यांतून दौडत वहात असणाऱ्या खुशालचेंडूकडे पहात स्वस्थ बसल्या होत्या. त्या धिप्पाड स्त्रीचें विणणें मात्र काळाच्या अखंड गतीप्रमाणें तसेंच चिकाटीनें नि शांतपणें कुठेंहि न पहातां अजून चालू होतें

---

## .... ४ ....

मॉस्यूरची गाडी त्यांच्या खेडयाजवळील टेंकडीच्या माथ्यावर येऊन जरा थांबली होती. पश्चिम क्षितिजाजवळ येऊन पोंचलेल्या सूर्याचे पिवळसर तांबूस किरण आंत सुखासीन बसलेल्या मॉस्यूरच्या गालांना गुलाबी झूब चढवीत होते. सभोंवार पसरलेली सुंदर शेतजमीन पिवळया धमक पिकांनं अगदीं खुलून दिसत होती. पण जरा नीट प्रहातांच समृद्धीची नव्हाळी त्या सर्व दृश्यावर पसरलेली न दिसतां कांहींतरी उदास नाखुशीची छटा त्यांत मिसळलेली दिसून येत होती. जणु काय शेत कसणाऱ्या अर्धपोटी खडकऱ्यांच्या मनाची आणि देहाची उपासमारच त्या पिवळया धमक पण खुरटलेल्या पिकांच्या मूक मुखानें येणाऱ्याजाणाऱ्या व्यक्तींजवळ ती तशी व्यक्त करीत होती

गाडीच्या चाकांना ढकली बांधण्याचें काम झाल्यानंतर टेंकडीच्या उतारा-वरून गाडी खालीं चालू झाली. क्षितिजावर टेकलेल्या सूर्यबिंबानेंहि एकदम खालीं उडी घेतली आणि आकाशात पसरलेल्या लालरंगाची छटा गाडीमागून उसळणाऱ्या धुळीच्या लोटावरहि लाल रंग चढवूं लागली. पण मॉस्यूरची गाडी टेकडीच्या पायथ्याशीं येऊन पोंचतांच आकाशांतील ती भडक रंगपंचमी पार नाहींशी होऊन तिच्या जागीं काळया धूसर छटा आतां पसरू लागल्या होत्या पायथ्याजवळ असलेल्या त्या खेड्यापलीकडे दूर दिसत असलेल्या ऐस-पैस चढावावरील चर्च टॉवर, पवनचक्की, शिकारीचें राखीव रान आणि त्या पलीकडील उंच सुळक्यासारख्या दिसणाऱ्या खडकावरील तो गढीवजा तुरुंग या साऱ्यांवर ती कृष्णछाया आतां क्रमाक्रमानें पसरत होती. आणि घर जवळ आल्याच्या जाणीवेनें मॉस्यूरहि तिकडे पहात स्वस्थपणें बसले होते.

रस्त्याच्या दुतर्फा पसरलेल्या त्या खेड्याकडे दृष्टि जातांच त्यातील यच्चयावत् वस्तूवर सभोंवारच्या माळजमिनीप्रमाणेंच दारिद्र्याची भीषणकळा पसरलेली दिसून येई. खुरटलेल्या नि खगलेल्या देहाचे ते गांवकरी आपआपल्या घरांच्या पुढील दारांतच सायंकाळच्या कांहीं तरी कामांत गुंतलेले आतां दिसत होते. हजार तऱ्हेच्या करांच्या ओझ्याखाली चुरडून गेलेले ते सारे दुबळे जीव कसें तरी जीवन व्यतीत करीत असतांना असेच कोणालाहि दिसले असते. पण त्या

जाचक करांची आठवण झाल्यावर त्यांच्या दुर्बलत्वाचें मग आश्चर्य न वाटतां ते जगले तरी कसे याचेंच विचारवताला नवल वाटलें असतें.

गाडी पोस्टहाऊस गेटजवळ येऊन खडी झाली. मॉस्युरचें आगमन शिंगाड्याच्या उच्च शृंगनादानें आधींच सूचित झालें असल्यामुळें मालकांच्या स्वागतार्थ आपआपले हस्तव्यवसाय कांहीं काळ स्थगित करून ते गावकरी घरांच्या दारातच गाडीकडे नि आंतील मालकसाहेबांकडे नम्रपणें दृष्टिक्षेप करीत मूकपणें उभे होते. मालकांची दृष्टि त्या सजीव प्रेतसमुदायावरून फिरत असतां, त्या जमावांत आत्तांच प्रवेश करीत असलेल्या रस्ते दुरुस्त करणाऱ्या एका मजुरावर ती जातांच त्यांनीं त्याला पुढें बोलावलें.

"आत्ता वाटेंत पाहिल्यासारखा वाटतो तुला?" त्यानें नम्रपणें केलेल्या अभिवादनाचा स्वीकारहि न करतां, मॉस्यूरनी विचारलें. "त्या टेकडीवर चढत असताना आणि माथ्यावर आल्यावेळीं पण ?"

"होय मॉस्यूर, तो अलभ्य लाभ झाला मला."

"पण इतकी टक लावून कुणाकडे पहात होतास तूं ?"

"त्या माणसाकडे पहात होतों, मॉस्यूर"

थोडा खालीं वाकून त्यानें गाडीखालीं बोट दाखविलें त्याच्या सभोंवारचे लोकहि वांकून खालीं पाहू लागले.

'ए हैवान, तो माणूस कोण ? आणि तिकडे गाडीखालीं काय पहातो आहेस ?'

"कसूर माफ, मॉस्यूर, तो तसा तिथे दांडा धरून ढकलीच्या बाजूनें लोंबकळत होता."

"कोण ?'

"तो माणूस मॉस्यूर."

"आग लागली तुझ्या थोबाडाला ! अरे पण नांव काय त्याच गधड्या ? तूं ओळखतोस या भागांतल्या सर्व लोकांना; मग कोण होता तो ?"

"रागावूं नका मॉस्यूर ! पण माझ्या उभ्या जन्मांत मी कांहीं त्याला कधीं पाहिलेला नाहीं.'

"खालीं लोंबकळत होता? धुळीने गुदमरून मेला कसा नाहीं पण?"

" मलाहि तेंच नवल वाटतं आहे, मॉस्यूर. धुळीनें कसा बेटा अगदीं पांढरा पांढरा दिसत होता, ताडमाड उंच, एखाद्या गिऱ्हासारखा. "

गिऱ्हाच्या भूताच्या त्या नामनिर्देशानें ते सारे लोक दचकून एकमेकांकडे दृष्टिक्षेप करीत, मालकांच्या मनावर झालेला परिणाम पहाण्यासाठीं मॉस्यूरकडे पहात राहिले.

" शाबास रे बेट्या; तो बदमाष माझ्या गाडीखालीं दडलेला तूं पाहिलास, पण तुझं थोबाड जरा उघडण्याची सुद्धां तुला इच्छा झाली नाहीं. वा ' मासिअर गॅबेल, करा त्या गधड्याला दूर ! " मालकांच्या झालेल्या आगमनाबरोबर लगबगीनें बाहेर आलेल्या नि त्याच्या पुढें पुढें नाचणाऱ्या पोस्टमास्तरांकडे वळून मॉस्यूर म्हणाले.

" चल रे, ए बावळ्या, हो बाजूला ! " मसिअर गॅबेल उद्गारले.

" आज रात्रीं कुठें आलेला दिसला इकडे तो भुरटा, तर नीट चौकशी करा त्याची, गॅबेल. "

" अगदीं जरूर ! मोठा सन्मान वाटेल मला हें करण्यांत, मॉस्यूर. "

" पण तो पळून गेला का रे ? — कुठें गेला तो हैवान ? "

पण तो हैवान, आपल्या पांचसहा दोस्तांना गाडीखालीं वांकून तो कुठे होता, तें दाखवीत होता. म्हणून त्याच्या दुसऱ्या पांचसहा दोस्तांनीं त्याला तमाच खालून ओढून मॉस्यूरपुढें उभा केला.

" ए नंदी, तो केव्हासा दिसेनासा झाला रे ? "

" गाडी माथ्यावर अशी थांबली मॉस्यूर, नि तो असा कांही जो जीव घेऊन पळाला, कीं कांहीं विचारू नका."

" बर, गॅबेल, तुमच्यावर सोपवितों मी सारं. चला रे ! "

गाडी एकदम धडाकून पुढें निघाली आणि गाडीखालीं वांकलेले ते हाडांचे सापळे जेमतेम बाहेर निसटले. नाहींतर त्याच्या हाडांचा चूरच व्हायचा.

टेकडीच्या त्या उभ्या खडया चढावावरील स्मशानभूमीजवळून गाडी सावकाश जात असतां एका थडग्याजवळ गुडघे टेकून बसलेली एक स्त्री एकदम उठून गाडीजवळ आली. " दया करा, मॉस्यूर, गरीबाचा अर्ज आहे एक ! " दाराजवळ उभी राहून ती म्हणाली.

" अर्ज, अर्ज ! जेव्हां पहावं तेव्हां अर्ज ! ह काय म्हणणं आहे ?" थोडेसें चिडून बाहेर पहात मॉस्यूरनीं विचारलें.

" माझे घरधनी तसे उपासमारीनें मेले मॉस्यूर—"

" वर मग ? काय परत आणू कीं काय त्यांना ? कटकट लेकांची !"

" कृपा करून ऐका महाराज. उपासमारीनेंच गेले ते. आणि किती तरी असे रोज जाताहेत बिचारे "

" वर मग ? खायला घालू की काय मी त्या सगळ्यांना ?"

" तो दयावत जाणतो तें; पण ते नाहीं मी मागत. एक साधी मागणी आहे माझी मॉस्यूर — कांहीं नाहीं मॉस्यूर, एखाद्या चांगल्या दगडावर माझ्या धन्याचं नांव खोदून त्यांच्या थडग्यावर बसवा तो नाहींतर या साऱ्या दगड-मातींत कशी कोणाला आठवण रहायची त्यांची ! मॉस्यूर, मॉस्यूर, कृपा करा एवढी !"

पण आतां त्या हुजऱ्यानें तिला ढकलून दूर केलें आणि गाडी दौडत पुढे चालू झाली. वसंतरात्रीचा परिमळ मॉस्यूरच्या सभोंवार पसरत होता; आणि तिकडे त्या खेड्यावर नि तेथल्या त्या रकटी पांघरलेल्या, धुळीनें भरलेल्या अस्थि-पंजर देहांवरहि, त्याच परिमळाची बरसात पंक्तिप्रपंच न करतां तशीच बरसत होती अजूनहि ते तिथे तसेच गाडीखालील त्या अज्ञात व्यक्तीविषयीं तर्क-वितर्क करीत उभे होते. हळूहळू तेहि तिथून मग पांगून एक एक आपआपल्या घरकुटांत शिरू लागले. घरांच्या खिडक्यांतून लहान लहान दिवे आतां मिण-मिणत होते. कृष्णरात्रीच्या त्या काळोखाचा जोर बाहेर वाढू लागला, नि त्या-बरोबर आकाशांत ताऱ्यांची गर्दी वाढू लागतांच, ते मिणमिणे दिवे त्या काळोखी खिडक्यांतून जणूं काय गुप्त होऊन वर आकाशदिव्यांच्या गर्दीत हळूच जाऊन मिसळले.

त्याच वेळीं आपल्या राहत्या घराच्या नि त्याच्या भोंवतालच्या अवाढव्य भीषण छायेंत शिरून कांहीं वेळ दिसेनाशी झालेली मॉस्यूरची गाडी, वाड्याच्या भव्य देवडीवरील दिव्यासमोर उभी रहात होती

" चार्लस आला का रे इंग्लंडहून ?" त्यांना नम्रपणें अभिवादन करीत कंदील घेऊन पुढे आलेल्या नोकराला मॉस्यूरनीं विचारलें,

" नाहीं मॉस्यूर."

  

चार्लेस अजून आलेला नसल्यानें तो आल्याबरोबर त्याला वर घेऊन येण्यास सांगून मॉस्यूर आपल्या त्या राजशाही भव्य प्रासादांतील आपल्या एकांत खाजगी खोलींत शिरले आंत टेबलावर दोघांच्या जेवणाची तयारी ठेवल्याचें दिसत होतें. तिकडे दृष्टि जाऊन ते म्हणाले, "अजून आला नाहीं म्हणतात. आणि येणार तरी आहे कीं नाही कोण जाणे. पण असूं दे, मी करतों आतां सुरवात."

त्यांनीं आपल्या खान्यास सुरुवात केली. पण त्यांचें आज पुढील नाजुक-साजुक जिनसाकडे लक्ष नव्हतें. तोंडांतील घांस तसाच ठेवून एखादेवेळीं ते अस्वस्थपणें समोरील बंद खिडकीकडे पहात रहात. आत्तांहि हातांतील तो उंची दारूचा पेला ओठाशीं नेऊन त्यानीं तसाच खालीं ठेवला. "कसला झाला तो आवाज ?"

"कसला नाहीं मॉस्यूर." खिडकी उघडून बाहेरील घनदाट काळोखात डोकावीत जवळ उभा असलेला नोकर म्हणाला.

"बर; कर बंद खिडकी." शांतपणें मॉस्यूर म्हणाले.

त्यांचें भोजन परत सथपणें चालू झालें. थोड्याच वेळांत बाहेर गाडीच्या चाकांचा आवाज ऐकू येऊ लागला आणि कांहीं वेळानें तो देवडीजवळ येऊन शांत झाला. "चार्लेस आला वाटत. जा त्याला वर इथेंच घेऊन यायला सांग. मी थांबलों आहें म्हणाव."

चार्लेस डार्नेनें आंत प्रवेश केला आणि मॉस्यूरनीं त्याचें थंडपणें दरबारी स्वागत केलें

"फार वेळ लागला तुला यायला," मंदस्मित करीत मॉस्यूर म्हणाले.

"कांहीं महत्वाच्या कामान झाला उशीर."

"अस्स!" दरबारी मॉस्यूर म्हणाले.

आणि मग नोकरांच्या देखत जेवण आटपेपर्यंत ते दोघे कांहींच बोलत नव्हते. जेवण आटोपलें आणि कॉफीपानास सुरुवात झाल्यानंतर आणि खोलींत ते दोघेच राहिल्यावर तोंडावरील अजूनपर्यंत एक सुरकुतीहि न हललेल्या आपल्या त्या मुरब्बी काकासाहेबांकडे पहात डार्नेनें संभाषणास सुरुवात केली.

"माझ्या त्या मागल्या अर्धवट सोडलेल्या कामासाठींच मी आज परत

आलों आहे, मध्यें एकदां चांगली जीवावरच बेतली होती माझ्या तिकडे; पण वटावलों "

" मी काय करणार होतों त्या बावतींत ? माझे कांहीं हात तिथपर्यंत पोंचूं शकत नव्हते. "

" आणि जरी पोंचले असते, तरी तुम्ही कांही ते माझ्यासाठीं हलवले नसते खास. "

" वा वा ! चांगली बक्षिसी आहे आम्हांला ही "

" वस्तुस्थिती आहे ती. पण दरबारची तुमच्यावर तेवढीशी हल्लीं खूष नजर नाहीं नहीं तर—"

" खरं आहे, खरं आहे कांहीं तरी करून मला ती परत मिळवलीच पाहिजे. मग तुला आवडो किंवा नावडो काळच पालटला आहे आतां एके काळीं तर आपल्या सभोंवार जिकडे तिकडे वावरणाऱ्या या भिकार कुत्र्यांच्या जीवाचे सुद्धां मालक होते आपले पूर्वज एकाला तर अरसा इथे, स्वत च्या मुलीविषयी कांहीं अपशब्द तो बोलल्याबद्दल आमच्या आजोबांनीं त्या खोलीं-तच ठार केला होता. पण कितीतरी हक्कांना आम्ही आतां पारखे झालों आहोत कांहीं वेगळ्याच विचारांचे वारे आज वाहात आहेत आणि आपल्या उरल्यासुरल्या हक्कांची बजावणी करणसुद्धां कठीण होऊं पहात आहे."

तप किरीची एक नाजुक चिमटी त्यानीं नाकात सोडली आणि आपली मान खिन्नपणें हलवली.

" मला वाटतं, आपल्या हक्कांची बजावणी आम्ही त्या काळांत इतक्या कठोर-पणे केली नि अजूनहि करीतच आहोंत कीं, आपल्या नावाइतकं तिरस्करणीय नांव या साऱ्या फ्रान्समध्यें दुसऱ्या कोणाव नसेल. "

" कांहीं वाईट नाहीं. उच्च पदस्थांचा हा तिरस्कार म्हणजे मी तर त्या क्षुद्रांनीं नाखुशीनें आम्हांला केलेला मुजराच अस समजतों !"

" आपल्याला भेटणाऱ्या कोणत्याहि चेहेऱ्याकडे नीट दृष्टि टाका मॉस्यूर, त्यावर आपल्याला आदराची किंवा सन्मानाची वारीकशी छटाहि दिसणार नाही ! सर्वांच्या चेहेऱ्यावर जशी भेदरटपणाची आणि गुलामगिरीची लाचारी उमट-लेली मला दिसते. " उदास स्वरांत डार्ने म्हणाला.

" आपल्या कुटुंबानें गाजविलेल्या वैभवाची मूक प्रशंसाच आहे ती, चार्लस; समजलास ! " आपल्या पायांची आढी घालीत आणि तपकिरीची परत एक नाजुक चिमटी ओढीत मॉस्यूर म्हणाले.

पण डार्ने विषण्णपणें आपलें तोंड झांकून बसला होता. मॉस्यूरनीं त्याच्याकडे नाखुषीनें एक तीव्र दृष्टिक्षेप केला.

" एक दडपशाहीच तत्वज्ञानच काय तें चिरंजीव आहे, चार्लस आणि तू म्हणतोस ती लोकांच्या मुद्रेवरील भीति आणि लाचारी, हें घर असं शाबूत खडं उभं आहे तोंपर्यंत, अशीच त्यांना आपल्यापुढें कुत्र्यासारखी गोंडा घोळायला भाग पाडील," वर बोट करून मॉस्यूर म्हणाले.

पण मार्क्विस साहेबांच्या अपेक्षेपेक्षाहि अधिक वेगानें तो काळ त्यांच्याकडे दौडत यायचा होता. थोड्याच काळांत जाळूनपोळून छिन्नविच्छिन्न केलेल्या मॉस्यूरच्या त्या भव्य प्रासादाचं आणि त्याच जातीच्या इतर राजविलासी मंदिरांच्या अवशेषांचं भेसूर चित्र, त्याच रात्रीं जर कोणी मॉस्यूरच्या डोळ्यांपुढें उभं केलं असतं, तर त्यांच्या त्या ताठर चेहेऱ्यावरहि भीतीचा ठसा उमटल्यावांचून राहिला नसता. कराल काल आत्तांच त्याच्या पाठीशी उभा राहून विकट हास्य करीत होता.

" निदान आज तरी कुटुंबाचं उज्ज्वल नांव मलाच राखलं पाहिजे." मॉस्यूर पुढें म्हणाले. " पण तू थकला असशील आज. उठू या का आपण आता ? "

" एक दोन चार मिनिटांनीं."

" चालेल; तू म्हणशील तेव्हां."

" त्या दीनदुबळ्या जनतेचे घोर अपराध केले आहेत आत्तांपर्यंत आपण, नि त्याचींच फळं आज आपण चाखत आहोंत, " डार्ने म्हणाला.

" आपण ? " किंचित् हसत प्रश्नार्थक मुद्रा करीत आणि स्वत:कडे नि आपल्या पुतण्याकडे अंगुलिनिर्देश करीत मॉस्यूर म्हणाले.

" होय, आपल्या घराण्यानं, ज्या घराण्याची प्रतिष्ठा वेगवेगळ्या कारणांनीं आपल्या दोघांनाहि अभिमानास्पद वाटते, त्याच आपल्या प्रतिष्ठित घराण्यानं. माझ्या बाबाच्या काळांतसुद्धां आपल्या सुखाच्या – चैनबाजीच्या आड येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा आपण घोर अपराध केला आहे. पण तेंच कशाला, आपण

यांचेच सख्खे वारस काय कमी अपराधी आहांत ? तुमची दोघांची ती भागीदारी मी तरी कशी तोडणार ! "

" मृत्यूनें केली आहे ती कामगिरी ! " मॉस्यूर म्हणाले.

" आणि त्याच मृत्यूनें ती जबाबदारी माझ्या डोक्यावर आतां लादली आहे. माझ्या त्या हळव्या मातेची माझ्याकडे तळतळून पहात असलेली मृत्युशय्येवरील ती दृष्टि, या दीनदुबळ्यांची विपत्ती दूर करण्यासाठीं मला पुन पुन्हां बजावीत असते. पण कोणाची मदत व्हायची आहे मला त्यांत ! "

" माझ्या जवळून जर ती अपेक्षा असेल, चार्लस," आपल्या उजव्या हाताची तर्जनी त्याच्या छातीला टेकून — खोलींतील शेगडीजवळ आतां ते उभे होते — मॉस्यूर म्हणाले, " तर तुला ती कालत्रयींहि मिळणार नाहीं, खास "

आपल्या पुतण्याकडे तसे ते रोखून पहात असता, त्यांच्या नितळ चेहेऱ्यावरील क्रौर्याची प्रत्येक छटा आतां जागी झाल्यासारखी स्पष्टपणें दिसत होती. फिरून एकदा आपली तर्जनी त्यांनी त्याच्या छातीवर टेंकली; तरवारीचें नाजुक अणकुचीदार पातच जसें कांही ते त्याच्या छातीवर टेंकीत होते

" लक्षांत ठेव बच्चा, या परंपरागत अधिकाराच्या सातत्त्यासाठीं, मी आपल्या प्राणांचेंहि मोल देईन ! " हातांतील तपकिरीची चिमटी जोरानें नाकांत ओढीत ते म्हणाले, आणि त्यांनीं ती डबी खिशांत ठेवली

" समजस माणसामारख आपल हें दैवायत्त स्विकारण हेंच श्रेयस्कर " टेबलावरील रौप्य घटेचा आवाज करीत ते पुढें म्हणाले, " पण तू तर त्याला पारखा झालेला दिसतोस, चार्लस."

" ही इस्टेट आणि हा मायदेश तरी मला पारखा झाला आहे खरा," खेदजड स्वरांत डार्ने म्हणाला, " मी तरी त्यांचा त्याग केला आहे "

" दोघांचाहि ? फ्रान्सचा कबूल, पण या इस्टेटीचाहि ? ती—तुझी व्हायची आहे अजून, लक्षांत आहे ? "

" तस नाहीं म्हटलं मी. पण जर तुमच्या मागें ती उद्यां—"

" तें नाहीं शक्य दिसत, मला वाटत."

" किंवा आणखी वीस पचवीस वर्षांनीं—"

" तेंहि नाहीं शक्य दिसत, " मॉस्यूर म्हणाले; " पण त्याला नाहीं माझी हरकत."

—"तर तिच्यावरहि मी पाणी सोडीन नि कुठेंहि कसहि पोट भरीन आपलं. आणि पाणी सोडण्यासारख आहे तरी काय त्यांत? दु ख नि औदासीन्यानें बुजबुजलेल एक वैराण रान आहे तें नुसतं!"

"ह! ह!!" सभोवारच्या विलासी वातावरणाकडे पहात मॉंस्यूर म्हणाले.

"इथे डोळ्यांना दिसत आहे मोठ मोहक, पण बाहेर जरा दिवसाच्या प्रखर उजेडात त्या साऱ्या दृश्यावरुन थोडी नजर फिरवा म्हणजे बेशिस्त कारभार, उधळपट्टी, पिळणूक, कर्जबाजारी, जुलूम जबरदस्ती, उपासमार, कपड्यांची रकटीं आणि दु ख क्लेश या साऱ्यांचा नगा नाचच चाललेला आपल्याला दिसेल."

"हं ह!" मॉस्यूर परत एकवार आत्मतुष्ट स्वरात उद्गारले.

' जर कधींकाळीं हें आलच माझ्या हातात तर, या दीनदुबळ्यांना खाली खेंचीत असलेल्या जड बेड्या पार छिन्नभिन्न करून टाकून, या नाही तरी निदान त्यांच्या पुढल्या पिढीला तरी सुखाचा पोटभर घांस नि आंगभर वस्त्र यांची ददात नाहींशी करण्यासाठीं, मीं आपल्या जीवाच रान करीन. पण तस होईलस दिसत नाहीं. कुणाचा तरी शाप या साऱ्या देशाला भाजून काढतो आहे."

"आणि तुम्ही?" मॉस्यूर म्हणाले "आपल उगीच विचारतों ह मी, तुम्ही कस व्यतीत करणार आहांत आपल जीवन, या नव तत्त्वज्ञानाच्या काळांत?"

"आंगमेहनतीनच, मला नि माझ्यासारख्या दुसऱ्या उच्चकुलीनांना आता आंगमेहनतनिच जगावं लागेल."

"इंग्लडमध्येंच असेल?"

"होय. तिथेंच माझ्या कुळाच नांव सुरक्षित राहील"

टेबलावरील घटानादानें वर आलेल्या हुजऱ्यानें शेजारील खोलीत आता दिवा लावला होता. त्या हुजऱ्याच्या पावलांचा आवाज ऐकू येईनासा होईपर्यंत मॉस्यूर तिकडे पहात होते

"पण तें इंग्लड कांहीं विशेष मानवलेल नाहीं दिसत तुला,"—आपल्या पुतण्याकडे तोंड फिरवीत ते हसत म्हणाले.

"आपलाहि आहे हिस्सा त्यांत, असच म्हटल होत नाही मी आज? तें कसहि असो; पण आज तेंच माझ आश्रयस्थान आहे"

" अस अनेकांचं आश्रयस्थान आहे तें म्हणतात. आपले एक देशबंधु आहेत तिथें, एक डॉक्टऽर ! आहेत ते तुझ्या परिचयाचे ?"

" होय."

" आणि त्यांची कन्याहि ? "

" होय."

" बर ! बर !! पण तूं थकलेला दिसतोस. गुडनाइट ! "

त्यानीं आपली मान मोठ्या डौलानें झुकवली. पण त्यांच्या चेहेऱ्यावर मिस्किल हास्याच्या तर खऱ्याच, पण कांहींशा गूढ छटाहि उमटलेल्या डार्नेला दिसल्या आणि त्यांच्या त्या कुर्रेबाज ओठांची नि डोळयांतील त्या जहरी लहरींची झालेली ती हालचाल आणि आवाजांतील छद्मीपणा त्याला कांहींसा चमत्कारिक वाटला.

" आहे तुझा त्याचा परिचय तर, बर ! बर !! असा आहे एकूण नवतत्व-ज्ञानाचा प्रारंभ ! पण तूं थकला आहेस नाहीं का, गुडनाइट ! "

त्या राजशाही बंगल्याच्या भिंतीवर कोरलेल्या त्या दगडी मुखवट्यांकडे पाहून त्यांचं अंतरंग ओळखण्याइतकच मॉस्यूरच्या अंतरंगांतील विचार त्यांच्या चेहेऱ्यावरून ओळखण कठीण होत. दाराकडे जात असतां त्यांच्या चेहेऱ्याकडे डार्नेनें पाहिलें. पण व्यर्थ.

" गुड नाइट ! सकाळी होईलच म्हणा अलभ्य लाभ पुन्हा. बर तर ! कोण आहे रे तिकडे ! दिवा दाखव मालक साहेबांना तिकडे. " मॉस्यूर आलेल्या नोकराला म्हणाले आणि खोलीत शिरत असलेल्या डार्नेच्या पाठमोऱ्या आकृती-कडे त्यानी एकदां आपली जळजळीत दृष्टि रोखली.

— साहेबाच्या आंगावरील पोशाक उतरून नि त्यांच्या आंगांत एक सैल पातळ हलका रेशमी झगा चढवून हुजऱ्या त्यांच्या शयनागारांतून बाहेर पडल्यानंतर, आंगाला थोडा गारवा येण्यासाठीं मॉस्यूरनी थोडी शतपावली करण्यास सुरुवात केली. पावलांचा आवाजहि न करतां आपल्या पिंजऱ्यांत फेऱ्या मारीत असलेल्या एखाद्या डौलदार वनराजासारखेच ते त्या वेळीं दिसत होते. तशा फेऱ्या मारतांना त्या दिवसाचा चित्रपट अभावितपणेंच त्यांच्या डोळयांपुढून संथपणें सरकत होता. टेकडीवरील तो सथ चढ, तो सूर्यास्त, उभ्या सुळक्यावरील तो गढीवजा तुरुंग, खालील दुबेळक्यांतील तें

खेडें, त्या कारंजाजवळील लोकांची गर्दी आणि तो गाडीखालीं बोट दाखवणारा कामगार आणि तसेंच तें पॅरिसमधील कारंजें, तो चेंदामेंदा झालेला मांसाचा गोळा आणि तो उंचेला किंचाळत असलेला माणूस — " ठार, अगदीं चेंदा-मेंदा ! " — " पण चला, झोंपूं या आतां," डोळ्यांवरून हात फिरवीत मॉस्यूर म्हणाले आणि मच्छरदाणीचा पडदा उचलून त्यांनीं पलगावर आंग टाकलें

त्या शात काळोख्या रात्रीचा आणि काळाचा प्रवास शांतपणें चालू होता. खालील तबेल्यांत घोड्यांचे मधूनच वाजलेले पाय, किंवा शिकारी कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज, किंवा त्या भव्य इमारती सभोंवारच्या उंच उच वृक्षांच्या पानांची होणारी मंद सळसळ, किंवा मधूनच होणारा घुबडाचा भेसूर घूत्कार, यांखेरीज वाड्यांतलि नि वाड्याबाहेरील सर्व वस्तुजातावर निगूढ शांततेचें साम्राज्य अविच्छिन्नपणें पसरलें होतें.

त्या काल रात्रीचा तो भयदशांत प्रवास अजून तसाच तीनचार प्रहर चालू होता. अनंत कालाच्या त्या अखंड गतीप्रमाणेंच त्या खेड्यांतलि आणि मॉस्यूरच्या त्या राजप्रासादाच्या प्रांगणांमधील कारंजाचा जलप्रवासहि मूकपणें नि तसाच मंदगतीनें चालू होता. पण मग क्रमाक्रमानें आतां पूर्वेकडे पसरत असलेल्या रक्तवर्णाच्या लाल छटा त्या पाण्यावर पसरल्या आणि मग थोड्याच वेळानें बालसूर्याच्या कोंवळया आरक्त किरणांनीं त्या प्रासादाचे उच उच मनोरे नि सभोंवारच्या विशाल वृक्षांचीं मस्तकें पूर्णपणें न्हाऊन निघालीं. कारंजाचें पाणी आतां रक्तासारखें लाल भडक दिसत होतें, आणि वरील भिंतींवरील ते कोरलेले दगडी मुखवटेहि त्याच लाल रंगानें रंगत होते. वृक्षशाखांवरील पाखरांचा किलबिलाट वाढत चालला होता आणि एक चिमुकला जीव मॉस्यूरच्या शयनमंदिराच्या खिडकीवरील चौकटीवर आसन ठोकून आपल्या चिमुकल्या गळयांतून गोड सुरांची बरसात मुक्तकंठ उधळीत होता. आणि त्या गाण्यानें जणूं काय विचालित होऊन जवळील गच्चीवरील तो दगडी मुखवटा — आश्चर्यानें तोंड वासून पहात होता.

पण उगवत्या दिवसाच्या रामप्रहरांत नेहमीं संथपणें सुरू होणारी त्या प्रासादाची हालचाल आज अशी घाबरल्यासारखी गोंधळल्यासारखी, गडबड-घाईची, धामधुमीची कां सुरू झाली आहे ? वरील गच्चीवर नि जिन्यांवर साऱ्यांची

ही धांवपळ कशासाठीं चालली आहे ? वाड्यांतील ती भलीमोठी घंटा अशी ही भयकरपणें कां घणघणत आहे ? आणि जीन कसून घाईघाईनें हे घोडे काय म्हणून तयार होत आहेत ?

आणि तो पहा, त्या डोंगरमाथ्यावर काम करीत असलेला तो मजूर असा सैरावैरा खालीं पळत कां सुटला आहे ? कोणी पोंचवली त्याच्यापर्यंत ही धावपळ ? त्याच्या शिदोरीभोंवती घिरट्या घालीत असलेल्या त्या रानपांखरांनीं तर तिकडून मॉस्यूरच्या वाड्याकडून कांही भयकर बातमी त्याला कळवली नाहीं ना ? कसेंहि असो, तो कामकरी खाली उतारावरून असा जीव घेऊन पळत सुटला आहे खरा. खेड्यांतले किती तरी लोक त्याच्याभोंवती आतां गोळा झालेले दिसताहेत. आश्चर्ययुक्त चेहेऱ्यानें सारे कांहीतरी हळू आवाजांत आपसांत कुजबुजत आहेत. पण काय आहे हा प्रकार ? आणि ते मसिअर गॅबेल घोड्यावर टांग टाकून असे भरधांव कुठे निघाले ?

एकच गोष्ट ही सारी धावपळ सुचवीत होती. कृष्णरात्रीच्या त्या काळप्रहरांत कराल काळानें विकट हास्य करित आपला बळी त्या राजशाही प्रासादांतून उचलला होता !

मॉस्यूरचा पांढरा फटफटीत अचेतन चेहेरा खालील पांढऱ्या शुभ्र उशीवर विसांवला होता. त्या गौरवर्ण मुखवट्यावर भीतीची कृष्ण छटा उमटलेली दिसत होती. त्यांच्या छातींत एक तीक्ष्ण खजीर अगदीं मुठीपर्यंत आंत खोल घुसला होता. खजीराच्या मुठीलाच एक कागदाचें चिटोरें बाधलेलें होतें. एकच ओळ त्यावर खरडलेली दिसत होती —

" सूडाचा पाहिला बळी — जॅकम् "

---

.... ५ ....

" चार्लस डार्ने ! वा, या या. आलात तरी केव्हां परत कॅंब्रीजहून ? " हातांतील पुस्तक दूर करून आंत आलेल्या चार्लस डार्नेला डॉक्टर मॅनेट म्हणाले, " आम्ही तर हे गेले चार दिवस वाट पहातों आहोंत तुमची ती बॅरिस्टरांची जोडगोळी तर कालच येऊन गेली त्यांच म्हणण तुम्ही आला असाल बहुधा "

" माझी आठवण होते म्हणायची त्यांना, थोर लोक आहेत ते ' " डॉक्टरांकडे उल्हासानें पहात पण त्या जोडगोळीच्या उल्लेखानें किंचित् नाखूष होऊन डार्ने म्हणाला " मिस मॅनेट — "

" ठीक आहे, ठीक आहे, " त्याला मधेंच थांबलेला पाहून डॉक्टर म्हणाले " आम्हां साऱ्यांनाच कसा आनंद वाटतो तुमच्या येण्यानें. जरा बाहेर गेली आहे ती कांहीं खरेदीसाठीं, पण येईल आतां इतक्यांत. "

" डॉक्टर मॅनेट, मला माहीत आहे तें, आणि म्हणूनच असा हा आत्ता आलों आहे मी कांहीं बोलायच आहे मला आपल्याशीं "

" अस ? ' जरा वेळ स्तब्ध राहून डॉक्टर म्हणाले. ' घ्या, अशी जवळ घ्या ती खुर्चा आणि करा सुरुवात पाहू "

-- " वर्ष दीडवर्ष झाल आपला असा दाट परिचय होऊन, " गोंधळलेल्या मनःस्थितात कांही वेळ स्वस्थ बसून मग डार्ने म्हणाला, " आणि मला वाटत मी जें कांही आतां सागणार आहे, त्यानें आपल्याला कांही — "

डॉक्टरांनी आपला हात पुढें करून त्याला थाबवले, नि मग जरा वेळानें तो मागें घेऊन ते म्हणाले —

" ल्यूसीविषयी बोलणार आहांत तुम्ही ? "

" होय "

" तिच्या विषयीं बोलण मला नेहमीच अवघड वाटत. आणि आता तुमच्या या अशा आवाजानें तर तें फारच अवघड होईल, चार्लस डार्ने. "

" त्यांच्या विषयींच्या वाटणाऱ्या गाढ आदराचा नि अथांग विशुद्ध प्रेमाचाच द्योतक आहे तो आवाज, डॉक्टर मॅनेट ! "

"कबूल, कबूल, माझा विश्वास आहे त्यावर," पुन्हां जरा वेळ तसेच स्तब्ध राहून डॉक्टर म्हणाले

त्यांच्या चेहेऱ्यावर स्पष्टपणें उमटलेल्या अस्वस्थपणामुळें नि नाखुशीनें डार्नें कांहीं वेळ घोटाळला.

' करू का मी सुरुवात ? ''

पुन्हां थोडा वेळ पूर्वीप्रमाणेंच विमनस्कपणें स्तब्ध राहून, डॉक्टरनी त्याला होकार दिला.

' मी काय बोलणार आहें, याची आपल्याला कल्पना करतां येईल, डॉक्टर, पण माझ्या मनात उसळलेल्या आशा निराशांच्या तीव्रतेची मात्र तशी कल्पना होण अशक्य आहे. किती विशुद्ध, गाढ नि विलक्षण ओढाळ प्रेम आपल्या कन्येविषयीं मला वाटत तें मी शब्दांनी सांगू शकणार नाहीं. मातेच्या नि:स्वार्थी वात्सल्याची किंवा एखाद्या पवित्र भाविकाच्या असीम भक्तीची उपमाच कदाचित त्याला साजेल. सागराच्या अथांग घानिष्ट प्रेमाची जर कधीं कुठें शक्यता असेल, तर डॉक्टर मॅनेट, माझ हृदय आज त्याच प्रेमानें त्याच्याकडे ओढ घेत आहे आपणहि एकेकाळीं असल्या प्रेमाचा आस्वाद घेतला आहे, तेंच, अगदीं तेंच प्रेम आज माझ्या मुखांतून अस बोलतं आहे ! ''

डॉक्टर मान फिरवून खालीं जमिनीकडे पहात बसले होते. पण शेवटच्या या उल्लेखानें घाईघाईनें आणि अस्वस्थपणें आपला हात पुन्हां पुढे करून ते घोगऱ्या आवाजात ओरडले —

'' नको, नको, राहूदे तें ' त्याचा नको उल्लेख करू ! ''

त्यांच्या हृदयातून तळतळून निघालेल्या त्या दुःखपूर्ण स्वराचा नाद, तो थांबल्यावरहि किती वेळ तरी डार्नेच्या कानांत तसाच घुमत होता, आणि त्या आवाजानें चकित होऊन डार्नें कांही वेळ अगदीं स्तब्धपणें त्याच्याकडे पहात राहिला

'' माफ करा, ह डार्ने,'' कांहीं वेळानतर हळू आवाजांत डॉक्टर म्हणाले. '' ल्यूसीवरील तुमच्या प्रेमाविषयीं मुळीच शका नाही मला, अगदी खर सांगतों आहें ह मी.''

त्यांनीं आपलें तोंड त्याच्याकडे फिरवलें, पण आपली मान किंवा डोळे मात्र त्यांनीं मुळींच वर केले नाहीत खालीं मान घालून आणि आपल्या हातावर हनुवटी टेंकून ते स्वस्थ बसले होते, आणि त्यांच्या पांढऱ्या शुभ्र केसांनीं त्यांचा चेहेरा झांकून गेला होता —

" ल्यूसीजवळ बोलला आहांत तुम्ही हें ? "

" अं हं."

" पत्रद्वारें सुद्धां ? "

" मुळींच नाहीं "

" तुम्ही दाखविलेला हा मनोनिग्रह तिच्या या पित्यासाठीं नव्हता, असं समजणं हें नि संशय अनुदारपणाच होईल. अतिशय ऋणी आहे मी तुमचा "

हस्तांदोलनासाठीं त्यांनी आपला हात पुढें केला, पण त्यांचे डोळे मात्र वर झाले नाहींत.

" आपल्या कन्येवरील आपलं अलोट प्रेम इतक्या दिवसांच्या आपल्या परिचयानंतर माझ्या चांगलं ओळखीचं झालं आहे डॉक्टर," आदरयुक्त स्वरांत डार्ने म्हणाला. " बापलेकींमधील हें असलं अथांग प्रेम मी तरी निदान कुठें पाहिलं नाहीं त्याला खरोखरीच तोड नाहीं आणि मिस मॅनेटचंहि आपल्यावरील प्रेम जरी कर्तव्यमिश्र असलं तरी लहान बालकाच्या निरागस प्रेमाइतकंच तें गाढ नि भाबडं आहे. लहानपणीं मातृपितृसुखास मुकल्यामुळें दुप्पट वेगानें जसं कांहीं उसळून, आपल्या सभोंवार तें डोळसपणें पण अतिशय उत्कटत्वानें आतां वहात आहे खास, प्रत्यक्ष देवलोकांतून देवगुणांनी झळाळत जरी आपण परत आलां असतां तरीहि केलं नसतं, असलं वेडं प्रेम त्यांच्या हृदयांत आपल्याविषयीं आज नाचतं आहे आपल्या गळ्याभोंवतीं हात लपेटून विश्रब्धपणें उभ्या राहिलेल्या त्यांना पाहिल्या, कीं कोमल स्त्रीजातीच्या सर्व अवस्थांतील भिन्नभिन्न प्रेमांची एकच ओतीव मूर्तिच जशी कांही आपल्याजवळ उभी आहे, असं वाटतं त्यांच्या त्या प्रेमळ स्निग्ध निळ्या डोळ्यांतुन अविरत वर्षत असलेली ती प्रेमधारा पाहिली, कीं डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें वाटतें. तरुणपणांतील तुमची नि तुमच्या त्या भग्नहृदय पत्नीची मूर्तिच जशी काय त्यांच्या डोळ्यापुढें त्यावेळीं तरळत असते. आपला परिचय झाल्यापासून कितीतरी वेळां अशा रम्य वत्सल दृश्यांनीं या घरात मी धन्य झालों आहें."

तिचा पिता अजून तसाच खालीं दृष्टि लावून बसला होता. त्यांचा श्वास जरा जलद चालला होता, पण मन क्षोभाच्या इतर सर्व खुणा मात्र त्यांनीं पार दाबून टाकल्या होत्या.

" आणि याच जाणीवेनें डॉक्टर, याच जाणीवेनें माझ्या मनांतले हे प्रेम-

विकार मी आतांपर्यंत असेच दाबून ठेवले. पण — आतां मात्र मला तें अशक्य झाल आहे. माझं खरोखरीच त्यांच्यावर अत्यत प्रेम आहे. तो एक परमेश्वरच माझा साक्षीदार ! ''

" आहे, माझा विश्वास आहे, '' दु:खपूर्ण स्वरांत डॉक्टर म्हणाले. "याच्या आधींच मला थोडी कल्पना आली होती त्याची.''

" पण तुमचा दोघाचा वियोग करण्याची कल्पना मात्र माझ्या मनाला कधींच शिवली नाहीं '' त्यांच्या त्या करुणस्वरानें किंचित् विषण्ण होऊन डार्ने म्हणाला. " माय देशास दुरावलेला आपल्या सारखाच मीहि एक निर्वासित आहें, आणि भविष्य काळाकडे दृष्टि ठेवून आपल्यासारखाच मीहि स्वत:च्या श्रमावर जगतों आहें. आपल्याविषयीं आजीव कृतज्ञ राहून मी फक्त आपल्या सौख्याचा एक भागीदार होऊं इच्छितों आपली ती लाडकी कन्या, सहचरी नि अभिन्न हृदय सवगडी आपल्यापासून दूर न करतां तिच्या मदतीला येण्याचीच फक्त माझी इच्छा आहे, अधिक कांहीं नाही.''

त्याचा हात डॉक्टरांच्या हातावर होता, आणि एक क्षणभरच तो तसा राहू देऊन डॉक्टरनीं आपले हात खुर्चीच्या हातांवर टेकले होते. आतां डार्नेच्या त्या शेवटच्या वाक्याबरोबर अजूनपर्यंत खालीं जमिनीकडे पहात असलेला आपला चेहेरा त्यानीं वर केला त्यांच्या मनांत उसळलेली भावनांची खळबळ नेहमीं-सारखीच भीतिमिश्र अशी त्यांच्या चेहेऱ्यावर स्पष्टपणें उमटलेली होती.

" अतिशय मोकळेपणानें तुम्ही आपल हृदय माझ्याजवळ खुल केलत ही अतिशय आनदाची गोष्ट आहे. मीहि तितकाच दिलखुलास होण्याचा प्रयत्न करणार आहें. ल्यूसीच्या मनाचा कल तुम्ही कधी अजमावला आहे काय; किंवा — माझ्या समतीनेंच तुम्ही तो अजमाऊ इच्छितां ? ''

" अस कांहीं नाहीं डॉक्टर.''

" मग माझ्यापासून कांहीं अभिवचन हव आहे का तुम्हांला ? ''

डार्नेनें होकारार्थी मान हालवली. " पण आपल्या एकाच शब्दानें कोणाचहि पारडं अतिशय जड होईल याचीहि जाणीव मला असल्यानें मी तस कांही मागत नाहीं.'' तो पुढें म्हणाला.

" शाबास, डार्ने ! पण तरुणींच्या मनांतील प्रेम, हें एक नाजूक गूढ आहे बरं; आणि तें इतकं फसवं आहे कीं, त्याचा खरा थांगपत्ता लागणं खरोखरीच

मोठ बिकट असत. आणि या एका बाबतींत माझी ही लाडकी कन्यासुद्धां मला एक मोठं गहन गूढच आहे भारी — भारी खोल ! कांहींच कल्पना होत नाहीं मला या बाबतींत."

" पण आपली अशी कल्पना आहे का, कीं दुसऱ्या —"

" समजलों, " त्याला तसा अडखळलेला पाहून डॉक्टर म्हणाले, " तुमचा आशय समजलों. आतां तुम्हांला माहीतच आहे कीं ती बॅरिस्टरांची जोड-गोळीच काय ती आणखी आमच्या इथें येत असते त्यांच्यापैकी कुणी शक्य, फार तर. पण तुम्हांला माझ वचन कसलं हव होत ? "

" एकच डॉक्टर. आपल्या त्या लाडक्या कन्येन जर कधीं काळो आपल हृदय आपल्याजवळ मोकळ केल तर, आपल हें आजच बोलण त्याच्या कानावर जरूर जरूर घाला. आणि माझ्या प्रेमाची आपण फक्त ग्वाही द्या अधिक कांहीं नाहीं."

" कबूल, एकदम कबूल, " डॉक्टर म्हणाले. " तुमच अंत करण मी ओळ-खल आहे डार्ने, आणि तुम्ही तिला माझ्यापासून हिरावूनहि नेऊ इच्छित नाहीं, हेंहि मला पटल आहे. तिच्या प्रेमाच्या नि सुखाच्या पूर्ततेसाठीं तुमची आवश्य-कता आहे, असं जर कधीं काळीं तिनें मला सुचविल, तर मोठ्या आनदानें तिचा हात मी तुमच्या हातांत देईन. माझ म्हाताऱ्याच तीच एक प्रेमनिधान आहे, माझ दुसर हृदयच आहे तें. फार काय सांगू — पण जाऊ दे तें ! "

ते एकदम स्तब्ध बसले नि त्याच्या चेहेऱ्यावर तो विलक्षण भकासपणा परत एकदां पसरला.

" तुम्ही कांहीं सांगत होता मला ? " कांहीं वेळानें झोंपेंतून एकदम जागे झाल्यासारखे ते त्याच्याकडे किंचित् हंसत पहात म्हणाले,

काय उत्तर द्यावें हें कांहीं वेळ त्याला समजे ना पण आपण स्वत विषयीं कांहीं उल्लेख करणार होतों याची स्मृति होऊन तो म्हणाला —

" आपल्या विश्वासाचा मला गैर फायदा घ्यायचा नाही. माझ आजच नांव हें माझ खर नांव नव्हे. मला तें आपल्या कानावर घातल पाहिजे आणि मी इथें इंग्लडमध्यें कां तेंहि मला सांगितलच पाहिजे "

" थांबा ! " डॉक्टर म्हणाले. " आज कांहीं जरूरी नाहीं त्याची माझी ल्यूसी जर तुमची व्हायची ठरली तर त्या विवाहाच्या दिवशींच तें सर्व कांही मला सांगा; तोंपर्यंत नाहीं. कबूल ? "

" अगदीं पूर्णपणें ! "

" ठीक तर, आतां आपण उठू या. आतां इतक्यांत येईलच ती घरीं, आणि मला वाटत आज तरी तिला आपण असे एकत्र दिसतां कामा नये. जा, देव तुमच कल्याण करो ! "

डार्ने बाहेर पडला तेव्हा बाहेर रस्त्यावर काळोख पसरला होता पण त्याच्या अंत करणांत मात्र स्निग्ध चद्राचं सुभग चांदणच पसरल होत. ओल्ड बेलेच्या त्या गभीर उदास वातावरणांत ल्यूसी मॅनेट साक्षीला आल्या क्षणापासूनच त्यानें आपलें हृदय पूर्णपणें तिच्या पायांवर वाहिलें होतें भीपण मृत्यूच्या ऐलथडीवर तो तसा उभा असता, त्या करुण रम्य मोहक चेहेऱ्यानें आणि त्या सुधामधुर आवाजानें तो पुरा घायाळ झाला होता पण त्या गोष्टीला नि त्याच्या त्या काका-साहेबांच्या खुनाला आज इतके दिवस लोटूनहि त्यानें आपल्या प्रेमाचा उच्चार मात्र ल्यूसिजवळ एका शब्दानेंहि अजून केला नव्हता. आणि आपल्या या मौनाचीं कारणेंहि त्याला अपरिचित नव्हतीं. पण आज अखेरीस त्या वसत रात्रीच्या सौरभपूर्ण वातावरणात त्यानें आपलें हृदय तिच्या वत्सल पित्याजवळ अस उघड केल होत, आणि त्याला कस हलक हलक वाटत होत

—एक तासानेंच नतर ल्यूसीनें घरांत प्रवेश केला. तिनें घाईघाईनें पुढील खोलींत पाऊल टाकलें, पण डॉक्टराची खुर्ची रिकामीच दिसत होती तिला थोडें आश्चर्य वाटलें " बाबा ! बाबा ! " तिनें त्यांना मोठ्यानें हांका मारल्या.

आतून कांहीच प्रत्युत्तर आलें नाही, पण त्याच्या त्या शयनमदिरांतून हातो डीचा मद आवाज मात्र तिच्या कानांवर आला ती तशीच घाईघाईनें पण पायांचा आवाज न करता पुढें जाऊन त्या खोलीच्या दारांतून हळूच आत डोका-वली, आणि तशीच भेदरल्यासारखी, अगदीं रक्त गोठल्यासारखी मागे धांवत येऊन आपल्याशींच कळवळली " आतां काय करू ! अग आई ग ! "

पण एक क्षणभरच ती तशी भांबावली, आणि जरा वेळानें एकदम मागें वळून आणि त्यांच्या खोलीच्या दारावर टकटक करून तिनें त्याना हळूच हांक मारली. तिच्या आवाजाबरोबर आंतील हातोडीचा तो नाद थाबला आणि ते खोली बाहेर आले त्यानीं आपला हात मग तिच्या हातात अडकवला आणि त्यांनीं सथपणें फेऱ्या मारण्यास सुरवात केली

---

.... ६ ....

सोहोवरील डॉक्टर मॅनेटच्या घराच्या दिशेनें अतिशय सत्रस्त मन स्थितींत सिडने कार्टन चालला होता. गेल्या वर्षात कितीतरी वेळां तो त्या दिशेनें आला गेला होता. अतिशय आनद वाटे त्याला त्या डॉक्टरांच्या प्रशांत घरांत. पण म्हणजे सिडने कार्टन कधीं आपल्या गुणांनीं तिथें अगदीं कुणाला उठून दिसला होता, अस मात्र मुळींच नव्हे; नेहमीच तो तिथें अतिशय विचारमग्न अवस्थेंत कोणाशींहि हास्यविनोद न करता स्वस्थपणें बसलेला असायचा. मग काय त्यांत त्याला एवढी मोहनी वाटे कोण जाणे. कित्येक वेळां तर डॉक्टरांच्या घरांतहि न शिरतां नुसता त्या घराच्या आसपासच तो भटकत राही किती तरी लोकांनीं त्याला तिथें तसा भटकतांना पाहून आपल्याशीच आश्चर्य व्यक्त केलें. पण कार्टनचें कोणाकडेच तेव्हा लक्ष नसे. त्या सौख्यमंदिराचें असलें नुसतें मूक सांनिध्यसुद्धा त्याला आनद देत असे. आणि हे गेले कांहीं दिवस तर टेंपलकोर्टमधील आपल्या त्या अस्ताव्यस्त पसरलेल्या उदासवाण्या बिछान्यावर एक क्षणहि आपली पाठ न टेकता, रात्रीचें आपलें मनसोक्त मद्यप्राशन करीत संपविलेलें काम स्ट्रायव्हरच्या आंगावर टाकून तो या घराभोंवतीं फेऱ्या मारीत रात्र काढीत होता.

आणि त्याचें मन स्वास्थ्य असें अगदी पार नाहींसें करून टाकण्याला त्याचे दोस्त महाशयच कारणीभूत झाले होते. मिस मॅनेटला मागणी घालण्याची आपली मनीषा स्ट्रायव्हरसाहेबानीं त्याच्याजवळ बोलून दाखवली होती. इतकच नव्हे तर प्रसगानुरोधानें त्यानीं कार्टनच्या गत आयुष्याचा सारा चित्रपट त्याच्या डोळ्यांसमोर स्पष्टपणें उभा केला होता, आणि जातां जातां एखादी चांगली प्रौढ — मातेप्रमाणें त्याची नीट काळजी घेईल अशी, गतयौवन सुखवस्तु स्त्री गांठून तिच्याशीं विवाहबद्ध होण्यास त्यानीं कार्टनला सांगितलें होतें. आणि त्या स्थूलदेह, सौंदर्यहीन, चिर गतयौवन स्ट्रायव्हरला मिस्टर लॉरीनी चांगल्या कानपिचक्या देऊन ल्यूसी मॅनेट त्याच्या त्या मागणीला कशी लाथाडील याची पूर्ण कल्पना दिल्यानंतर सुद्धां, सिडने कार्टनचें मन स्वास्थ्य अजून जाग्यावर आलें नव्हतें. तरीहि त्या वसंतरात्रीच्या शांत मधुर आणि रात्रविकासी फुलांच्या

परिमळानें दरवळलेल्या वातावरणांत डॉक्टरांच्या घराच्या दिशेनें त्याचीं पाउलें पडत असतां, एखाद्या चिकित्सकाच्या सूक्ष्म दृष्टीस, त्या सन्त्रस्त मन स्थितींतहि सिडनेच्या मुखावर काहीं निश्चयाची छटा उमटलेली दिसल्यावांचून खास राहिली नसती.

" गुड ईव्हिनिंग, मिस मॅनेट !" तिच्या खोलीत मोलकरणीनें त्याला आणून सोडतांच तिला अभिवादन करून आणि तिच्या टेबलाजवळच बैठक मारीत सिडने म्हणाला

खोलीत एकटीच असलेली ल्यूसी काहींशी गोंधळली. पण नेहमींच त्याच्या सगतींत ती अशी गोंधळून जाई त्याच्या अभिवादनाचा स्वीकार करीत तिनें वर त्याच्याकडे पाहिलें आणि कांही तरी अपरिचित असे भाव तिला त्याच्या चेहेऱ्यावर दिसले.

" बरी नाही तब्बेत मि. कार्टन ?"

" तस कांहीं नाहीं मिस मॅनेट. पण आमच हें दैनदिन जीवन कांही मोठ सुखाच नाहीं, अशा फदी माणसाच निराळ तें कस असायच म्हणा !"

" माफ करा ह मला — पण दुर्दैवच नाहीं का हें ?"

" मलाहि खरीखुरी शरम वाटते त्याची !"

" आणि तरीहि तें बदलायच नाहीं ?"

तिनें त्याच्याकडे हळुवारपणें पाहिलें. त्याच्या डोळ्यांत अश्रु तरळत होते आणि आवाजहि रुद्ध झालेला दिसत होता तिला त्याची कींव आली.

" अशक्य आहे आतां तें, आता असच चालायच आमच हें दुर्दैवी जीवन; उलट त्यात अधिकच खोल रुतत जायचे आमचे पाय."

आपल्या हाताचीं कोपरें टेबलावर टेकून त्यानें आपलें तोंड आतां झांकून घेतलें होतें. काहीं क्षणाच्या त्या शांततेंत त्याच्या कोंपराखालील टेबलहि मद-पणें थरथरत होतें. इतका भावविवश झालेला तिनें त्याला कधी पाहिला नव्हता; आणि तिचेंहि हृदय विरघळल वर न पहातांच तिची ती मनःस्थिति त्याला समजली आणि तो म्हणाला — " माफ करा मला मिस् मॅनेट. मला तुम्हांला काय सांगायच आहे त्याच्या नुसत्या जाणीवेनेंच मी हा असा हतबल झालों आहें. तुम्ही ऐकाल मी काय सांगणार आहें तें ?"

" तुम्हाला जर हलक वाटणार असेल त्यान, मि. कार्टन, तर आनदानें ऐकेन मी सार."

" किती आनंद झाला आहे मला हें ऐकून, मिस मॅनेट !"

त्यानें आपले हात मग तोंडावरून काढले आणि कांहीं क्षण स्तब्ध राहून त्यानें शांतपणें सुरुवात केली. —

" मी काय सांगणार आहे त्यानें मुळीच बुजून किंवा घाबरून जाऊं नका तुम्हीं. भर तारुण्यांत मृत झाल्यासारखीच माझी स्थिति आहे. माझं सारं आयुष्य म्हणजे वांया घालवलेल्या सुवर्ण संधींच एक मूर्तिमंत प्रतीकच आहे."

' अ हं, मला नाहीं तस वाटत मि कार्टन त्या सुवर्णसंधि अजूनहि तुमच्या भोंवती घोटाळत आहेत, आणि माझी खात्री आहे की अजूनहि तुम्ही आपल जीवन उज्ज्वल करू शकाल."

" किती सोन्यासारखे शब्द आहेत हे, मिस मॅनेट ' आणि माझ हें दुबळं अंत करण जरी मी ओळखीत असलों, तरी आपले हे शब्दमात्र मी कधींहि विसरणार नाहीं ! ! "

तिचा चेहरा उतरला होता आणि तिचें शरीरहि किंचित् थरथरत होतें. पण त्याच्या चेहेऱ्यावर मात्र विषादपूर्ण निश्चयाची छटा प्रस्फुटपणें वावरत होती.

" तुमच्या समोर बसलेल्या या माझ्यासारख्या स्वत.च्या हातानीं आपल्या आयुष्याच मातेर केलेल्या, एका दारुड्या हैवानाच्या तुमच्यावरील प्रेमाची परत फेड तुम्ही कधीकाळीं करणं जर शक्य असत, तर मन समाधानाच्या त्या सौख्यांतसुद्धां, या मोहक सुकुमार फुलाला चुरगळून अपमानाच्या नि दु ख-दैन्याच्या खाईत लोटल्याबद्दल माझ मन तापलेल्या साडसासारख मला सारख भाजीतच राहिल असत. पण मला पूर्ण माहीत आहे की, तसा हळवेपणा तुमच्या मनांत असण शक्य नाहीं, तशी याचनाहि मी करीत नाहीं, उलट त्याची अशक्यता मला समाधानच देत आहे "

" इतर तऱ्हेन नाहीं का माझा काहीं उपयोग होणार, मि. कार्टन ? उदात्त जीवनाच्या मार्गावर मला नाहीं का आपल्याला आणतां येणार ? आणि तुम्ही आपल हृदय माझ्याजवळ आता अस नि संकोच उघड केल्यानंतरहि ! " ती हळू बोलत होती आणि तिच्याहि नेत्रातुन आतां सहानुभूतीचे अश्रु पाझरत होते, " दुसऱ्या कोणाजवळ तुम्ही नसता इतके खुले झालांत — मग आपलं जीवन मला नाहीं अजून सन्मार्गाला लावता येणार मि. कार्टन ? "

त्यानें आपली मान हलविली

" शक्य नाहीं आतां तें, कोणालाच शक्य नाहीं. फक्त एक माझं म्हणणं तुम्ही शांतपणें पूर्ण ऐकून घेतलंत म्हणजे तुम्हांला शक्य तें तुम्ही केलंत असंच मी समजेन मिस मॅनेट, तुम्हींच माझं आतां अखेरचं सुखस्वप्न आहात. माझ्या या खातेऱ्यातल्या जीवनांतसुद्धा, आपल्या वडिलांच्या आयुष्याचं तुम्ही केलेलं हें नंदनवन पाहिलं कीं, विस्मरणाच्या उदरांत कधींच गडप झालेलीं कांहीं जुनीं सुखस्वप्नं, अजूनहि माझ्या मनांत परत तरळूं लागतात, आणि पश्चात्तापाची कांचणी माझ्या या मुर्दाड बनलेल्या मनालाहि पुरी हैराण करते. साऱ्या दुर्वासनांबरोबर निराश होऊन सोडून दिलेला झगडा परत सुरू करून आयुष्याला रंगरूपाला आणावं, असं माझं पश्चात्तापदग्ध मन मला पुनः पुन्हां सांगूंहि लागतं. पण तें सारं आतां एक निष्फळ स्वप्नच ठरलेलं आहे, आणि आहे तिथेंच हा स्वप्नाळू आज पुन्हां उभा आहे ! पण तुम्हींच माझी ही सुख-स्वप्नसृष्टि जागी केलीत, तुमचंच आहे याचं सारं श्रेय "

" पण कांही — कांहींच का नाहीं शिल्लक उरणार तें स्वप्न ? विचार करा मि कार्टन — पहा, पुन्हां प्रयत्न करून पहा ! "

" अहं, मिस मॅनेट, माझी लायकीच नाहीं तशी आणि तरीहि मला वाटतंच आहे का, हा अग्निस्फुलिंग माझ्या मनांत, — राखेऱ्या या ढिगाऱ्यांत, किती जोमदारपणें हा स्फुलिंग तुम्ही चेतविलात, आणि माझ्या दुबळ्या स्वभावानुसार तो कांहींच कार्य न करता निष्फळपणें तसाच नुसता फुरफुरत जरी तो जळत राहिला असला तरी तुम्हींच तो फुलविलात, हें मात्र मला तुम्हांला सांगितलंच पाहिजे."

" पण अशी जर तुम्हांला मी दुःख द्यायलाच कारणीभूत झालें असेन—"

" अहं, असं नका म्हणूं, मिस मॅनेट ! कारण मी सन्मार्गावर येणं जर शक्य असतं, तर एक तुम्हींच तें करूं शकलां असतां हें ध्यानांत ठेवा तुमच्या-मुळें नाहीं मी अधिक खोल रुतणार "

" पण तुम्ही म्हणतां तशी ही तुमची मनःस्थिति जर माझ्यामुळें झाली असेल, तर तुमच्या अधिक उपयोगी नाहीं का मला पडतां येणार ? तुमचं भलं असं मी कांहीं कांहींच करूं शकत नाहीं का ? "

" माझं हृदय तुमच्यापुढें मी असं मोकळं केलं, हेंच माझं खरं सुख सर्वस्व आहे. माझ्या या घसरलेल्या जीवनप्रवासांत हीच गोष्ट मला धीर द्यायला

पुरेशी आहे. तुम्हांला दया येण्याइतका तरी चांगुलपणा आज माझ्यांत उरला होता हाच मला आनद आहे."

"आणि त्याच चांगुलपणाच्या जोरावर सुखी व्हा, हेंच मला जीव तोडून पुन.पुन्हां सांगायच आहे, मि. कार्टन!"

"आतां नका सांगू मला मिस मॅनेट. माझ्या सामर्थ्याची मला पूर्ण जाणीव आहे, आतां शक्य नाहीं तें. तुम्हाला मी यातना देतों आहें, पण आतां सपलच बहुतेक एक वचन द्याल मला तुम्ही — तुमच्या या विशुद्ध कोमल हृदयांत माझ हें आजचं हृदयनिवेदन, अगदीं कोणालाहि कधीं न सांगतां असच गुप्त ठेवाल तुम्ही?"

"तुम्हांला जर बर वाटत असेल त्यानें, तर कां नाहीं?"

"तुमच्या आयुष्यांतील त्या जिवलग वाटेकऱ्यालासुद्धा नाहीं?"

"मिस्टर कार्टन," एक दोन क्षणच गोंधळून ती म्हणाली, "हें गुपित तुमच आहे, माझ नाहीं, आणि म्हणूनच पूर्ण निर्धास्त रहा तुम्हीं त्या बाबतींत."

"अतिशय आभारी आहें मी तुमचा. देव तुमच कल्याण करील!"

त्यानें तिचा हात हळुवारपणें आपल्या ओंठावर टेकला आणि तो दाराकडे वळला.

"एक ध्यानात ठेवा मिस मॅनेट, परत कधीं एक अक्षरानेंहि या गोष्टीचा उल्लेख, अगदीं प्राण गेला तरी मी आपल्याजवळ करणार नाहीं. आणि अगदीं शेवटच्या घटकेलासुद्धां, माझ हे हृदयनिवेदन तुम्ही अतिशय प्रेमळपणें आपल्या हृदयांत बाळगलत, याची आठवण मी कृतज्ञतापूर्वक ठेवीन. अतिशय पवित्र अशीच ती स्मृति मला वाटेल. परमेश्वर कृपेनें तुमच हृदय असच प्रेमळ, कोमल पण सुखी आणि आनदी रहाव, एवढीच एक माझी इच्छा आहे!"

दाराजवळच -तिच्याकडे मागें पहात तो उभा होता. त्या घरांत कधींच प्रकट न झालेला सिडने कार्टन आतां तिथे उभा होता. त्याच्या त्या खेदपूर्ण पण निश्चयी नि कृतज्ञ चेहेऱ्याकडे दृष्टि जातांच किती दारुण मनोवेदनाच्या यातना तो रोज मूकपणें सोशीत होता याची कोणालाहि कल्पना आली असती. आणि त्या कल्पनेनें विरघळून जाऊन ल्यूसी मॅनेट त्या दुर्दैवी जीवासाठीं मूकाश्रु ढाळीत स्तब्धपणें बसली होती.

"शांत व्हा, मिस मॅनेट!" तो म्हणाला "माझ्यासाठीं असे अश्रु मुळींच

ढाळू नका, माझी तेवढीहि लायकी नाहीं. एक दोन तासच जाऊ द्या कीं, माझा तो खत आणणारा पण मनाच्या दुबळेपणानें तसाच चालू दिलेला दैनंदिन जीवनक्रम, त्याच खातेऱ्यांतील डुकरांच्या संगतींत परत चालू होईल, आणि रस्त्यावरील एखाद्या बेवारशी कुत्र्याइतकासुद्धा तुमच्या या सोन्यासारख्या सहानुभूतीला मी खचित पात्र ठरणार नाहीं. पण बाहेरून जरी मी असा जुना कार्टनच तुमच्यासमोर वावरत राहिलों तरी, अंतरगांत मात्र कार्टनचा हा नवा अवतारच यापुढें कायम राहील ही खूणगांठ मनांत पक्की बाळगा माझ्या या शब्दांवर मात्र मेहेरबानी करून तुम्ही विश्वास ठेवा ! ”

“ ठेवीन, जरूर ठेवीन, मि. कार्टन. ”

“ आतां अखेरची एकच विनंति, की सपल तुमच्या माझ्यांत कसलच नि कधींच तिळमात्रहि साम्य नव्हत, उलट एक अनुल्लंघ्य अशी अथांग खोल दरीच आपल्यामधें आ पसरून उभी आहे तरीहि कांहीतरी मला आपल्याला सांगावस वाटत आहे, का तें नाहीं सांगतां येत. पण इतकच कीं, तुमच्यासाठीं किंवा तुमच्या कोणाहि प्रिय व्यक्तीसाठीं काय लागेल तें करायला मी नेहमीं तयार आहें, कोणताहि त्याग तुमच्यासाठीं मी केव्हांहि आनदानें करीन आणि स्वत ला धन्यच समजेन ! आणि रोज जरी नाहीं तरी कधींकाळीं माझी आठवण निदान एवढ्यासाठीं, तरी करीत जा असा एक काळ लौकरच येईल, आत्तांसुद्धां मला त्याची अस्फुट चाहूल ऐकू येते आहे, आणि कांहीं नवीन नाजुक जिवट पाशांनीं तुम्ही बद्ध होऊन या तुमच्या सुखी जीवनांत कांहीं नवीन अवीट सुखाची बरसात सतत वर्षू लागेल आणि तुमच्या त्या धन्यससारांत, तुमच्या प्रिय पतीची चिमुकली हसरी छबी नि तुमचा नाजुक नवा अवतार, तुमच्या आवतींभोंवतीं आपली गोड गजबज जेव्हा सुरू करील त्या वेळीं, मिस मॅनेट, तुमच्या त्या साऱ्या लाडक्यांसाठीं आपल्या जीवावर पाणी सोडणारी एक व्यक्ति जीवत आहे, याची कधींमधीं आठवण असू द्या ! ”

त्यानें तिला लवून अभिवादन केलें आणि फिरून एकदां “ देव तुमच कल्याण करो ! ” अस म्हणून त्यानें दाराबाहेर पाऊल टाकलें.

---

.... ७ ....

भर मध्यान्हीचा सूर्य सेंट अॅटॉइनवर प्रकाशत होता त्या वेळीं डेफार्जच्या दारूदुकानाच्या रस्त्यानें दोन व्यक्ति — मसिअर डेफार्ज आणि तो रस्त्यावरील कामकरी — मूकपणें चाललेल्या कोणालाहि दिसल्या असत्या त्या दोन्ही व्यक्तींचें सर्वांग धुळीनें नखशिखांत भरलें होतें आणि त्याच्या अंगांतून घामाच्या धारा वहात होत्या त्या विभागात झालेल्या त्यांच्या आगमनाबरोबर अनेक घरांतील अनेकांच्या चेहेऱ्यावर समाधानाच्या छटा उमटल्या होत्या, तरीहि त्याच्या मागोमाग मात्र कुणींच त्या दिशेनें येत नव्हता त्या दोघांनीहि दुकानांत पाऊल टाकल्याबरोबर दुकानांतील प्रत्येक व्यक्तीचे डोळे त्यांच्याकडेच वळले.

" गुड डे दोस्त ! " सर्वांकडे पहात डेफार्ज म्हणाला.

" गुड डे ! " असा सर्वांच्या तोंडांतून एकदम आवाज आला

" आजची हवा कांहीं चांगली नाहीं, नाहीं ? " मान हलवीत डेफार्ज म्हणाला.

त्यावरोबर सर्वांचे डोळे प्रथम आपआपल्या शेजाऱ्याकडे वळले नि मग ते खालीं पहात स्वस्थ बसले त्यांनला फक्त एकच उठून बाहेर चालता झाला

" या जॅकसबरोबर खूपच मजल मारली आहे मी आज, ऐकलस का," आपल्या अर्धांगाकडे पहात डेफार्ज म्हणाला. " वाटेंत आपली सहजच भेट झाली, माझी नि जॅकसची. चांगला माणूस आहे मोठा हा; त्याला द्या एक पेला भरून ! "

दुकानांतील आणखी एक व्यक्ति उठून आतां बाहेर गेली. मॅडम डेफार्जनें दारूचा ग्लास भरून त्या नवागत जॅकसपुढें ठेवतांच त्यानें आपल्या कोटाच्या खिशांतून काळसर जाड भाकरीचा तुकडा बाहेर काढून त्याचे घांस चघळीत ग्लासांतील पेयाचा आस्वाद घेण्यास सुरवात केली. आणखी एक माणूस आतां उठला नि बाहेर गेला.

त्या नवागताचा फराळ चालू असतां डेफार्जहि दारूचे घुटके घेत त्याच्याकडे पहात स्वस्थ उभा होता. दुसऱ्या कोणाकडेच त्याचें लक्ष नव्हतें आणि दुसरं कुणीहि त्याच्याकडे पहात नव्हतें. मॅडम डेफार्जनेंहि आपल्या सुया उचलून कामाला सुरुवात केली होती

"झालं, आटपलं का दोस्त, तुमचं?" डेफार्जनें विचारलें.

"हां, आटोपलं."

"चला तर, तुम्हांला तुमची खोली दाखवतों मी. नुसती ती पाहूनच खूष व्हाल तुम्ही."

दुकानाबाहेर पडून आणि चौकांतील त्या खड्या जिन्यांनीं वर चढत चढत पांचव्या मजल्यावरील त्या माळावजा लहान खोलींत — त्या शुभ्र केशधारी, हातांतल्या जोड्याकडे खालीं दृष्टि लावून बसत असलेल्या दुबळ्या डॉक्टराच्या खोलींत ते येऊन पोंचले पण ती शुभ्र केशधारी वृद्धमूर्ति आतां तिथें दिसत नसून दुकानांतून कांहीं वेळापूर्वी बाहेर पडलेल्या त्या त्रिमूर्ति मात्र तिथें बसलेल्या दिसत होत्या

आंत आल्याबरोबर दार लावून घेऊन डेफार्ज हळू आवाजांत बोलू लागला—

"जॅकस एक, जॅकस दोन आणि जॅकस तीन! मी जॅकस चारनें मुद्दाम येथें आज बोलावलेले आपले पाहुणे — आपले प्रत्यक्ष साक्षीदार हे बोला, जॅकस पांच!"

डोक्यावरील आपल्या निळ्या टोपीनें आपलें कपाळ पुशीत त्या रस्त्यावरील कामकऱ्यानें विचारलें, "कुठून करूं सुरुवात, मसिअर?"

"अगदीं आरंभापासून" डेफार्जनें उत्तर केलें.

"बरं तर, मसिअर" त्यानें सुरुवात केली, "असा एक वर्षापूर्वी असाच उन्हाळा होता त्या वेळीं — मार्किसच्या गाडीखालीं साखळी धरून लोंबकळत जातांना पाहिला त्याला मी सूर्य अगा मावळतीला अगदीं टेंकला होता आणि गाडी सावकाश सावकाश तो चढ चढत होती."

"त्याच्या पूर्वी पण तुम्ही त्याला कधीं पाहिला होता काय?" जॅकस नंबर एकनें मधेंच विचारलें.

"कधींच नाहीं" त्यानें उत्तर केलें.

"मग तुम्ही त्याला परत कसा ओळखलात?" जॅकस तीननें विचारलें.

"अहो, त्याच्या त्या ताडमाड उंचीवरून मी मॉस्यूरनासुद्धां तसंच म्हटलं होतं त्या वेळीं — गिऱ्हाइकासारखा ताडमाड."

"ठेंगणा — अगदीं खुजा म्हणून सांगायचं तुम्ही." जॅकस दोन म्हणाला.

" पण मला काय त्या वेळीं माहीत ? आणि सार कांहीं मग मागाहूनच नाहीं का झालं ? पण मॉस्यूरनीं मला सांगूनसुद्धा काहीं मदत नाहीं केली ह मी त्यांना ! "

" खर अ.हे त्याच म्हणण, जॅकस, " डेफार्ज पुटपुटला. " ह पुढें ! "

" आणि मग झाला तो तपास सुरु — कितीतरी दिवस सारखा चालला होता. मला वाटत — चांगला दहाबारा महिने चालला होता नाहीं ? "

" जाऊ दे, त्याची नाही जरूर, " डेफार्ज म्हणाला. " चांगली काळजी घेतली होती ती आम्ही, पण सांपडलाच विचारा अखेर. ह पुढें ! "

" बर तर पुन्हां तसाच त्याहि दिवशीं नि तसाच सूर्यास्तान्या वेळेला मी त्या टेकडीच्या माथ्यावर काम करीत होतों सूर्यानें ती तशी खालीं उडी घेतली मात्र, आणि मीपण आपली सारीं हत्यारपात्यार गोळा करून खालीं माझ्या झोपडीकडे उडी घेतली आणि काय, वाटेंतच मला ते सहा यमदूत वरच्या तुरुंगाकडे जातांना भेटले, नि त्याच्यामधेच हात मागें घट्ट आवळून बांधलेला तो ताडमाड बापया चालला होता. मी तर बाबा घाबरून रस्त्यान्या कडेलाच उडी मारली न काय किती लांबलांब त्याच्या काळ्या सावल्या पडल्या होत्या रस्त्यावर ! खाड खाड, खाडखाड असा बुटांचा सारखा आवाज करीत ते सैतान चालले होते आणि अगदीं माझ्याजवळ जसे ते आले कीं नाहीं, तसा मी त्या माणसाला बरोबर ओळखला बघा, त्या अंधारात, नि त्यान पण मला तसाच बरोबर ओळखला. पण त्या सैतानांना मात्र यातल काहीं कळल नाहीं बर का, — दगड लेकाचे ! नुसती डोळ्याची भाषा झाली आमची कसा बिचारा लगडत लगडत चालला होता रस्त्यान आणि ते सैतान त्याला मागून बंदुकीच्या दस्त्यानी हे असे ढकलीत होते." हातवारे करीत तो म्हणाला प्रत्येक गोष्ट अशी साभिनय करण्याची त्याला खोडच होती. " आणि त्या उतारावरून खालीं येतांना तर तो असा तोंडावरच खालीं आपटला बघा पण दांत काढीत त्या सैतानानीं त्याला खसकन ओढून उभा केला. त्याच तोंड धुळीन नी रक्तानें कस माखून गेल होत, पण त्याचे बिचाऱ्याचे हात कुठे मोकळे होते ? आणि मग खालीं गावांत ते आले, तेव्हा सारा गाव लोटला बघा त्याला बघायला ते तसेच पुढें तुरुंगाकडे निघाले नी आम्ही सुद्धां तें भयाण दार उघडलेल पाहिल, आणि मग त्या दारानीं त्याला असा आ करून पार गट्ट केला ! "

त्यानें आपलें तोंड शक्य तितकें विचकून, दातांचा मोठ्यानें आवाज करीत कदम मिटलें, आणि त्याचा आपल्या श्रोत्यावर झालेला परिणाम नाहींसा होऊ नये म्हणूनच जणुं काय तसाच तोंड घट्ट मिटून तो कांहीं क्षण उभा राहिला.

त्याच्या त्या अभिनयतर्ईतून डेफार्जनें त्याला जागा केला "ह, चालू द्या पुढ जॅकस."

"आम्हीहि सारे जण मग आपआपल्या मकाणाकडे वळलों," आपले वडे उचाऊन हळू आवाजांत तो म्हणाला "सारी रात्र आम्हाला तोच बेचारा स्वप्नांतसुद्धां दिसत होता सकाळीं मग आपला भाकरतुकडा घेऊन मी कामावर निघालों तुरुंगावरूनच माझा रस्ता जात होता, म्हणून मीहि पाहिल त्या बाजूला अजूनहि तसाच रक्तान नि धुळीन तोंड माखलेला त्या उच्च गजांमागें तो मला दिसला कसा पाढरा फटक प्रेतासारखा माझ्याकडे पहात होता बिचारा '"

त्याचे ते श्रोते रागानं हिरवे निळे होऊन एकमेकांकडे मूकपणें पहात होते नि गुप्तपणें त्यांच्यांत काहीतरी सकेत चालला होता क्रूर पिशाच्चांच एखाद मंडळच जस कांहीं कोणा तरी दुर्दैवी बळीच्या भवितव्याचा कठोरपणें विचार करीत होत. अखेरीस काहीं वेळ तिथें पसरलेल्या भयद शांततेचा भग करीत डेफार्ज म्हणाला — "ह चालू दे पुढें, जॅकस"

"तसाच त्या पिंजऱ्यात आणखी काहीं दिवस होता तो आम्ही असे भीत भीत कधीमधीं त्याच्याकडे पहात असू आणि मग सांजचे सारे परत आलों कामावरून कीं, आपआपसांत कुजबुजत असू आता काय व्हायच त्याच म्हणून. आम्ही आपल ऐकल होत कीं त्याला फांशी काही देणार नाहीं आहेत, पण काळ पाणी मात्र सुटत नाहीं, आणि कुणीतरी तसा अर्ज पण केला आहे सरकारांत त्यांत लिहिल होत म्हणे कीं, मुलाच्या मृत्यूनें वेडापिसा होऊन त्याच्या हातून झाल तें. खुद्द सरकारस्वारींच्याच हातांत अर्ज गुदरला म्हणतात मला काहीं माहीत नाहीं खर कीं खोटें तें; पण असेलहि कदाचित्, कुणी सागाव '"

"ऐक तर मग जॅकस," नवर एक मधेंच म्हणाला. "खुद्द राजाच्याच हातांत दिला होता तो अर्ज आणि आपल्या डेफार्जनेंच आपल्या जीवाची पर्वा न करतां त्या धावत्या गाडीपुढें जाऊन तो राजाच्या हातांत दिला.'

" आणि हें पण ऐकून ठेव जॅकस ! " गुडघ्यावर खाली बसून आपल्या चेहेऱ्यावरून सारा वेळ अस्वस्थपणें हात फिरवीत असलेला नबर तीन म्हणाला, " नीट ऐकून ठेव, त्याच्या मुर्दाड शिपायानीं आणि गाडर्यांनीं त्याला अगदीं बेदम मारला. समजल ? "

" होय ऐकल, मसिअर्स "

" चालू दे तर पुढें, " डेफार्ज म्हणाला.

" आणखी असहि ऐकल मग की त्याला मुद्दामच तिथें आणला होता फांशी द्यायला मॉस्यूरचा खून केला होता ना त्यानें, आणि ते तर आमचे तिथले मायबाप साऱ्यांचे. आणि नुसता नव्हता त्याचा मुडदा पाडायचा ! उजवा हात पहिल्यानें असा दिवटीसारखा जाळायचा, त्या जखमेंत मग उकळत तेल ओतायच, आणि मग साऱ्या आंगाचे सांधे न सांधे घोड्यांकडून ओढवून तोडून पार मोकळे करायचे अस माग केल सुद्धां होत म्हणे केव्हाम आपल्या मागल्या सरकारच्या मारेकऱ्यालाच मला वाटत, नाही ? "

" ऐक तर पुन्हां एकदां, जॅकस ! " नबर तीन म्हणाला. " डॅमीन म्हणून होतं त्या कैद्याच नांव आणि या — या आपल्या पॅरिसमध्यें असा उघड्यावर भर दिवसा केला त्याचा चेंदा काय गर्दी लोटली होती रस्त्यावर त्या वेळीं ! आणि कुणाची ? दुसऱ्या कोणाच्या नव्हे, तर बड्या बड्या मानकऱ्यांच्या नाजुक साजुक, नपकेबाज बायकांची बर का, जॅकस अगदीं बिचाऱ्याचा शेवटी लोळा-गोळा होईपर्यंत त्या बया तशा तिथें माना वळवून वळवून खिदळत पहात बसल्या होत्या — अगदीं तश्शा — पण वय काय तुमच ? "

" काय असेल बघा तीस पस्तीस, " तो रस्ता कामगार म्हणाला पण बिचाऱ्याच्या आंगावर कळा मात्र दिसत होती साठीची

" मग तुम्ही दहा वर्षांचे असाल त्यावेळीं, तुम्ही पाहिल ही असाल कदाचित "

" बस्स ! " अधीरपणें पण आवेशानें डेफार्ज म्हणाला. " अजून शांत व्हायचं आहे त्याच पिशाच ! ह, पण पुढे. "

" बर ! अशा होत्या आपल्या बाजार गप्पा चालू. अखेरीस मग एक दिवस रविवारीं रात्रीं, सार गांव झोंपी गेल्यावर ते शिपाई आपल्या बुटांचा नि बंदुकांचा खाडखाड आवाज करीत खाली गांवांत आले आणि रात्रभर मग तो कामकऱ्याचा गलका नि पहारा कुदळी नि हातोड्याचा आवाज, आणि मध्येंच

त्या शिपाईबुवाचीं हसणींखिदळणीं चालू होतीं. सकाळला तो सूळ, चाळीस फूट उंच बर का, आपला झाला तयार आणि पुढंच काय सांगायचं मसिअर्स, सकाळीं असा तोंडांत भला भक्कम तोंड फाटेपर्यंत बोळा देऊन नि करकचून बांधून त्याला फरफटत आणला आणि चढवला फांसावर ' बस संपलं ' मी पण मग सूर्य मावळल्यावर गांव सोडला नि निघालों यायला इकडे वाटेनंच मला आपले हे दोस्त गाठले, आणि कांहीं चालत, कांहीं गाडींत असे पोंचलों येऊन आम्ही इथे आणि हा असा बसलोंच आहें मी आतां आपल्यापुढें ! "

" शाबास ' कळलं आतां आम्हांला सारं पण जरा बाहेर बसाल का तुम्हीं थोडा वेळ ? "

" हो हो, अगदीं खुशीनें, " जागेवरून उठत तो रस्ता कामगार म्हणाला. डेफार्ज त्याला जिन्याजवळ पोंचवून नि त्याला तिथें बसवून परत आंत आला.

" मग काय जॅकस, नोंदायचं नांव ? " तो आत येताच नंबर एकनें विचारलें.

' बेशक ' अगदीं पार खुळीस मिळवायचं तें "

' सुंदर, सुंदर ! " नंबर तीन उद्गारला

सारी मालमत्ता, वाडाबिडा नि वंशसुद्धा ! " नंबर एकनें विचारलें.

" होय होय, अगदीं पुरा नि पात साऱ्याचा ' डेफार्जनें उत्तर केलें

" पण आपल्या नोंदींत कांहीं गोंधळ नाहीं ना होणार ? " नंबर दोननें डेफार्जला विचारलें आपल्याखेरीज त्याच गुपीत कुणाला माहित नाहीं हें खरं; पण आपल्याला — म्हणजे मॅडमनां ओळखतील ना त्या खुणा आयत्यावेळीं ?"

' जॅकस, " आपली मान अभिमानानं ताठ करीत डेफार्ज म्हणाला, " तिनें एकटीनेच सारं आपल्या लक्षांत ठेवायचं जरी म्हटलं, तरी एक शब्दहि — एक अक्षरहि नाहीं कधीं मागेंपुढें होणार आणि तिच्याच हातानं एकदा खुणेचे ते टाके पडले कीं सारं सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ वाटतं तिला त्यांच्या नावाच्या नि त्यांच्या अपराधाच्या यादीतलं अगदी अक्षर नि अक्षर काळ्या दगडावर कोरल्या-सारखं वज्रलेप होऊन गेलं आहे "

यावर साऱ्यांनीच पसंतीच्या माना हलविल्या आणि मग नंबर तीननें विचारलें, " आणि हे नवे दोस्त, हे कसे काय आहेत ? "

" अरे, त्याला कसलीच माहिती नाहीं, " डेफार्ज म्हणाला. " माझ्याकडे सोंपवा तुम्ही त्याला या पॅरिसचा भपका बघायचा आहे त्याला, राजा, राणी, सरदार दरबार पण, रविवारी दाखवणार आहें मी त्याला तो भपका. "

"म्हणजे ? ही काय चांगली निशाणी ?" नबर तीननें पृच्छा केली.

"जॅकस," डेफार्ज म्हणाला "मांजरी पुढें दूध तिला चटक उत्पन्न करण्यासाठीं उघड ठेवावं लागत, समजल ! आणि शिकारी कुत्र्याला सुद्धां त्याची शिकार मुद्दाम नेहमीं दाखवल्याशिवाय तुम्हांला हवा तेव्हां तिच्यावर तो तुटून नाही पडणार"

त्यावर कोणींच मग काहीं बोलल नाहीं आणि ते चौघे बाहेर आले तो बिचारा रस्ताकामगार जिन्याच्या पायरीवर तसाच बसल्या बसल्या डुलक्या घेत होता त्याला आत खोलीत जाऊन विश्रांती घ्यायला सांगितल्याबरोबर मोठ्या आनदानें त्यानें आपलें श्रमशांत शरीर एका चटईवर टाकलें नि तो पांच मिनिटांत गाढ झोंपीहि गेला

डेफार्जच्या त्या दारू दुकानापेक्षां अधिक दरिद्री वसतिगृह साऱ्या पॅरीसभर शोधून सुद्धा कुणाला सापडल नसत पण त्याचीहि कधीं गोडी न चाखलेल्या त्या खेडवळाला तें नदनवनच वाटत होत आणि तसे त्याचे दिवस सुखांत जात होते पण मॅडम डेफार्जची मात्र त्यानें तिला प्रथम पाहिल्यापासूनच धास्ती घेतली होती दुकानात काउटर मागें हातातील सुया सारख्या चालवीत बसलेल्या मॅडमनें त्याच्यावर जर कधी दृष्टि टाकली तर बिचाऱ्याच्या आगाला अक्षरश कापरेंच भरे. म्हणून व्हर्सायला बादशाही मिरवणूक बघायला जातांना मॅडमची मूर्ति त्यांच्याबरोबर गाडींत विराजमान होतांच त्याचा पूर्ण विरस झाला. आणि रस्त्यानें त्या गाडींत आणि मग मिरवणुकीच्या मार्गावरील गर्दीत ते उभे असताही मॅडमचें विणकाम चाललेलेंच पाहून तर त्याला फारच चमत्कारिक वाटू लागलें ही विणीत तरी काय असते अशी नेहमीं, तो आपल्याशींच आश्चर्य करीत होता. अखेरीस त्यानें धीर करून विचारलेंच

"भारी करतां तुम्ही काम, मॅडम."

"होय," मॅडम म्हणाली, "पुष्कळच करायच आहे मला."

"काय काय विणतां तुम्ही ?"

"एकच काय, कितीतरी तऱ्हा"

"उदाहरणार्थ — "

"उदाहरणार्थ मढ्याच कफन." मॅडमनें शांतपणें उत्तर दिलें.

तें ऐकून बिचारा दचकूनच दोन पाउलें दूर सरला आणि आंगाला घाम

मुटऱ्यासारखा त्यानें वारा घेण्यास सुरवात केली. पण बिचाऱ्याच्या सुदैवानें दुरून हुजूर स्वारीच आगमन सूचित करणारा फौजीबँडचा आवाज त्याच्या कानावर आला आणि त्यानें आपली मान तिकडे वळवली. आवाज आतां अधिकच जवळ आला आणि घोड्यांच्या टापांच्या खडखडाटांत बादशाही सुवर्ण रथ नि त्याच्या मागोमाग झकपक पोशाख केलेल्या दरबारी मानकऱ्यांच्या नि हास्यमुख नटव्या स्त्रियांच्या गाड्यांची मालिका विमेपणानें त्यांच्या समोरून जाऊं लागली. तो सर्व डोळे दिपविणारा बादशाही विलासी वैभवाचा लखलखाट पाहून, त्या खेडवळाचें देहभान नाहींसें झालें, आणि आनदानें बेहोष होऊन, बादशाह, महाराणी, दरबारी मुत्सद्दी, मानकरी, मानकरणी या सर्वांचा त्यानें नाचत उडत जयजयकार केला ओरडून ओरडून बिचाऱ्याचा आवाजहि घोगरा येऊं लागला नि नेत्र तर आनदाश्रूंनी सारखे ओलावत होते

" शाबास, पठ्ठे, शाबास ' " इतका वेळ त्याला आवरून धरलेल्या डेफार्जनें त्याची पाठ थोपटीत म्हटलें. " असलाच पठ्ठा हवा आहे आम्हांला असल्या ओरडण्यानें त्या शम्बोबाऱ्या उन्मत्तपणाला अधिकच जोर चढेल, आणि मग तो खड्डा जवळ यायला कितीसा उशीर ? "

" अ ' ' गोंधळून आपल डोक खाजवीत तो खेडवळ म्हणाला.

' असल्या या गलक्याची नि गोंधळाची इतकी गमत वाटते तुम्हाला ? " डेफार्जच्या आधीच मॅडमनें विचारलें

" होय मॅडम, तात्पुरती तरी खास "

' पण तुम्हाला जर असल्या नटलेल्या थटलेल्या बाहुल्यांची भली मोठी रास दाखवली आणि सांगितल की यानां मोडून तोडून काय हव तें न्या त्यांतून, तर त्यांतील एखाद्या दागिन्यांनीं अगदी भरगच्च भरलेल्या सुदर नाजुक बाहुलीवर हात टाकाल की नाही बिनदिक्कत ? बोला, टाकाल ? "

" अगदीं बेशक, मॅडम "

" ठीक आणि अशींच कांही दुबळीं पाखर जर तुमच्या तावडींत दिलीं तर त्यांतला अगदीं निवडक माल कराल की नाहीं सफाचट, मुळीं विचारहि न करतां ? "

" एक क्षणाचीहि नाहीं उसत देणार, मॅडम ! "

" ठीक तर. तुम्हीं ही पाखर नि बाहुल्याहि पाहिल्या आहेत आज. आणि

तीहि वेळ लौकरच येईल." ती दरबारी मिरवणूक गेलेल्या दिशेकडे अंगुली निर्देश करीत मॅडम डेफार्ज म्हणाली; "चला तर आतां, घरी जायला कांहीं हरकत नाहीं तुम्हांला"

---

.... ८ ....

सभोंवार पसरत असलेल्या काळोखात, वर नीलाकाशात जागा होऊन घाईघाईनें प्रवेश करीत असलेल्या विविधवर्ण तारकांच्या सान्निध्यात आणि निद्रामग्न होत असलेल्या वनराजीच्या पर्ण फुलांच्या खोड्या करून पुढे सुसाट पळत असलेल्या वाऱ्याच्या सोबतीनें, तो रस्ता कामगार दोन दिवसांच्या टप्प्यावर असलेल्या आपल्या खेड्याच्या दिशेनें वाट चालत असतां, मसिअर नी मॅडम डेफार्ज त्या भाड्याच्या गाडींतून सेंट अँटॉइनमधील आपल्या निवासस्थानाकडे सुखासीन परत येत होतीं. नगर प्रवेशद्वाराशी नेहमींप्रमाणे त्याची गाडी खडी झाली आणि द्वाररक्षकांचे कंदील गाडीभोंवतीं चौकसपणें फिरू लागले डेफार्ज खालीं उतरला त्याची एकदोन रक्षकांजवळ ओळखहि होती. एकाला तर त्यानें घट्ट प्रेमालिंगनच दिलें. तपासणी संपली आणि गाडी परत चालू होऊन ती सेंट अँटॉईनजवळ येतांच दोघहि पतिपत्नी पायउतार होऊन त्या परिचित रस्त्यावरील घाणींतून नि चिखलातून आपल्या घराच्या दिशेनें शांतपणें वाट चालूं लागलीं.

"काय सांगत होता तो जॅकस पोलीस?" कांहीं वेळानें मॅडमनें विचारलें.

"कांहीं विशेष नाहीं. एक नवीन हेर निघाला आहे आपल्या टेहेळणीवर," डेफार्जनें उत्तर केलें.

"अस्स!" आपल्या भुवया उंचावीत मॅडम उद्गारली. "नोंद केली पाहिजे मला त्याची, काय, नांव काय त्याचं?"

"बारसाड्, इंग्लिश आहे तो — जॉन बारसाड्"

"जॉन बारसाड् ठीक चेहेरा मोहरा?"

"वय सुमार चाळीस, उंची सुमार पांच फूट नऊ इंच, केस काळे, वर्णहि तसाच, चेहेरा साधारण सुरेख, पण बारीक, लांबट नी निस्तेज. डोळे काळे नाक

बाकदार अगदीं गरुडासारखं, पण डावीकडे जरासं पसरट, म्हणजे चेहेरा एकदर कपटी.''

"वा सुंदर, अगदीं हुबेहुब चित्रच रेखाटलंत की ?' मॅडम हसत उद्गारली. "उद्यां करतें त्याचं नाव रजिस्टर.''

तीं दोघ आतां दुकानात शिरलीं आणि मॅडम लगेच आपल्या नेहमींच्या जागेवर आरूढ होऊन त्या दिवशींचा सर्व हिशेब नीट तपासून गल्ला मोजून घेण्यांत गढून गेली, सर्व हिशेबाची नीट कसून सर्वतऱ्हानीं तपासणी केल्यानतर आपल्या नोकराला जायला तिनें परवानगी दिली. पेटातील सर्व गल्ला तिनें मग परत खालीं ओतला आणि आंतील नाण्यांच्या रुमालांत वेगवेगळया गांठी-मारण्यास तिनें प्रारंभ केला. हा सारा वेळ डेफार्जची स्वारी आपली पाइप पेटवून, मधूनच प्रसन्न चित्तानें आपल्या कार्यमग्न अर्धांगीकडे पहात दुकानांत फेऱ्या मारीत होती मॅडमचें काम यजमानाकडून कांहींच अडथळा न होता काहीं वेळ तसेंच चाललें होतें

मध्यरात्र उलटून गेली होती तरीहि हवेंत उकाडा विलक्षण होता, नि दुकानाचीं दारें खिडक्या सारीं बद असल्यामुळें, सभोंवारच्या ओंगळ घाणीच्या अगदीं मध्यभागीं असलेल्या त्या दुकानात, दारूचा तो उग्र ओंगळ दर्प डेफार्जच्या भरावलेल्या नाकालाहि आज असह्य असा वाटला आणि त्यानें आपली पाइप खाली ठेवून हातानें वारा घेतल्यासारखें केलें.

"दमलेले दिसतां तुम्ही,'' हातानें गाठी मारीत वर पहात त्याची पत्नी म्हणाली "नेहमीचाच आहे पण हा सारा वास '

' हं ' थकलों आहे खरा थोडा. '

"आणि चेहेराहि जरा उतरलेला दिसतो आहे.'' मॅडम म्हणाली खालीं नाण्यांकडे दृष्टि लागलेली असूनसुद्धां तिच्या अचपळ नजरेंतून त्याच्यातील हा बदल सुटला नव्हता. "असेरीस पुरुष गऽऽबाई पुरुष ! ''

' अहो पण — ' डेफार्जनें सुरुवात केली

"अहो नाहीं, नी पण नाहीं ! '' ताठरपणें मान वेळावीत मॅडम म्हणाली. "अहो पण, ऐकलं का ! तुमचं मन की नाहीं उदासीन झालं आहे आज, कळलं का ! ''

"तसच खरं थोडस," कबुली देत डेफार्ज म्हणाला. "पण किती दूर आहे तें अजून."

"होय, खर आहे. पण काय नसत दूर?" त्याच्या पत्नीनें विचारलें. कसलाहि सूड नि प्रायश्चित्त अशींच वेळखाऊ असतात, नियमच आहे मुळी हा."

"विजेच्या फटकाऱ्यान जमीन दोस्त व्हायला माणमाला फार वेळ नाहीं लागत!" डेफार्ज म्हणाला

"पण वीज तयार व्हायला नि कडकडू लागायला किती वेळ लागतो म्हटल? सांगा पाहू." त्याच्याकडे पहात तिनें शांतपणें विचारलें.

डेफार्जनें विचार केल्यासारख्या आपल्या भुवया वर केल्या पण तो काहीच बोलला नाहीं.

"धरणीकंपान सार शहर गडप व्हायला पांच मिनिटंहि नाहीं लागत, नाहीं! पण तसा तो तयार व्हायला किती लागतो वेळ म्हटल? सांगा — सांगा"

"खूप लागत असेल मला वाटत," डेफार्ज म्हणाला.

"पण एकदां का तो तयार झाला, की साऱ्याच भरडून पार पीठ करून टाकायला दोन सेकंदहि पुरतात त्याला. समजल का? पण त्याच्या आधीं किती तरी वेळ तो तसाच गुप्तपणें आपल्याशींच मुसमुसत तयारी करीत असतो. नि हेंच आपल समाधान; ध्यानांत ठेवा नीट"

शत्रूचीच मान मुरगळल्यासारखी तिनें आवेशानें डोळे फिरवीत रुमालाची गाठ मारली

"मी सांगतें तुम्हांला," आपला हात त्याच्यापुढें करीत ती म्हणाली, "कीं रस्ता जरी दूरचा असला तरी तें निश्चितपणें वाट चालत आहे नि थेट इकडेच येत आहे. एकदा त्याच पाऊल पुढें पडल कीं त्याला माघार ठाऊक नाहीं कीं दम माहीत नाही, ध्यानात ठेवा. सारख पुढें पुढेंच येत असत तें आपल्या सभोंवारच्या या नेहमींच्या जगाकडे जरा दृष्टि टाका आणि त्या असख्य चेहेऱ्यावरील वाढत्या असंतोषाच नीट निरीक्षण करा, आणि मग सांगा कीं पायाखालीं रोज चुरडल्या जाणाऱ्या या कामकऱ्यांच्या मनांत सूडाचा तो सैतान जागा होत आहे कीं नाहीं. नि किती दिवस चालेल हें असं? छी! मला कींव येते तुमची!"

"शाब्बास माझ्या प्राणा!" तिच्यापुढें मान जरा खाली करून नम्रपणें

डेफार्ज म्हणाला. " मला सर्व पटत आहे हें पण इतकं सावकास पडत आहे त्याचं पाऊल, आणि तेंहि शक्य आहे कदाचित् -- शक्य म्हणतों आहें मी — कीं आपल्या आयुष्यांत तो दिवस कदाचित येणारहि नाहीं "

" बरं मग ? " रुमालाला आणखीं एक गाठ मारीत मॅडमनें विचारलें.

" म्हणजे आपल्याला नाहीं दिसणार तो विजयोत्सव " नाखुशीच्या स्वरांत आपले खांदे उडवीत डेफार्ज म्हणाला.

" पण आपण त्यालाच हातभार लावला आहे. " आपला हात त्याच्यापुढे पुन्हां नाचवीत मॅडम म्हणाली " नि आपण केलेलं कांहींच फुकट जायचं नाहीं आहे. पण माझा मात्र स्वत:चा असा विश्वास आहे कीं, आपण तो दिवस पहाणारच. आणि समजा नाहीं तसं घडलं, तरी आज सुद्धां — आत्तां या घटकेला सुद्धां, त्या माजलेल्या बोकडांची मुंडी — "

आपले दांत आवळून रुमालाची आणखी एक गांठ तिनें मोठ्या आवेशानें घट्ट बांधली.

" थांब, थांब ! " भकडपणाच्या त्या ध्वनित आरोपानें ओशाळून डेफार्ज उद्गारला. " आणि मी पण नाहीं कच खाणार अशा वेळीं, अगदीं ध्यानांत ठेवा राणी सरकार "

" कबूल ! पण तुम्हाला आपला बळी नि काळवेळ एक सारखीं दाखवावीं लागतात, नेव्हां कुठें अवसान चढतं तुम्हाला तसं नाहीं! त्याच्या शिवायच रक्त कसं नुसतं सारखं सळसळत राहिलं पाहिजे. आणि वेळ आली कीं, अंतरंगांत तोंपर्यंत डांबून बांधून ठेवलेला तो वाघोबा, तो सैतान, कसा चवताळून बाहेर आला पाहिजे. पण तोंपर्यंत फक्त नख घासून पुसून साफ, पण अगदीं गुप्त झांकून ठेवलेलीं — केव्हांहि तय्यार ! "

आपल्या शब्दांना जोर येण्यासाठींच जणू काय आपल्या हातांतलि ती रुमालाची गांठ तिनें टेबलावर आपटली, आणि मग तो जड रुमाल शांतपणें खाकोटीस मारून घड्याळाकडे दृष्टि टाकीत आपल्या शयनमंदिराकडे ती निघून गेली.

  

*

दुपारीं नेहमींप्रमाणें दुकानातील काउंटरमागें हातातील सुया मन लावून चालवीत मॅडम डेफार्ज बसली होती तिच्याजवळच एक तांबडें गुलाबाचें फुल पडलें होतें; मधूनमधून ती त्या फुलाकडे दृष्टि टाकी, पण त्या विचारमग्न चेहे-ऱ्यावर फरक मात्र कांहीं दिसत नसे हवेंतील ऊष्मा वाढत चालला होता आणि दुकानांतहि गिऱ्हाइकांची गर्दी काहीं विशेष दिसत नव्हती सर्व कांहीं नेहमींप्रमाणें सुरळीत चाललें होतें. इतक्यांत दारांतून आंत येणाऱ्या कोणाची तरी सावली काउंटरवर पडली आणि मॅडम डेफार्जच्या तीक्ष्ण दृष्टीस ती अपरिचितशी वाटली. हातातील सुया थांबवून तो तांबडा गुलाब तिनें केसांत खोवला नि मगच त्या व्यक्तीकडे तिनें नीट पाहिलें. मॅडमच्या केशराजींत तो गुलाब विराजमान होतांच दुकानांतील गप्पा एकदम बंद झाल्या आणि एकेक व्यक्ति आस्ते आस्ते बाहेर पडू लागली

"गुड डे मॅडम!" तो नवागत म्हणाला.

"गुड डे मसिअर!" मॅडमनें उत्तर दिलें नि मग आपलें काम परत चालू करून ती आपल्याशीच पुटपुटली "हं हं! गुड डे, गुड डे, वय सुमार चाळीस, उंची सुमार पाच नऊ इंच, केस काळे, वर्णहि तसाच, चेहेरा साधारण सुरेख पण बारीक, लांबट नि निस्तेज, डोळे काळे, नाक बाकदार अगदीं गरुडासारख पण डावीकडे जरासं पसरट म्हणजे चेहेरा एकदर कपटी! ठीक; गुड डे!"

"अस्सल जुन्या कॉगनॅकचा एक ग्लास द्याल का मला? नि एक थंडगार पाण्याचा पण बरं का, मॅडम"

मॅडमनें अतिशय नम्रपणें ग्लास आणून त्याच्यापुढें ठेवला.

"सुंदर आहे हं आपली कॉगनॅक्, मॅडम!"

त्यांच्या मालाच पहिलंच सर्टिफिकीट होतं हें, नि मॅडम डेफार्ज त्याची किंमत ओळखून होत्या. पण त्यानीं पाहुण्याचे आभार मानले आणि आपल्या सुया वर उचलल्या. त्या व्यक्तींनें एक दोन मिनिटेंच त्या चपळ बोटांकडे आपली दृष्टि लावून मग शांतपणें त्या जागेचें निरीक्षण केलें.

"आपला हात मोठ्या चपळाईनें चालतो आहे, मॅडम"

"सवय आहे मला नेहमींची"

"नि डिझाइन पण मोठं सुरेख दिसत आहे!"

" आपल्याला वाटत असं ? " हसत त्याच्याकडे पहात पहिल्या शब्दावर जोर देत बाई म्हणाल्या

" निःसंशय. पण काय उद्देशानं तें समजेल ? "

" चिरगुळा," त्याच्याकडे तसेच हसत पहात पण बोट चपळाईनें चालवीत बाई म्हणाल्या

" कांहीं तशा उपयोगासाठीं नाहीतर ? "

" तें काय सांगतां येईल. होईलहि एखाद वेळ उपयोग — आलीच जर तशी वेळ तर मी कांहीं मागें सरणार नाहीं खास ! " ताठरपणें मान उडवीत ती म्हणाली

बाईच्या डोक्यांत लाल गुलाब पाहण्याचें सेंट ॲटॉइनच्या लोकांना आवडत नव्हतें बहुतेक कारण आतापर्यंत आंत आलेले एक दोन गृहस्थ तिकडे दृष्टि जाताच कांहींहि पेय न मागवितां जरा वेळ घुटमळून जणु कांहीं ते पहात असलेली व्यक्ति आंत न दिसल्यानें गुपचूप बाहेर निघून गेले होते आणि आधीच दुकानांत बसलेल्यापैकींसुद्धां तिथे कोणीच शिल्लक उरला नव्हता ते सारे गुपचूप बाहेर निघून गेले होते आलेल्या हेराचे डोळे जरी हा सारा वेळ चांगले उघडे होते तरी अपेक्षित निशाणी कांहीं त्याला अजून मिळाली नव्हती सगळेच जसे रिकामटेकडे भिकारी सहज भटकल्यासारखे तिथून नाहींसे झाले होते त्यांच्या विषयीं संशयाला कांहींहि जागा नव्हती.

" हं बारसाड साहेब, असेच थांबा हं थोडा वेळ, की झालंच आपलंहि नांव नोंदून वर का ! " त्याच्या चेहेऱ्याकडे पहात आणि आपला हात चालवीत मॅडम आपल्याशींच पुटपुटत होती

" कसा काय चालला आहे धंदा हल्लीं नि आपले घरधनी कुठें आहेत ? "

" येतील इतक्यांत ते. आणि या पण धंद्यांत काहींच राम नाहीं दरिद्री आहेत सारे लोक इथले. "

" हं, गरीब बिचारे ! आणि तुम्ही म्हणतां तसे गांजलेले पण "

" अहं, आपण म्हणतां तसे, " बाईनीं ताडकन उत्तर दिलें आणि हातानें त्याच्या नावावर एक जोरदार टाका घातला

" माफ करा हं ! मीच म्हटलं तसं. पण आपल्याला नाही तसं वाटत ? "

" मला ? " आवाज थोडा चढवून बाई म्हणाल्या " आम्हां दोघांनाहि

त्याच्याशिवाय भरपूर आहेत कामं. आमचा विचार फक्त जगायच कसं, एवढयापुरताच असतो. त्यांतच जातो आमचा सारा दिवस. दुसऱ्या विचारांची महारकी सांगितली आहे कुणी. आणि मी करणार दुसऱ्याचा विचार ? झालंच, भागलच मग ! ”

काय मिळेल ती बारीकसारीक माहिती गोळा करण्यासाठी आलेला बारसाड या बोलण्याने थोडा गोंधळला. पण आपल्या कामात तो पुरा मुरब्बी असल्यानें तसला कांहींहि विचार आपल्या चेहेऱ्यावर तिळमात्रहि न दिसू देतां, सहज बातचीत करीत असल्यासारखा काउंटरवर कोपर टेकून मधूनच हातांतील कॉगनॅकचे घुटके घेत तो उभा होता

“ आणि त्या गॅसपर्डच्या फांशीच प्रकरण ऐकलच असेल आपण अरेरे ! गरीब बिचारा ! ” सहानुभूतीचा भला मोठा सुस्कारा टाकीत तो म्हणाला

“ म्हणजे काय ! ” शांतपणें अगदी सहज उत्तर आलें. “ असलीं कृत्यं जर केलीं तर भोगलच पाहिजे त्यांच प्रायश्चित्त आपल्या खेळाच फळ काई त्याला अज्ञात नव्हत, तेंच मिळाल त्याला ”

“ पण, ” आपला आवाज अगदी खालावून कांहीं गुपित सांगत असल्यासारखा आणि चेहेऱ्यावर सुडाचे प्रच्छन्न विचार दाखवीत बारसाड म्हणाला —
“ या भागांतल्या लोकांना त्याच वाईट वाटून चीडहि आली असेल, मला वाटतं; नाहीं ? हें आपल तुमच माझ बोलण ह पण ! ”

“ खरच ? ” शून्यपणें बाईंनीं विचारलें

“ नाहीं ? ”

“ हे आलेच घरधनी ! ” मॅडम डेफार्ज म्हणाली

दारांतून आंत येत असलेल्या मालकांना अभिवादन करून मोहकपणें हसत बारसाड म्हणाला. गुड डे, जॅकस ! ”

त्याचेकडे टक लावून पहात डेफार्ज जागच्या जागींच उभा राहिला

“ गुड डे, जॅकस ! ” बारसाडनें पुनरुच्चार केला पण त्याच्या आवाजांत आतां तितकासा आत्मविश्वास दिसत नव्हता आणि डेफार्जच्या त्या स्थिर दृष्टीसमोर त्याच तें मोहक हास्यहि तितक सहज उमटत नव्हत.

“ आपली चूक होते आहे काहीं तरी, मासिअर, ” डेफार्जनें उत्तर केलें. “ आपण चुकत आहांत माझ नाहीं तें नांव. मी अर्नेस्ट डेफार्ज. ”

" अहो, एकच तें," कांहींसा फजित होऊन पण डौलांत बारसाड म्हणाला,
" गुड-डे ! "

" गुड-डे ! " शुष्कपणें डेफार्जनें परत फेड केली

" आपल्या या मालकीणबाईशीं बोलत होतों मी आपण आंत आलांत तेव्हा, कीं त्या बिचाऱ्या गॅसपर्डच्या बाबतींत इथल्या लोकांना खरीच सहानुभूति वाटते — आणि स्वाभाविकच आहे तें ! — आणि चीडहि आली आहे त्यांना त्यामुळें "

" मला तर कांहीं कोणी बोलला नाहीं तसं, " मान हलवीत डेफार्ज म्हणाला; " मला कांहींच माहिती नाहीं त्याची. "

असं म्हणून त्या छोट्या काउंटरच्या मागे जाऊन आणि आपल्या अर्धांगीच्या खुर्चीच्या पाठीवर हात टेकून त्या दोघानाहि अतिशय अप्रिय असलेल्या बारसाडकडे पहात तो उभा राहिला. शक्य असत तर त्यानीं दोघानींहि मोठ्या आनंदानें त्या वेळीं त्याची गठडी वळली असती.

हातांतील ग्लास रिकामा झाल्यामुळें बारसाडनें अगदीं शांतपणें आणखी एक ग्लास मागविला, कारण आपल्या कामांत असल्या अनुभवांचा त्याला सरावच होता. मॅडम डेफार्जनें ग्लासांत दारू ओतून आपलें विणकाम चालू केलें आणि मधूनच काही गुणगुणण्यास सुरुवात केली.

" माझ्यापेक्षा अधिक परिचित दिसतो आहे, आपल्याला हा भाग नाहीं ? "

" अंह, तसं काहीं नाहीं, पण परिचयाची इच्छा मात्र आहे या गरीब बापड्या लोकांची फारफार कींव येते मला, ' बारसाड म्हणाला. " आणि आत्तां असा आपला भाषणलाभ घेत असतां, आपल्या नावाशीं निगडित असलेलं असं कांही तरी आठवत आहे मला. "

" असं ? " काहींहि उत्सुकता न दाखवितां डेफार्ज म्हणाला.

" असं तर खरं. आपल्या डॉक्टर मॅनेटची जेव्हा मुक्तता झाली, तेव्हां त्यांचे जुने नोकर म्हणून तुमच्याच स्वाधीन केलं होतं त्याना, मला माहीत आहे. बघा, आहे कीं नाहीं मला ती माहिती ? "

" होय, तशीच होती वस्तुस्थिति; " डेफार्ज म्हणाला. तोंडानें गुणगुणत आपलें विणकाम करीत असतां हातानें सहज धक्का लागल्यासारखें करून त्याच्या अर्धांगीनें त्याला तुटक उत्तरें देत राहण्याची सूचना दिली होती.

" आणि तुमच्याचकडे त्यांची ती कन्या येऊन तुमच्या जवळून आपल्या वडिलांना तिन नेल, नव्हे ? " बारसाड म्हणाला. " तिच्या बरोबर कोणसे एक जाडेसे गृहस्थ, काय, बर त्याच नांव ? लॉरी मला वाटत — हा हां, टेलसन आणि कपनीचे लॉरी, पण होते, आणि तीं मग इंग्लंडला गेलीं. "

" होय, बरोबर आहे."

" इंग्लंडमध्ये पाहिल आहे बरेच वेळां मी त्या दोघाना — डॉक्टरना नि त्यांच्या कन्येला."

" अस ? " डेफार्ज म्हणाला.

" त्याची कांही माहिती नसेल अलीकडे तुम्हांला ? "

" कांहीं कारण नाही त्याच," आपल गाण नि हात थांबवून वर पहात मॅडम मध्येंच म्हणाली. " तीं सुखरूप पोचल्याच नि नतर दोन काय आलीं तेवढींच पत्र त्यांची आमचे दोघांचेहि रस्ते वेगळे, आणि म्हणून आतां कांहींच नाही पत्रांची ये जा "

" अगदी खर, मॅडम पण तिच लग्न व्हायच आहे आतां "

" व्हायचं आहे ! तिच्यासारख्या सुरेख पोरीच केव्हाच याच्या आधींच व्हायला हव होत. तुम्ही इंग्लिश फारीच थडे दिसतां मला ! " बाई म्हणाल्या.

" मी इंग्लिश म्हणून माहीत आहे तुम्हाला ? "

" तुमची वाणी तरी दिसते आहे. आणि जशी वाणी तसा वाण."

तिनें दिलेली ती ओळख त्याला कांहीं रुचली नाही, पण ती तशीच हसण्यावारी टोलवीत आणि ग्लासांतील कॉगनॅक घुटके घेत संपवीत तो म्हणाला—

" होय, मिस मॅनेटच लग्न व्हायच आहे आतां. पण इंग्लिशमनबरोबर नाही हां; तर तिच्या सारख्याच एका जन्मजात फ्रेंचमन बरोबर. आणि आपण गॅसपर्डची गोष्ट काढली होती मघांशी — अरेरे, गरीब बिचारा ! किती क्रूरपणें उडवला त्याला ! — काय मौज आहे पण, ज्याच्यासाठीं त्या बिचाऱ्याचा बळी घेतला त्या मार्किसच्या पुतण्याशीच, म्हणजे आजच्या विद्यमान मार्किसशींच तिचा विवाह व्हायचा आहे, बर का. पण तो मार्किस म्हणून नाहीं ह तिथें इंग्लंडमधें — फक्त मिस्टर चार्लस डार्ने "

मॅडम डेफार्जेचें विणकाम शांतपणें चाललें होतें, पण त्यांच्या घरधन्याच्या चेहेऱ्यावर मात्र त्या बातमीनें मनांत उसळलेली खळबळ स्पष्टपणें उमटली

होती. हातातील काडी ओढून आपली पाईप पेटवीत असतां त्याच्या प्रयत्नांस न जुमानतां, त्याचे हात किंचित् थरथरत होते नि मनांतील अस्वस्थपणा वाढत होता आणि या साऱ्याची नोंद बारसाडनेंहि जर केली नसती तर हेरागिरीला तो नालायकच ठरला असता.

पण अखेरीस एवढ्या एका बारीक किंवा मोठ्या फळाव्यतिरिक्त अधिक वेळ थांबूनहि कांहीं विशेष पदरात पडेल अशी त्याला आशा न दिसल्यामुळें, बारसाडनें हिशेब चुकता करून बाहेर पाय घेतला निघतां निघतां मसिअर नि मॅडम डेफार्जच्या परत भेटीचा लाभ आपल्याला लौकरच मिळेल अशी आशा मात्र त्यानें व्यक्त केली. तो निघून जाऊन कांहीं वेळ झाला तरीहि तीं दोघहि पतिपत्नी होतीं तशीच दुकानांत बसून राहिली होतीं. न जाणों ते बुवा परत आले तर ?

" खरी असेल काग," आपल्या पत्नीच्या पाठीवर हात ठेवून, तिच्याकडे पहात डेफार्ज म्हणाला, " मिस मॅनेटबद्दलची ही बातमी ?"

" त्याच्या तोंडून बाहेर पडली आहे," आपल्या भुवया किंचित् उचाऊन मॅडम म्हणाली, " तेव्हां असेल खोटी कदाचित्. पण खरी असणाहि शक्य आहे "

" जर असली —" डेफार्जनें सुरुवात केली नि तो अर्धवट थांबला.

" जर असली तर काय ?" पत्नीनें विचारलें.

" जर असली आणि आपण त्या विजयकाळांत जीवत असलों — तर, तर मला वाटत, देवान तिला नि तिच्या यजमानाना फ्रान्समध्यें येण्याची बुद्धि मात्र देऊ नये !"

" मला एवढच समजत," आपल्या नेहमींच्या थडपणानें मॅडम म्हणाली, " की त्यान्च्या दैवांत जस लिहिल असेल, तिकडेच दैव त्याला नेल्याशिवाय राहणार नाहीं. अधिक नाहीं मला कांही समजत "

" पण हें जरा चमत्कारिकच नव्हे का — निदान आत्तां तरी हें जरा चमत्कारिकच नाही का —" किंचित् अजीजीच्या स्वरांत डेफार्ज म्हणाला, " कीं त्या पोरी नि तिच्या त्या बापाविषयीं आपल्याला अशी सहानुभूति वाटत असतां, तिच्या नवऱ्याच नांव हें आत्तां असं, इथून जरा वेळापूर्वी गेलेल्या त्या नरकांतल्या कुत्र्याच्या जोडीन, तुझ्या हातानें इथें नोंदलं जाव ?"

" एवढ्यानेंच काय झालं आहे ! याहूनहि विलक्षण गोष्टी त्या कालांत घडायच्या आहेत; " पत्नीनें उत्तर दिलें " त्यांचीं नांव तर इथें मी ही नोंदलींच, आपआपल्या दैवाप्रमाण भोगतील दोघेहि; बस्स ! "

आपल विणकाम तिनें आतां गोळा केल आणि केंसांतील ती रक्तवर्ण निशाणीहि दूर केली. उपजत बुद्धीनें किंवा कोणी टेहेळयानें तसें सांगितल्यामुळें सेंट अॅटॉइनचे रहिवाशीहि मग एक एक हळू हळू दुकानांत प्रविष्ट होऊं लागले आणि दुकानाच नेहमींच गजबजलेल स्वरूप थोड्याच वेळांत तेथें परत नांदू लागलें.

सायंकाळ झाली आणि मॅडम डेफार्जची स्वारी हातांत आपले विणकाम घेऊन नेहमींसारखी आसमतांत् सचारार्थ बाहेर पडली किती तरी घरांतून डोकावत आणि किती तरी बायांच्या कानाशीं कुजबुजत तिचा सचार चालू होता. आणि प्रत्येक स्त्रीचा तो खगलेला विरूप चेहेरा कशानें तरी अधिकच भेसूर होत होता.

तिचा घरधनी तिच्याकडे अभिमानानें दृष्टिक्षेप करीत आपलें धूम्रपान करीत दारांत उभा होता. " थोर — फारच थोर नि कर्तबगार आहे बुवा हें प्रकरण, विलक्षण करारी, नि सामर्थ्य ? — छे ! "

काळोखाचें साम्राज्य बाहेर वाढतच चाललें होतें आणि मॅडमचा तो निशाचरी सचार संपल्यावर तिकडे प्रार्थनामंदिरांतील घंटानाद आणि बादशाही गाड्याच्या ढोलाचा आवाज वातावरणांत घुमू लागला. सेंट अॅटाइन अधकाराच्या काळयाकभिन्न कांबळ्यांत गुडुप झाला, आणि शांततेचें साम्राज्य सर्वत्र वेगानें पसरलें.

पण त्याच वेळीं दुसऱ्या एका आगामी घटनेची उग्र काळी कुळकुळीत भयानक दाट छाया, साऱ्या फ्रान्सचा ग्रास करण्यासाठीं आ वासून त्याच बाजूनें येत होती. आणि सेंट अॅटाइनमधील मॅडम डेफार्ज नि तिच्या साऱ्या मैत्रिणी त्या भीषण छायेंत धडावेगळया होणाऱ्या शिरांची गणती करीत बसलेल्या सेंट अॅटॉइनला दिसायच्या होत्या.

---

.... १ ....

सूर्य नुकताच अस्तास गेला होता आणि वर निरभ्र आकाशांत पसरलेल्या मोहक अरुणप्रकाशांत सारं लंडन नुसत न्हाऊन निघत होतं. सोहोमधील त्या नेहमी शांत असणाऱ्या भागांत तीच प्रसन्न शांतता पसरली होती त्या प्रसन्न शांततेंत घरापुढील जागेंतील रुंदपर्ण पाइन वृक्षाच्या छायेंत डॉक्टर आणि त्यांची ती लाडकी कन्या विश्रब्धपणें बसलीं होतीं. आणि तितक्याच मुग्ध मोहकपणें पूर्वेच्या माथ्यावर चंद्राचें बिंब येऊन विसावलें तरीहि तीं दोघं पिता-पुत्री त्या रम्य प्रकाशांत त्यांचें मुखमंडल उजळत असतां तशींच शांतपणें बसलीं होतीं

ल्यूसी उद्यांक विवाहबद्ध व्हायची होती आणि म्हणूनच तिनें हीं सायंकाळ त्यांच्या एकट्याच्याच सांनिध्यांत काढण्याचें ठरविलें होतें म्हणून तीं अजूनहि तशींच त्या रुंदपर्ण वृक्षाखालीं एकटींच बसलीं होतीं

"आनंद आहे ना आतां बाबा?"

"होय बाळ, अगदीं पूर्ण"

या एकदोन वाक्याखेरीज शब्दांची दुसरी कोणतीच देवघेव त्या दीर्घकाळांत त्यांच्यात झाली नव्हती. तीं अशी आंगणांत बसलेली असतां नेहमीं कांहीं ना कांहीं करीत असलेली ल्यूसी आज अगदी स्वस्थपणें आपल्या पित्याचा हात धरून भरल्या अंत:करणानें स्तब्ध बसली होती तिच्या आयुष्यांतला आजचा हा दिवस कांहीं वेगळाच होता तो कधीहि, कांहींहि देऊनहि परत येणार नव्हता. त्याचें मोल कांहीं वेगळेंच होतें.

"मलाहि अतिशय आनंद वाटतो आहे आज, बाबा परमेश्वरानं मोठ्या-प्रेमानं माझ्या प्रेमाला मोहोर आणला आहे. आणि माझा चार्लस — किती उमदा आहे नाहीं तो बाबा! पण तरीसुद्धां माझ्या त्या चार्लससाठीं, आपल्या प्रेमांत जर अंतराय उत्पन्न झाला असता आणि मी थोडी दूर — अगदीं चार दोन रस्ते सुद्धां — गेलें असतें, तर माझं मन मला जन्मभर खात राहिलं असत. आणि आतां सुद्धां —"

तिचा कंठ रुद्ध झाला नि तिच्यानें पुढें बोलवेना. तिनें मोठ्या आवेगानें

आपल्या पित्याला घट्ट मिठी मारली. नेहमींच किंचित् उदास वाटणारा चंद्र-प्रकाश तसाच खिन्नपणें आजहि त्यांच्यावर प्रकाशत होता.

" बाबा ! अगदीं खरं खरं सांगा हं मला आतां, " जरा वेळानें त्यांच्या छातीवर विसावलेलें आपलें मस्तक उचलून नी आपली स्निग्ध दृष्टि त्यांच्यावर लावून ती म्हणाली. " माझ्या या नव्या आयुष्यातलं माझं प्रेम नि कर्तव्य, तुमच्या माझ्याआड कधींच नाहीं का येणार ? माझी आहे खात्री त्या बाबतीत, पण तुम्हाला सुद्धां वाटतं तसं ? तुमचं अगदी आंतलं मन देतं आहे तुम्हाला अशी ग्वाही ? "

" होय बाळ, अगदीं पूर्णपणें ! ' त्यांच्यांत आजपर्यंत कधींच न दिसल्या इतक्या आत्मविश्वासानें नि प्रसन्नपणें डॉक्टर म्हणाले " एवढंच नव्हे, तर उलट तुझ्या या विवाहमांगल्यानें, कधींच नव्हता इतका सुखाचा माझा भविष्य-काळ या विवाहमांगल्यानेंच मला मिळणार आहे, असं माझं मन मला स्पष्ट-पणें सांगतं आहे — समजलीस !" तिच्या मस्तकावरून हळुवारपणें हात फिरवीत नि त्याचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेत ते म्हणाले.

" बाबा — बाबा तेवढं जर साधलं मला — "

" साधेल, साधेल बाळ ! नक्की साधेल इतकी शंका कां वाटते तुला त्याची ? मला तर तें सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ दिसत आहे. आणि तुला — माझ्या या लाडकीला, तुझ्या या वयात माझ्यासाठीं अशी प्रेमानें राबतांना पाहिली, की तुझ्या या वांया चाललेल्या जीवनाबद्दल मला किती — "

तिनें आपला हात त्यांच्या ओंठावर ठेवला, पण त्यांनी तो हळूच दूर करून ते पुढें बोलू लागले.

" होय, माझ्यासाठीं वांया चाललेल्या, कारण या वठलेल्या खोडाच्या आश्र-यानें किती दिवस आतां ही नाजुक वेल रहायची ? आपल्याच वयाच्या जोडी-दाराच्या आश्रयानें, तिनें आपला आता बहरास येत असलेला संसार थाटला पाहिजे माझ्यासाठीं ती वेल आतां अशी फलपुष्पहीन, विफल सुकून जातां कामा नये. परमेश्वरी इच्छेचा तो मी उपमर्द केल्यासारखंच होईल बाळ ! मातेच्या निरपेक्ष प्रेमानें माझ्यासाठीं तूं सारखी कष्ट करते आहेस. त्या तुझ्या मनाला, माझ्या अंतःकरणांत उसळत असलेल्या तुझ्या या वांया चाललेल्या आयुष्याबद्दलच्या विचारांची, कशी कल्पना येणार ? पण असं बघ पोरी, तुझा

सुखाचा पेला असा परिपूर्ण भरलेला नसतांना, माझ्या सुखाला तरी पूर्णता कशी यायची ? "

" मी जर चार्लसला पाहिलाच नसता, बाबा, तर अगदीं सुखानं तुमच्या सगतींत माझा जन्म गेला असता. "

चार्लसवांचून आपलं जिण आपल्याला आतां विफल वाटल असत, ही तिच्या त्या बोलण्यांत अभावितपणें ध्वनित झालेली कबुली ऐकून, त्यांच्या चेहेऱ्यावर हास्य उमटलें, नि ते म्हणाले —

" दैवाची इच्छा तो चार्लसच असावा अशी होती बाळ. पण चार्लस जर भेटला नसता तर दुसरा कोणी तरी उमदा तरुण तुझ्या आयुष्यांत आज ना उद्यां आलाच असता. पण तस जर कांहीं झाल नसत, तर तें माझ्याच मुळें आणि मग ती गोष्ट सारा जन्मभर मला सारखी खात राहून माझ जीवन तिनें दु खी केल असत नि त्या दु खाची छाया तुझ्यावरहि पडल्यावांचून राहती ना. माझ्या गतजीवनाचा तो परिपाक आहे असच मी तरी समजलों असतों ' "

आज किती तरी दिवसांनीं, चार्लसच्या खटल्याच्या वेळेपासून जवळजवळ, आपल्या गतायुष्याचा उल्लेख त्यानी केला होता. कांहीं चमत्कारिक भावना ते शब्द ऐकत असतां तिच्या मनात उत्पन्न होत होती; आणि पुढें किती तरी दिवस तिच्या मनांतून ती नाहीशी झालीहि नाहीं.

" तें पहा ' " त्या प्रसन्न चंद्रबिंबाकडे वर हात करीत डॉक्टर म्हणाले. ' किती तरी वेळां मला तो प्रकाश असह्य होऊन माझ्या कोठडीच्या गजांतून या चंद्रबिंबाकडे मी पाहिल आहे. माझ्या आयुष्यातून कायमच्या नाहीशा झालेल्या माझ्या सौख्यनिधानावर त्याचा प्रकाश आत्तां पसरला असेल, याची जाणिव त्याच्याकडे मी पाहत असतां मला असह्य होऊं लागून वैतागानं मी आपल डोक अनेक वेळां कोठडीच्या भिंतीवर ताडताड आपटल आहे. तर कित्येक वेळां असा शून्यपणें, विषण्ण मनानें वर त्याच्याकडे पहात असता त्या मोहक चंद्रबिंबावर त्या गजांच्या आडव्या उभ्या आकृती नाचतांना माझ्या डोळ्याना दिसत. " तसेंच चंद्राकडे पहात विचारमग्न स्थितींत आपल्याशींच पुटपुटल्यासारखे ते मग पुढें म्हणाले " मी मोजल्यासुद्धां होत्या त्या रेघा, ती विसावी रेघ अगदी माराकुटीनेंच आंत राही, मला वाटत."

त्या गत काळाविषयीं ते तसें बोलत असतांना तिचें सर्वांग कांहीं चमत्कारिक विकारांनीं थरथरत होत पण तिला भयानें धसका बसेल असं मात्र आज त्यांच्यांत तिला कांहीं दिसत नव्हत. ते जसे कांही फक्त आपल्या आजच्या सुखी नि आनंदी दिवसांचा, गत कालातील त्या भयानक आपत्तीशीं असलेल' विरोधच तिला दाखवीत होते

"तस तें चंद्रबिंब पहात असतांना, माझ्या जन्माला घातलेल्या बाळाचे विचार हजारों वेळां माझ्या मनांत तेव्हां उसळत असत क्रूर दैवान त्याच्या-पासुन मला दूर झिजाडूनच टाकल होत पण जिवत असेल का तें माझ बाळ, कीं त्या दुर्दैवी मातेच्या दारुण दु खान तसच बिचार आंतल्या आंत करपून गेल असेल ? आपल्या बापाच्या आपत्तींचा सूड घेणारा तो बच्चा होईल कीं आपल्या आईची मूर्तिमत प्रतिमा अशी ती छोकरीच असेल ? सूड — होय ' अगदं अशक्य होत सूडाच्या विचाराना त्य। वेळीं दडपून टाकण असा होता एक काळ. पण माझ्या त्या बच्चाला माझी कथा समजलीच नाहीं तर, किंवा मी आपण होऊनच जगाचा तसा निरोप घेतला, असंच त्याच्या मनांत आल तर — असे असंख्य विचार तेव्हा माझ्या मनांत उसळत "

ती त्याच्या अधिकच जवळ सरकली नि तिनें त्यांच्या मस्तकाचें आणि हाताचें चुंबन घेतलें

"मला पूर्ण विसरलेली — किंवा माझ्याविषयीं पूर्ण अज्ञान असलेली अशी माझ्या कन्येची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर मी उभी केली आहे चंद्रकलेसारखी होत असलेली तिची वाढ माझ्या डोळ्याना अमूर्तपणें दिसली आहे आणि माझ्या भागधेयाची कांहीच माहिती नसलेल्या तरुणाशीं प्रेमबद्ध झालेलीहि मी तिला पाहिली आहे त्या साऱ्या आप्तेष्टांच्या स्मृतींतून मी पार नाहींसा झालों आहे आणि त्या भावी पिढींत तर माझी जागा शून्य, रिती, कधींच न भरलेली अशी वाटते आहे. या चंद्राकडे पहात असतां माझी स्वप्नसृष्टि ही अशी होती "

"तुमची ती स्वप्नसृष्टि, बाबा ' माझाच जसा कांहीं निषेध करते आहे अस वाटत आहे मला, हें ऐकतांना "

"तुझा ल्यूसी ? छे ' तू माझ्या आयुष्यांत ओतलेल्या मुक्तहस्त सौख्यसुधे-मुळेंच मला आज ती आठवण होते आहे फक्त — पण काय सांगत होतों मी?"

"तिला तुम्ही कांहीं आठवत नाहीं, तुमचा ती विचारदेखील करीत नाहीं."

" बरोबर ! पण दुसऱ्या कांहीं वेळां, त्याच सौम्य खिन्न चंद्रकिरणांनीं माझ्या मनाला शांति मिळाल्यानंतर —— माझा हात घट्ट पकडून तुरुंगाच्या त्या कोठडींतून बाहेरच्या स्वतंत्र मोकळ्या वातावरणांत मला मोठ्या प्रेमानें घेऊन जात असलेली माझ्या कन्येची मूर्तिहि, माझ्या कल्पनाचक्षूंनी माझ्यासमोर रेखाटली आहे आत्तां इथे दिसते आहेस अशीच तिची मूर्ति त्या चंद्रकिरणांत मी पाहिली आहे फक्त आत्तांसारखे तिचे हात असे माझ्याभोंवती मला घट्ट बिलगलेले मात्र नसत ह ! ती आपली बिचारी त्या गजांच्या बाहेर उभी असे. अशा दोन मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर नेहमीं उभ्या रहात. एक अशी नुसती स्वस्थ कांहींच हालचाल न करतां तिथे उभी असे तुझ्या आईसारखी ती कांहींशी दिसे. दुसर काहीं तिच रूप मला नीटस आठवत नाहीं. दुसरी —— ती पण तशीच अशी तुझ्यासारखी अगदीं आपल्या आईसारखी दिसे. पण ती पहिली नि ही दुसरी, दिसायला सारख्या, पण एकच मात्र नव्हेत ह ! समजत आहे तुला मी काय म्हणतों आहे तें ? कठीणच, मला वाटत ! असले गोंधळ उडवणारे फरक नीट समजण्यासाठीं मला वाटत, तुरुंगातला तो एकांतवासच भोगला पाहिजे ! "

गतकालातील आपल्या विचारांची ते अशी मूर्तिमत रेखाटणी करीत असतां, ते जरी तिला पूर्णपणें शांत नि स्वस्थ दिसत होते, तरीहि तिचें मन मात्र मुळींच थाऱ्यावर नव्हतें. तिचा जीव भीतीनें जसा उडून गेला होता.

" माझ्या मनाच्या त्या शांत अवस्थेंत, ती दुसरी माझा हात धरून तुरुंगाच्या बाहेर आपल्या सुखाच्या संसारांत म[illegible] जाई तिच्या त्या सुखी संसारात सुद्धां आपल्या त्या दुर्दैवी पित्याची तिला नेहमीं आठवण होई. तिच्या खोलीत माझ भव्य तैलचित्र तिन टांगल होत आणि माझ्यासाठीं परमेश्वरालाहि ती वारंवार आळवी. तिच सार जीवन कस नेहमी कामांत गढलेल, परोपकारी नि सदा आनंदी. पण माझ्या जीवनाची छाया मात्र त्या सर्वांवर करुणपणें वावरताना दिसे. "

" मीच ती, बाबा ! तिच्या निम्म्यानें सुद्धां नाही मी चांगली, पण माझ प्रेम मात्र अगदीं तिच्यासारखच आहे."

" आणि तिनें आपले बाबालोक मला दाखवले," डॉक्टर पुढें सांगू लागले, " त्यांना होती माझी माहिती नि माझ्याविषयीं त्यांना हळहळ पण वाटे. आणि

अशीं एकाद्या भयकर तुरुगावरून तीं कधीं जाऊं लागलीं की, कशी बिचारीं भयभीत होऊन त्या अक्राळविक्राळ दाराकडे पहात, दुरून अगदीं लांबून हळूच आपसांत कुजबुजत निघून जात. पण तिनें मला कायमचं मुक्त कधींच केल नाहीं. मला वाटत, सार कांहीं दाखवून मला ती परत कोठडींत आणून सोडी. पण तरीहि माझ मन अश्रु गाळल्यानंतर हलक होऊन, गुडघे टेंकून मी माझ्या त्या बाळीला आशीर्वाद देत असें."

"बाबा, बाबा ! मला येईल तिची जागा घेतां ? मलाहि द्याल ना, उद्यां तसाच खराखुरा आशीर्वाद ?"

"माझा निरतरचा आशीर्वाद आहे तुला बाळ ! शब्दांनीं मला सांगतां येणार नाहीं अशा तुझ्यावरच्या माझ्या प्रेमामुळेंच या जुन्या आठवणी मला आज झाल्या आहेत. परमेश्वराचा मी कसा उतराई होऊ तेंच मला समजत नाहीं, ल्यूसी, कारण कल्पनेचे घोडे त्या काळांत मी कितीहि बेफामपणें पिटाळले असते, तरी आजच्या या वस्तुस्थितीच्या जवळ मी येऊन कधींच पोंचलो नसतों. इतक सुख मला तुझ्या सगतींत आज मिळाल आहे आणि भविष्यकाळांतहि तें तसच आपल्याला मिळायच आहे."

त्यांना घट्ट बिलगलेल्या आपल्या कन्येच्या मस्तकावरून त्यांनी अतिशय प्रेमानें हात फिरवला नि वर आकाशाकडे दृष्टी लाऊन त्या विश्वपित्याचे त्यांनीं त्या दिव्य ठेव्याबद्दल अतिशय विनम्रभावानें आभार मानले

—रात्रीची नेहमींची निगूढ शांतता त्या आनंदी घरावर आजहि तशीच पसरली होती, आणि उद्यांच्या आनदी सुखस्वप्नांत सभोंवारच मार जगहि नेहमींसारखच रंगल होत. मिस प्रॉसची स्वप्नसृष्टी आपल्या लाडक्या ल्यूसीच्या विवाह मांगल्यांत रगून मस्तका खालची उशी आनदाश्रूंनीं ओली करीत होती पण तिच्या त्या ल्यूसीची झोंप मात्र आज जागृतच होती. रात्रीच्या त्या गाढ शांततेंत आपल्या खोलींतून खालीं डॉक्टरांच्या शयनागारांत तिनें दोन तीन-वेळा फेरी मारली होती आणि कांहींतरी अज्ञात भीतीनें अस्वस्थ होऊन आतांहि ती त्या पहांटेच्या उतरत्या प्रहरांत आपल्या पित्याच्या खोलींत उभी होती.

सर्व कांहीं पण जागच्या जागीं होतें; सर्व जसं कांहीं अगदीं पूर्ण शांत होत. तें शुभ्र केशावृत वृद्ध मस्तक नेहमींप्रमाणें शातपणें खालील शुभ्र उशीवर विसावलं होत, आणि त्यांचे हात पाघरुणावर पडून विश्रांती घेत होते हातांतील दिवा तिनें दूर ठेवला आणि पायांचा मुळींच आवाज न करतां त्यांच्या बिछान्याजवळ जाऊन तिनें त्यांच्या मुखाचें चुबन घेतलें, आणि त्याच्याकडे पहात ती कांहीं वेळ तशीच उभी राहिली

त्यांच्या प्रसन्न मुखावर, काळानें उठवलेल्या प्रखर खुणा आतां उठून दिसत नव्हत्या. कांहीं विलक्षण आत्मसयमानें, झोंपेच्या साम्राज्यांत सुद्धां त्याचें पुसट अस्तित्व दिसणार नाहीं इतका विजय त्यांनीं त्याच्यावर मिळवला होता आणि अत:करणांत सतत दबा धरून बसलेल्या त्या अदृश्य मारेकऱ्याला त्यानीं आज पुरा गारद केला होता

तिनें आपला हात हळूच त्याच्या छातीवर ठेवला आणि त्या सर्वसाक्षी सर्वेश्वरानें, तिला आपल्या प्रेमाच अवगुठन त्यांच्याभोंवतीं असच ठेवण्याच सामर्थ्य द्याव अशी त्याची आळवणी केली, आणि परत एकदां त्यांच्या मुखाचें अतिशय हळुवारपणें चुबन घेऊन ती हळूच तेथून निघून गेली.

सूर्याचें किरण शांतपणें खोलींत पसरले आणि त्या रुदपर्ण वृक्षाच्या पानांची सांवली, त्यांच्यासाठीं केलेल्या प्रार्थनेच्यावेळीं झालेल्या त्यांच्या कन्येच्या ओठांच्या नाजुक हालचाली इतक्याच नाजुकपणें, त्यांच्या चेहेऱ्यावर आता मागे पुढें होत होती.

- - -

.... १० ....

लंडनच्या त्या नेहमीं अभ्राच्छादित असणाऱ्या वातावरणांत मदकिरण दिसणारा सूर्य नारायण आज आपल्या सपूर्ण वैभवानें ल्यूसी मॅनेटच्या मगल विवाह दिनानिमित्त आकाशांत प्रकाशला होता आणि आनदाच प्रसन्न साम्राज्य चोंहीकडे पसरल होत वधूचा मगलवेश परिधान करून ल्यूसी आपल्या पित्याच्या ऑफिस रूमजवळ मिस प्रॉस नि मि. लॉरीशीं गप्पागोष्टी करीत उभी होती. ते दोन्हीहि प्रेमळ जीव आपल्या लाडक्या ल्यूसीच्या सर्वच गोड दिसणाऱ्या गोष्टींच कौतुक करीत होते. दोघांच्याहि डोळ्यांत आनदाश्रु तरळत होते आणि दोघांचही हृदय भरून आल होत. आणि शेजारच्या खोलींतील पाऊलांची चाहूल जर त्याना लागली नसती तर त्यांच तें कोडकौतुक किती वेळ चालल असत कोण जाणे. पण आतां खोलींत पावलांच्या आवाज होऊ लागला होता म्हणून आपल्या त्या बोलण्याला एकदम खीळ घालून ल्यूसीच्या पाठीवर प्रेमानें थोपटीत लॉरी म्हणाले—

"हें बघ, पोरी! त्यांची मुळींच काळजी तू करू नको. तू परत येईपर्यंत मिस प्रॉस नि मी डॉक्टरनां अगदीं नीट सांभाळू. मी बॅंक बीक सुद्धा नाहीं पाहणार मग मला वेळ झाला नाही तर. आणि मग तुम्ही तिकडे वेल्समध्यें जायला निघालांत, कीं पहा तू सुद्धा म्हणशील कीं, बाबाची प्रकृति कशी अगदीं मी होतें तशी आहे म्हणून. तर काय समजल ? ह ' पण बघ उघडलच तें दार."

डॉक्टरांच्या खोलीचं दार उघडल आणि चार्लस डार्ने नि ते दोघे बाहेर आले. डॉक्टरांचा चेहेरा अतिशय पांढरा फिक्कट दिसत होता आणि जरा वेळापूर्वीचा तजेला त्यांच्या चेहेऱ्यावर आतां तिळमात्रहि दिसत नव्हता. पण त्यांच्या एकदर शातवृत्तीत मात्र कांहीं फरक पडला नव्हता. तरीहि डॉक्टरांच्या चेहेऱ्यावर वारवार दिसणारी ती भीतीची नि एकलकोंडेपणाची पुसट छाया आतां परत तिथें उमटलेली, लॉरींच्या चाणाक्ष दृष्टीतून मात्र सुटली नाहीं.

खोलींतून बाहेर येतांच डॉक्टरांनी आपल्या कन्येचा हात पकडला आणि

ते पायऱ्या उतरून खालीं गाडींत जाऊन बसले. बाकीची मंडळी दुसऱ्या गाडींतून चर्चमध्यें जाऊन पोंचतांच कोणाहि अपरिचिताची दृष्टि त्यांच्यावर न जातां चार्लस डार्ने आणि ल्यूसी मॅनेट चर्चमधील धर्माधिकाऱ्याच्या साक्षीनें विवाहबद्ध झालीं आणि घरीं परत येऊन तितक्याच शांतपणें भोजन उरकल्यानतर डॉक्टर आपल्या लाडक्या कन्येला दृढालिंगन देऊन ते दाराजवळ येऊन उभे राहिले मिस्टर लॉरी नि मिस प्रॉसनीं मोठ्या प्रेमानें तिला कुरवाळून तिला निरोप दिल्यावर डॉक्टरनीं परत एकदां आपल्या कन्येला पोटाशीं धरलें आणि मग तिला हळुवारपणें थोपटीत ते म्हणाले — " ह चार्लस ' नीट साभाळ आतां आपला हा ठेवा, आतां तुझी झाली ती '"

तिनें भरल्या डोळ्यांनीं आणि थरथरत्या ओठानीं गाडींत पाऊल टाकलें. त्यांच्या दिशेनें तिचा थरथरता हात एकदां हालला आणि ती दिसेनाशी झाली.

तीं तिघच फक्त आतां आंगणात उभीं होतीं. लॉरींची दृष्टि डॉक्टरांच्या चेहेऱ्याकडे गेली. एकादा विषदिग्ध बाण रुतल्यासारखा त्याचा चेहेरा विकल दिसत होता.

आपल्या मनांतील कितीतरी विचार नि भावना, आत तुफान वेगानें उफाळत असतां, त्यांनीं हा वेळपर्यंत दडपून ठेवल्या होत्या आणि त्याची आतां आवश्यकता शिल्लक न उरल्यानें त्या मनोवेदनांचा आविष्कार त्यांच्या चेहेऱ्यावर आतां होण अगदी अपरिहार्य होत. त्याच लॉरींना कांहीच वाटल नसत. कारण ती फक्त एक स्वाभाविक प्रतिक्रिया होती. पण ती जुनी, भीतीची, भकास विषण्ण छाया त्याच्या चेहेऱ्यावर परत आत्तां पसरली होती, आणि त्यानेंच लॉरींचें मन भीतीनें अस्वस्थ होत होतें. आणि मग ते जिना चढून वर गेल्यानतर डॉक्टर आपलें मस्तक विमनस्कपणें घट्ट दाबून आपल्या खोलीकडे तसे उदासवाणे गुपचूप निघून गेल्यावर तर डेफार्जच्या दारू दुकानाची त्यांना तीव्रपणें आठवण झाली.

"मला वाटत आपण त्यांना आतां त्रास न दिला तर बरा," मिस प्रॉसकडे चिंतायुक्तपणें पहात ते हळूच म्हणाले. "एकटेच राहू द्या त्यांना थोडा वेळ. मीहि जरा बॅंकेंत जाऊन येतों नि मग आपण त्यांना घेऊन बाहेर मोकळ्यावर थोडे फिरून येऊ, की झाल ! मग येईल ताळ्यावर सार "

पण बॅंकेंतून दोन तासांनी ते परत आल्यावर डॉक्टरांच्या घराचा जिना

चढून त्यांच्या खोलीजवळ ते एकटेच गेले मात्र, आणि आंतून कानावर हातो-डीचा आवाज येताच दचकूनच ते दाराजवळ उभे राहिले. हातोडीनें बूट ठोक-ल्याचा आवाज आतून सारखा येत होता.

" अरे देवा ! हा काय प्रकार ?" ते म्हणाले.

" अग आई ग ! आतां काय कराव, झाल सपल सारं !" त्यांच्या पाठो-पाठ वर आलेली मिस प्रॉस आपले हात पिळीत तळमळून उद्गारली. " आतां कस तोंड दाखवू मी माझ्या बाळीला नि काय सांगू ! मला ते ओळखीत पण नाहीं आहेत, नि असे हे बूट शिवीत बसले आहेत !"

तिला कशीबशी शांत करून मि. लॉरी आंत गेले. तो बाक खिडकीजवळ पूर्वीसारखा पुढें घेऊन नि मान खालीं घालून डॉक्टर एकाग्र चित्तानें आपलें काम करीत होते.

" डॉक्टर मॅनेट. प्रिय डॉक्टर मॅनेट !" —

डॉक्टरनीं मागें वळून एक क्षणभरच त्याचेकडे कांहींसे रागानें नि कांहीसे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें आणि आपलें काम परत सुरू केलें.

त्यांनी आपल्या आंगांतील कोट काढून ठेवला होता; गळयाजवळील शर्टची बटणें मोकळीं होतीं आणि पूर्वीचा तो भकास खंगलेला चेहेरा सुद्धां आपल्या जागीं परत आला होता. मध्येंच झालेल्या त्या अडथळयानें त्याचा हात आतां जोरानें चालत होता, ठराविक मुदतींत जसं काहीं त्यांना तें काम पुरं करा-यचं होत.

मि. लॉरीनीं त्यांच्या हातांकडे दृष्टी टाकली. तो जुना जोडाच ते आता शिवीत होते. जवळच पडलेला दुसरा त्यांनीं आपल्या हातात घेऊन डॉक्टरांना तें काय आहे म्हणून विचारलें.

" एका तरूण स्त्रीचा बाहेर जाण्याचा शू आहे तो," वर पाहिल्याशिवाय ते पुटपुटले. " कधींच पुरा व्हायला हवा होता तो. राहू द्या तो."

' पण डॉक्टर मॅनेट, इकडे वर बघा माझ्याकडे !"

आपलें काम न थांबवितांच त्यानीं निमूटपणें वर पाहिलें.

" तुम्ही ओळखतां मला डॉक्टर ? पहा विचार करा. हा काहीं तुमचा धंदा नाहीं. पहा—पहा नीट विचार करा दोस्त !"

पण त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. वर पहा म्हणून सांगतांच ते निमूटपणें

तेवढी आज्ञा मात्र पाळीत पण लॉरींनी केलेल्या कोणत्याच अजीजीचा परिणाम न होऊन ते एक अवाक्षर बोलले मात्र नाहींत. एकाद्या जन्मजात बहिऱ्याच्या कानावर पडल्यासारखेच त्याच्या कानांवर ते शब्द कांहींच परिणाम करू शकत नव्हते आणि अगदीं मूकपणें त्यांचे काम सारखें न थांबता चालू होतें. मात्र मधूनच ते एखादेवेळीं न सांगताच आपली दृष्टि भेदरटपणें लॉरींकडे लावीत. त्यांच्या मनांत उसळलेल्या औत्सुक्य नि गोंधळ यांच्या संमिश्र भावनाच जणु-काय त्यांना तसें करायला लावीत होत्या पण तेवढ्याच एका बारीक गोष्टीमुळें लॉरींना अधुक का होईना पण कांहीं आशा मात्र वाटत होती.

आपल्या मनाशीं मग कांहीं निश्चय करून ते बाहेर आले. प्रथम त्यांनी ती गोष्ट ल्यूसीपासून दडवून ठेवायची म्हणून ठरविलें. आणि मिस प्रॉसच्या संमतीनें, डॉक्टर कांहीं धंद्याच्या कामानिमित्त आकस्मिकपणें परगांवी गेले आहेत असें त्यांनीं ल्यूसीला मिस प्रॉसकडून पत्र लिहून टाकविलें बाहेर इतर लोकांनाहि, डॉक्टरनां थोडें बरें नसल्यानें कांहीं दिवस ते कोणालाहि भेटणार नाहींत असें सांगून टाकलें हें सर्व करीत असतांना डॉक्टर लौकरच त्या अवस्थेंतून बाहेर येतील अशी त्यांना आशा वाटत होती आणि तसं झालं तर मग काय करायचं तेंहि निश्चित करणं जरूर होतं पण तें करण्यासाठीं डॉक्टरांच्या सर्व हाल-चालींचें सूक्ष्म निरीक्षण करणें अगत्याचें होतें. कारण ते शुद्धीवर आल्यावर काय करायचें हें त्यावरच अवलंबून होतें

आपल्या मनाशीं हे सर्व ठरविल्यावर मि लॉरींनीं बँकेजवळून आपल्या आयुष्यांतील पहिलीच रजा घेतली आणि डॉक्टरांच्या खोलींतील खिडकीजवळ त्यांनीं आपलें आसन ठोकलें एकदोन दिवसांतच त्यांनीं डॉक्टरांजवळ संभाषण करण्याचे केलेले प्रयत्न सोडून दिले कारण त्यानें त्यांचा अस्वस्थपणा उलट वाढतोसाच दिसू लागला स्वस्थपणें ते मग त्या खिडकीजवळ, डॉक्ट-रांच्या त्या भ्रमाचा जणु काय मूक निषेध करीत आपलें लेखन वाचन करीत बसून राहू लागले आणि तसे बसलेले असतांनाच आपल्या सर्व प्रकारच्या हालचाली मोकळेपणानें करीत ते तुरुंगांत नसल्याची मूक जाणीव डॉक्टरनां देतां येईल तितके वेळां मात्र देत.

त्या पहिल्या दिवशीं दिलेल्या खाद्यपेयांचा मूकपणें स्वीकार करीत सारा दिवसभर — अगदीं काळोख पडून लॉरींना तिथें लिहिणें वाचणें अशक्य झालें

तरी — डॉक्टर मॅनेट आपले हातांतील काम सारखे करीत होते. अखेरीस आंत दिसणें अशक्य होऊन त्यानीं हत्यारें खाली ठेवल्यावर लॉरी आपल्या जागेवरून उठून त्यांना म्हणाले — " बाहेर जायच का ? "

त्यानीं मागल्या सारखच प्रथम आजूबाजूला पाहून मग त्याच जुन्या तऱ्हेनें त्यानीं वर पाहिलें आणि त्याच जुन्या आवाजांत हळू विचारलें — "बाहेर ?"

" होय, माझ्याबरोबर फिरायला. काय हरकत आहे ? "

त्यानीं कांहींच उत्तर दिलें नाही आणि ते स्वस्थ बसून राहिले पण लॉरींना मात्र वाटल कीं, आपल्या मांडीवर कोंपरें टेकून नि आपल्या मस्तकाला त्यांचा आधार देत ते जणु काय स्वत लाच गोंधळल्यासारखे अस्पष्टपणें विचारीत होते, "काय हरकत आहे ?" आणि त्यांतच त्या चतुर मुरब्ब्याला आशेचा अधुक स्फुलिंग आता मिळाला, नि त्यानीं हरप्रयत्नानें त्याला फुलविण्याचा निश्चयहि केला

रात्री मिस प्रॅासहि मग त्यांच्या मदतीला आली आणि त्यानीं आळीपाळीनें रात्रभर शेजारच्या खोलींतून आपला पहारा चालू ठेवला. रात्रीं जेवणानतर किती वेळ तरी डॉक्टर खोलींत सारखे फिरत होते आणि बरीच रात्र झाल्या-नतरच त्यानीं अंथरुणावर अंग टाकलें. पण त्यांना झोंप मात्र शांत लागली होती सकाळी लौकर उठून ते आपल्या बांकाजवळ गेले आणि ते बूट शिव-ण्याचा त्यांच्या कार्यक्रम पहिल्या दिवसासारखाच पुन्हा सुरू झाला.

आणि त्याच्यावर पहारा करण्याचा मिस्टर लॉरींचा कार्यक्रमहि त्या दुसऱ्या दिवशीं पहिल्यासारखा परत चालू झाला. आज मधून मधून डॉक्टरनां मुद्दाम नांवानें हांक मारीत त्यांच्या परिचित विषयावर ते बोलत होते. तरी आजहि डॉक्टरांकडून कांहीं उत्तर येत नव्हत. पण सर्व कांहीं ऐकून घेऊन त्यावर कांहीं तरी विचार करीत — अस्पष्टपणें कां होईना — पण विचार करीत असल्यासारखे मात्र ते मधून मधून दिसत लॉरींच्या मनांतील आशा स्फुलिंग जरा फुलला आणि त्यानीं मिस प्रॅासला आंत बोलावलें. आणि मग जशी कांहीं जुन्यासारखी ल्यूसीविषयीं कांहींतरी त्यांच्याशी तीं बोलत बसलीं. सर्व जसं कांहीं नेहमींसारख सहज चालल आहे असच, मधून मधून त्यांना त्रास होणार नाहीं इतक्या बेतानें तीं बोलत होतीं. आणि त्यांच्या प्रयत्नाला थोड यशहि येत आहे अस त्यांना वाटू लागलं. डॉक्टर आता बरेच वेळां वर त्यांच्याकडे

पाहू लागले आणि कांहीं तरी चुकन असल्याची जाणीवहि त्यांच्या मनांत जागी होत असल्यासारखं लॉरींना दिसू लागलं, आणि त्यांचं प्रेमळ हृदय आनदानें भरून आलं.

सायंकाळ झाली आणि डॉक्टरनीं काम खालीं ठेवतांच लॉरींनी त्यांना कालप्रमाणेंच पुन्हां विचारलें—

" काय डॉक्टर, जायचं का बाहेर ? "

" बाहेर ? " त्यानी काल सारखच उत्तर दिलें.

" होय, जरा माझ्याबरोबर फिरायला. काय हरकत आहे ? "

आजहि कांहीं उत्तर आलें नाहीं पण लॉरी मात्र जसे कांहीं आपण खरेच फिरावयास जात आहोंत असें दाखवीत खोलीबाहेर पडले आणि एक तासभर बाहेर काढल्यानतर ते परत आत आले. खिडकी जवळील खुर्चीत बसून खालीं आंगणांतील त्या रुदपर्ण वृक्षाकडे पहात डॉक्टर बसले होते पण मि. लॉरींनी आंत प्रवेश करतांच ते झटकन चोरट्यासारखे तिथून उठून आपल्या बांकावर जाऊन बसले.

तिसरा दिवस उजाडला नि मावळला, चवथा, पांचवा — सहा, सात आठ, नऊ दिवस आले नि गेले, आणि लॉरींच्या मनांतील आशा परत मावळू लागली, त्यांचें हृदय अधिकाधिक निराश होऊ लागलें. पण तिकडे डॉक्टरांचें मन मात्र आपल्या कामांत अधिकाधिक मग्न होऊ लागलें आणि त्यांच्या हातांचें चापल्य नि कौशल्य तितकेंच जोरानें वाढू लागलें.

— — —

.... ११ ....

दहावे दिवशीं सकाळीं सूर्याचा झगझगीत प्रकाश खोलींत पसरून त्यांच्या आंगावरहि तो पसरला तरी, प्रजागर श्रमानें श्रांत होऊन बसल्याजागींच गाढ झोंपी गेलेले मि लॉरी कांहीं जागे झाले नाहींत. पण खिडकीजवळील झाडाच्या फांदीवरील पाखरांच्या किलबिलाटानें मात्र ते एकदम दचकून डोळे चोळीत उठले, आणि तसेच आपले डोळे चोळीत झोंपेला पार पिटाळून लावण्यासाठीं त्यांनी आंगाला आळोखे पिळोखे पण दिले तरीहि इकडेतिकडे दृष्टि जातांच आपण खरेच जागे झालों कीं नाहीं याची त्यांना भ्रांत पडली कारण सतत नऊ दिवस चाललेला डॉक्टराच्या खोलींतील तो आवाज त्याना ऐकूं येत नव्हता, आणि म्हणून स्वत ची पुरी खात्री करून, घेण्यासाठी त्यांनीं डॉक्टरांच्या खोलींत हळूच डोकावले खिडकीजवळ घेतलेला तो बांक नि त्यावरील हत्यारें तेथे आतां दिसत नव्हतीं त्याच्या जागीं सकाळचा आपला पोशाक परिधान करून डॉक्टरांची स्वारी नेहमींमारखी शांतपणें वाचीत बसली होती. त्यांचा चेहेरा किंचित फिकट दिसत होता पण शांतपणें नि अतिशय लक्षपूर्वक त्यांचें वाचन मात्र चाललेलें दिसत होतें

तें परिचित दृश्य पाहून मि. लॉरींना कांहीं वेळ तरी आपल्या डोळयावर विश्वास बसेना. आपण आत्तां पहात आहोंन हें स्वप्न कीं गेले नऊ दिवस आपण पहात असलेलें तें दृश्यच स्वप्न होत ? त्यांनीं आपले डोळे फिरून एकदा जोरानें चोळले, आंगाला चिमटाहि घेतला पण छे ' डॉक्टर तर समोर नेहमींच्या पोशाकांत नेहमींसारखे वाचन करीत बसलेले त्याना खरोखरीच दिसत होते, आणि ती हत्यारहि जवळपास दिसत नव्हतीं. पण मग आपण तरी डॉक्टराच्या या कन्सल्टिंग रूममध्यें सर्व कपडे आंगावर तसेच ठेऊन या वेळपर्यंत झोंपी कसे गेलो होतों ? अह ' असच अमल पाहिजे हें. डॉक्टरांची ती लहर नाहीशी होऊन ते पूर्वस्थितीवर आत्तां खास आले आहेत. गेल्या नऊ दिवसांच्या त्या दु खद भ्रमांतुन ते आतां पूर्ण जागे झाले आहेत, आणि म्हणूनच ते नेहमींच्या आपल्या उद्योगांत असे शांतपणें गढून गेलेले आपण पहात आहोंत. चला; परमेश्वरानेंच खैर केली '

आणि मग थोड्याच वेळांत मिस प्रॅासची कुजबुजहि त्यांच्या कानात सुरू झाल्यावर तर त्यांच्या मनांतील उरली सुरली शंकाहि पार नाहींशी झाली. त्या दोघांनीहि मग न्याहारीची वेळ होईपर्यंत तसाच वेळ जाऊ देऊन, नंतरच जसं कांहीं गेल्या नऊ दिवसांत कांहींच घडलं नाहीं अशा तऱ्हेनें डॉक्टरांची भेट घेण्याचें ठरविलें आणि जर ते नेहमींसारख्या मन स्थितींतच आढळले तर त्यांचंच मत या प्रश्नावर घ्यायचं असं मि लॉरीनीं ठरविलें न्याहारीलाहि अजून जरा अवकाश असल्यानें आपल्या पुढल्या विचाराचे धागेदोरे नीट रीतीनें तयार करून नि स्वत ची प्रात कालीन केशवेषभूषा काळजीपूर्वक उरकून त्यांनीं डॉक्टरांना नेहमीं सारखी चहाला हांक मारली

त्यांनीं अतिशय काळजीपूर्वक नि कुशलतेनें सुरू केलेल्या प्राथमिक संभाषणावरून आपल्या कन्येचा विवाह कालच झाला असं डॉक्टरांना वाटत असल्याचं मि लॉरींना आढळून आलं आणि बुद्धिपुरस्सरच मग बोलता बोलता त्या दिवसाचा आणि त्या तारखेचा त्यांनीं उल्लेख केला डॉक्टर थोडे अस्वस्थ होऊन विचारात गढल्यासारखे दिसले. पण इतर बाबतींत मात्र ते नेहमींसारखे शांत असल्याप्रमाणेंच बोलत होते. लॉरीनीहि मग त्यांना हवी असलेली मदत डॉक्टरांजवळून घ्यायचें ठरविलें. त्यांच्या स्वत च्या त्या गत मन स्थितीवर त्यांचंच मत त्यांना अजमावयाचं होतं

" डॉक्टर, एका मोठ्या विलक्षण अशा प्रश्नावर मला तुमचं मत पाहिजे आहे " मिस प्रॉसनीं त्यांचा फराळ आटोपल्यानंतर त्यांच्यापुढील बशा उचलून त्या तेथून गेल्यानंतर लॉरी म्हणाले " मला सताऊन सोडलं आहे त्या प्रश्नानं मोठा चमत्कारिक आहे बघा तो प्रश्न पण चमत्कारीक मला, तुमच्यासारख्या तज्ज्ञ माणसाला कांहीं नव्हे !"

गेल्या नऊ दिवसांच्या श्रमानं विवर्ण दिसत असलेल्या आपल्या हातांकडे पाहून डाक्टर अस्वस्थ झाले होते पण त्यांचें बोलण्याकडे मात्र चांगलें लक्ष होतें तरी हातांकडे वारंवार पहाण्याचा त्यांचा चाळा मात्र चालूच होता

" अतीशय जिव्हाळ्याचा प्रश्न आहे माझ्या तो, " त्यांच्या हाताला मोठ्या प्रेमळपणें स्पर्श करीत लॉरी म्हणाले. " माझ्या एका जिवलग स्नेह्याचीच केस आहे ती, बरं का डॉक्टर अगदीं नीट चांगला विचार करून मला सल्ला द्या, त्या बिचाऱ्यासाठी — आणि त्याच्या त्या गरीब पोरीसाठीं पण. "

" म्हणजे मला वाटत," डॉक्टर जरा खालच्या आवाजांत म्हणाले, " कांहीं मानसिक धक्का — "

" ह, तसच ! "

" नीट स्पष्ट सागा तर सार. अगदीं एकहि बारीक सारीक गोष्ट सुद्धां नका वगळू "

त्यांच्या चेहेऱ्याकडे पहातांच लॉरीना ममजल कीं त्याच हद्दत डॉक्टरनीं पूर्णपणें ओळखलं होत, आणि त्यानीं मग उल्हासानें सुरुवात केली.

" फार दिवसांपूर्वी मनाच्या सर्व कोमल व्यापारांना अतिशय तीव्रपणें नि दाहकपणें बसलेल्या दीर्घ फटकाऱ्यामुळें, मनाचा पार चोळामोळा होऊन गेलेल्या एका व्यक्तीबद्दल बोलणार आह मी त्या विलक्षण दडपणाखालीं किती दिवस तो बिचारा तसा सारखा चुरडला जात होता, तें मलाच तर काय पण प्रत्यक्ष त्या व्यक्तीलाहि कांही ठाऊक नाहीं तें समजण्याच आमच्याजवळ आज काहीं साधनच नाहीं मुळीं आणि त्या विपत्तीतून — त्या दीर्घ फटकाऱ्यानें झालेल्या विकल स्थितींतून — त्याची मन.स्थिती ताळ्यावर तरी कशी आली हें पण त्याना कांहींच सांगता येत नाहीं आहे तोच म्हणाला होता तस एकदा माझ्या-जवळ. आणि आता त्याची मन स्थिती इतकी उत्कृष्ट सुधारली आहे कीं आपल्या तीव्र बुद्धिमत्तेच्या जोरावर त्याचा कांहींना कांही विद्याव्यासग अगदी हव्या-सानें चाललेला असतो आतां तुम्हांला माहितच आहे कीं, असल्या व्यासगाला मन किती एकाग्र कराव लागत तें. तें कांहीं मी नको सांगायला पण दुर्दैवान," जरा वेळ थाबुन त्यानीं एक दीर्घ श्वास सोडला — " ती पूर्वीची त्याची विकल मन स्थिति फिरून आत डोकावली "

" किती दिवस टिकली ती ? " डॉक्टरनीं अगदी खालच्या आवाजांत विचारलें

" नऊ दिवस नि नऊ रात्री. "

" कशी व्यक्त झाली ती मन स्थिती ? मला वाटत, — " आपल्या हातां-कडे परत दृष्टि टाकून ते म्हणाले, " त्या अवस्थत ते करीत असलेल्या कांही कामाला सुरुवात केली असेल त्यानां ? "

" बरोबर आहे, डॉक्टर "

" ह ! तुम्ही कधीं त्यांना," डॉक्टरनीं विचारलें; त्यांचा आवाज हळू पण

स्पष्ट नि शांत येत होता. "तुम्ही कधीं त्यांना तस काम करतांना याच्या आधीं पाहिल होत ?"

"फक्त एकदा"

"आणि जेव्हां ही त्यांची अशी मन स्थिती पुन्हा झाली, त्या वेळीं मागच्या-सारखेच चालले होते का त्यांचे सर्व व्यापार ? — अगदीं हुबेहूब तसेच ?"

"होय, अगदीं तसेच मला वाटत"

"तुम्हीं मघाशीं त्यांच्या कन्येचा उल्लेख केला होता, नव्हे, तिला माहीत आहे का ही उलट खाल्लेली ?"

"अहं ! तिला कहींच कळवल नाहीं यातल. आणि कधीं तिला तें कळवू पण नये मला वाटत. एक फक्त मी नि दुसऱ्या तिनक्याच एका विश्वासाई-व्यक्तीला फक्त याची माहिती आहे"

डॉक्टरनी त्याचा हात घट्ट पकडला आणि ते हलकेच पुटपुटले, "फार चांगली गोष्ट केलीत ती अतिशय दक्षता घेतलीत तुम्ही !"

लॉरींनींहि त्यांचा हात दाबला नि दोघेही थोडावेळ कांहीं बोलले नाहींत.

"आता अस डॉक्टर," लॉरींनीं अतिशय प्रेमानें पण मोठ्या सावधगिरीनें परत सुरुवात केली, "मी आहे आपला एक रुक्ष, व्यवहारी धंदेवाईक. आणि असल्या कठीण नि गुतागुतीच्या गोष्टी काहीं आम्हाला कधीं जुळायच्या नाहींत. याला उपयोगी अशी कांहीच माहिती माझ्याजवळ नाहीं किंवा याला लागणारी बुद्धिमत्ताहि नाहीं म्हणून मला तुमच मार्गदर्शन हव आहे या साऱ्या जगांत तुमच्याइतका या बाबतींत माझा कोणावर विश्वास नाही एक तुम्हींच काय ते योग्य मार्ग दाखवाल. तर आता अस सांगा की, ती मन स्थिति अशी ही उलट खाते का ? अशी ती परत उलट खाण शक्य आहे का ? नेहमींच रहाणार का तो असा धोका ? टाळतां नाहीं का यायची आपल्याला ती मन-स्थिति, नि आलीच तशी वेळ तर करायच तरी काय त्या वेळीं ? सांगा डॉक्टर, का होत हें अस ? जर असेल काहीं उपाय तर काय लागेल तें करून तो केल्या शिवाय मी रहाणार नाहीं. इतक तळमळत आहे माझं मन त्याच्यासाठीं पण काय कराव, तेंच समजत नाहीं आहे मला मुळीं तुम्हीं जर आपल्या ज्ञानाचा बुद्धीचा नि अनुभवाचा फायदा मला दिलात या बाबतींत, तर पुष्कळच करतां येईल मला. पण तुमच्या मदतीशिवाय मात्र मला कांहीच तस करता येत नाहीं. पहा, कांहीं विचार करून पहा नि बघा मला कांहीं सांगतां आल तर."

त्यांच्या या तळमळीच्या उद्गारानंतर डॉक्टर विचारांत पूर्ण गढून कांहीं वेळ स्वस्थ बसले. आणि लॉरीनींहि त्यांना तसेंच बसूं दिलें

"मला वाटतं," प्रयत्नपूर्वक त्या शांततेचा भंग करून डॉक्टर म्हणाले, "त्या माणसाला त्या पलटीची अचूक कल्पना आली असावी."

"नि तो भयभीत होऊन गेला?" लॉरींनी धीर करून विचारलें.

"होय अतिशय!" अभावितपणें अंगावर शहारे देत डॉक्टर म्हणाले "त्याच्या मनावर पडणाऱ्या त्या भीतीच्या दडपणाची तुम्हाला कल्पनाहि नाहीं यायची, आणि मनाला पार चुरडून टाकणाऱ्या त्या भीतीबद्दल एक अवाक्षर तोंडातून काढणं सुद्धां त्याला किती बिकट — अहं; जवळ जवळ किती अशक्य असं वाटत असेल, हें तुम्हांला नाहीं समजणार!"

"पण अगदीं मन घट्ट करून आपली भीति जर त्यानें कोणाजवळ त्यावेळ बोलून दाखवली, तर — तर होईल का त्याचं मन हलकं?"

"होईलसं वाटतं पण आतां मी म्हटलं तसं, तें होणं जवळ जवळ अशक्य आहे. माझं तर उलट असं मत आहे कीं, कांहीं व्यक्तींच्या बाबतींत तर तें केवळ अशक्यच आहे"

"पण मग," थोड्या वेळाच्या शांततेनंतर त्यांच्या हातावर परत आपला हात प्रेमानें ठेवीत लॉरी म्हणाले, "अशी ही उलट खाते तरी कशानें?"

"मला वाटतं," डॉक्टर सांगूं लागले, "या विकाराची उत्पत्ति प्रथम ज्या आठवणींनीं नि विचार मालिकेनें झाली, त्याच विचारांची नि आठवणींची जोरदार स्मृती याला कारणीभूत होत असावी. जुन्या, गतकालीन, मन अगदीं विकल करणाऱ्या कांहीं स्मृतींची तीव्र आठवण, कशामुळें तरी मला वाटतं त्याला झाली असावी आणि कधींकाळीं कशामुळें तरी — एकाद्या विवक्षित प्रसंगामुळें म्हणा त्या स्मृतींची आठवण ताजी होईल, अशी भीतीहि मला वाटतं त्याच्या मनांत कितीतरी दिवस दडून बसलेली असणंहि शक्य आहे त्याला तोंड देण्याची त्यानें आपल्याकडून निष्फळ तयारीहि कदाचित केली असेल; आणि कदाचित त्या प्रयत्नानें सुद्धां त्या मनःस्थितीशीं झगडण्याचं त्याचं सामर्थ्य कमी झालं असेल"

"त्या पलट खाल्लेल्या अवस्थेंत घडलेल्या गोष्टी त्याला आठवणं शक्य आहे का?" भीत भीतच लॉरींनीं विचारलें

डॉक्टरनीं सुज्ञपणें खोलीभर दृष्टी फिरवून मान हलविली आणि ते मद-स्वरात म्हणाले, " अहं, मुळींच नाहीं !"

" आणि आतां यापुढें ?"

" पुढची मला बरीच आशा वाटते आहे, ' दृढ स्वरांत डॉक्टर म्हणाले. " परमेश्वरानें ज्याअर्थी त्याचा हा उलटलेला आजार लौकरच सपवला आहे, त्याअर्थी मला पुढच्याबद्दल बरीच आशा वाटते आहे त्याच्या मनांत किती तरी दिवस दबा धरून बसलेल्या नि त्याला भेडसावीत असलेल्या त्या स्मृतींच्या दडपणाखालीं तो धडपडत असतां, तें मनोव्यथेचें वादळ अखेरीस त्याच्या मस्तकावर तर फुटल पण तसच कांहीं काळानं तें दूर निघूनहि गेल, ही एकच गोष्ट मला त्या बाबतींत मोठी आशादायक वाटते आहे. आतां सपल तें बहुतेक "

' बर, बर ' अतिशय आनंदाची गोष्ट आहे ही. परमेश्वराची कृपा ' '

' होय, त्याचीच कृपा ' ' आपली मान खालीं वाकवून विनम्र भावानें डॉक्टर उद्गारले

' आतां दोनच गोष्टी राहिल्या. त्यांच्यावरहि आपला सल्ला हवा आहे मला. मांगू का पुढें ? '

" मोठे उपकार होतील तुमच्या मित्रावर तुमचे ' त्यांचा हात घट्ट पकडून डॉक्टर म्हणाले

" वर तर अतिशय उद्योगी नि अभ्यासू वृत्ती आहे माझ्या त्या स्नेह्याची. नेहमी काहींना कांहीं — पुस्तकांच वाचन, कांहीं प्रयोग, सशोधन असं मोठ्या उत्साहान चाललेल असत त्याच आता असं सांगा मला, याचा अतिरेक होणं शक्य आहे का ? याचा त्याच्या प्रकृतीवर नाहीं का होणार कांहीं परिणाम ?"

" मला नाहीं वाटत होईलसं कांहींतरी उद्योगांत असण्याची त्याची प्रवृत्तीच असेल मुळची, किंवा काहीं उद्योगाचाहि परिणाम असेल तो पण कांहींतरी चांगल्या उद्योगांत नि विचारांत जर तो मग्न न राहील तर मात्र कांहीं भलताच परिणाम होणंहि शक्य आहे आणि त्याला कल्पना आली असेल त्याची नि म्हणूनच तसा उद्योगांत मग्न असावा तो "

" पण त्याला फाजील ताण पडत नाहीं अशी खात्री आहे तुमची ?"

" होय, माझी पूर्ण खात्री आहे तशी "

" प्रिय डॉक्टर ! त्याच्यावर जर आत्तां फाजील ताण पडला — "

" प्रिय दोस्त, मला नाहीं तशी धास्ती. तराजूच्या एकाच बाजूला जबरदस्त दडपण पडलं होत अजून, त्याला आतां आभंड घालून जाग्यावर हें आणलच पाहिजे क्रियेइतकीच प्रतिक्रियाहि तितकीच जोरदार असावी लागते, मिस्टर लॉरी ! "

" माफ करा हं डॉक्टर, माझी आहे आपली धंदेवाल्याची चिकाटी. म्हणून पुन्हा विचारतो, गृहीत धरा क्षणभर की, त्याच्यावर फाजील ताण पडला मी म्हणतो तसा, तर ही मन स्थिति परत डोकावेल का ? कांहीं थोड्या तरी स्वरूपांत ती परत भेट देईल का ? "

" मला नाहीं वाटत तस; " आत्मविश्वासाच्या दृढस्वरांत डॉक्टर म्हणाले. " त्या आजाराला प्रथम कारणीभूत झालेल्या कारण — किंवा विचार परंपरे सदृश अशी कारण परंपरा जर परत कधीं उत्पन्न झाली, तरच तो आजार उलटणं शक्य आहे म्हणजे विचार विकारांची तीच तार जर कांहीं अघटित रीतीनें बेसूर छेडली गेली तरच आतां तो आजार उलटेल, नाहींतर मुळींच नाहीं. आणि आतां त्यांचा तो उलटलेला आजार पूर्ण बराहि झाला आहे, म्हणून भावनांची ती तार तशी परत भेसूर कर्कशपणें वाजण, मला शक्य वाटत नाहीं मला तर आज असा आत्मविश्वास वाटतो आहे मि. लॉरी, माझा हृदयस्थ परमेश्वर जसा कांहीं आंतून हुंकारतो आहे कीं, तीं कारण मुळीं आतां मूळांतच शिल्लक उरलेलीं नाहींत, त्याच पार निर्मूलनच झाल आहे ! "

हें सारं बोलत असतां त्यांच्या मनात विचारांचा जसा श्वेतकृष्ण असा गंगा यमुनाचा जोड प्रवाहच वहात होता — एक, मानवी मनाचा नाजूक तोल किती बारीक सारीक गोष्टीनींहि बिघडतो, याच्या जाणीवेनें आलेला साशंकतेचा, आणि दुसरा, स्वत च्या प्रयत्नानें संकटांवर विजय मिळविल्यानें उत्पन्न झालेल्या दुर्दम्य अशा आत्मविश्वासाचा त्या आत्मविश्वासाला अधिक जोमानें प्रज्वलित करण्यांतच लॉरींना आनद होणार होता म्हणून त्यानीं त्याबद्दल आपला आनंद व्यक्त करून आपल्या दुसऱ्या मुद्याला हात घातला. आणि हा मुद्दा हाताळणच अतिशय अवघड होत. तरीहि पण गेल्या नऊ दिवसांची आठवण त्यांच्या मनांत जागी असल्यानें त्यांना त्याला तोंड देणं भागच होत.

" आतां एकच राहिल फक्त. परमेश्वर कृपेनें ज्या आजारांतून माझा तो

दोस्त बरा झाला आहे, त्या मानासिक आजारांत तो कांहींतरी काम करीत असे, असं म्हटल होत नाहीं मी तुम्हांला ? ह. आपण त्या कामाला — लोहाराचं काम म्हणू या झाल. हो, लोहाराच ! त्या मनोविकृतींत तो लोहाराच काम करी, अस म्हणू या आपण, बर का. आणि असहि म्हणू या आपण कीं, आतां परत जेव्हां त्याची ती मनोविकृती उलटली, तेव्हां त्यानें आपल एकदम तेंच काम केल सुरू. पण मला अस सांगा डॉक्टर, त्यानें तीं हत्यार अशीं जवळ बाळगण चांगल का ! दुःखास्पदच नाहीं का तें तुम्हाला वाटत ?"

डॉक्टर एक हात कपाळावर ठेऊन आपला पाय जमीनीवर अस्वस्थपणें हळूहळू आपटीत होते

"आपल्याजवळच बाळगली आहेत त्यानें तीं हत्यारें. पण तीं त्यानें टाकून देणच इष्ट नाहीं का ?" त्यांच्याकडे चिंतातूरपणें पहात लॉरी म्हणाले.

तरीहि डॉक्टर तसेच डोक्यावर हात ठेऊन अस्वस्थपणें जमिनीवर पाय ठोकीत स्तब्ध बसले होते.

"उत्तर देण कठीण वाटत आहे तुम्हांला, डॉक्टर ?" लॉरी म्हणाले. "प्रश्न आतिशय नाजूक आहे हें मला माहीत आहे. पण तरीहि मला वाटत —" त्यांनीं आपली मान हलविली आणि ते थांबले.

"हें पहा," अस्वस्थपणाच्या कांहीं क्षणानंतर त्याच्याकडे वळून डॉक्टर म्हणाले, "त्या बिचाऱ्याच्या मनांतल्या त्या अगदीं खोल खोल विचारांच समर्पक स्पष्टीकरण करण जरा कठीण आहे. पण त्याचा मनस्ताप आतिशय तीव्र झाल्यामुळेंच त्यानें त्या कामाला प्रथम सुरुवात केली, नाहीं का ? आणि अतिशय आनंदानें त्यानें त्या उद्योगाला सुरुवात केली, नव्हे ? हाताच्या बोटांची हालचाल सुरू झाल्याबरोबर त्याच्या डोक्यांतील विचारांची हालचाल कमी होऊ लागली. आणि त्या कामातल त्याचं कौशल्य जसजस वाढू लागल, तसतसा त्याच्या विचारावर पडत असलेला फाजील ताण कमी पडू लागला. आणि त्या दारुण नरकांतहि जगण त्याला मग शक्य होऊ लागल. नाहींतर विचाराच्या अतिरेकानें मस्तक फुटून तो विचारा केव्हांच वेडापिसा बनला असता ! मग त्या हत्यारांबद्दल त्याला प्रेम कां वाटू नये नि तीं नुसती दूर ठेवण्याचा विचारहि त्याला असहनीय असा कां न वाटावा ? आणि आत्तां सुद्धां, भविष्यकाळाची त्याला कधी नव्हती इतकी जोराची आशा वाटत असतां नि त्या विषयीं

तो इतका आत्मविश्वासानें बोलत असतां सुद्धां, आपल्याला कदाचित जर दुर्दैवानें त्या हत्यारांची परत गरज लागली नि तेव्हां तीं मिळालीं नाहींत तर, ही कल्पना सुद्धां त्याला भयकर अशीच वाटते आहे आणि म्हणूनच त्यांना तो असा घट्ट चिकटून बसला आहे. काळोखात वाट चुकून भेदरलेल्या एकाद्या अजाण बालकासारखीच त्याची स्थिती आहे या बाबतींत !"

आपलें बोलणें थांबवून त्यानीं आपले डोळे लॉरींच्या चेहेऱ्यावर स्थिरावले तेव्हां तेहि तसेच त्या बालकासारखेच भेदरलेले दिसत होते.

"पण असं नाहीं का — माझी आपली कल्पना हं ! कारण माझ्यासारख्या रुपये आणे पैत गढलेल्या रुक्ष व्यवहारी माणसाला काय यांत कळत म्हणा ! — पण आपली एक शका म्हणून विचारतो हं कीं, तीं हत्यार जवळ बाळगण म्हणजे त्या कल्पना पण जवळ बाळगणं, असच नाहीं का ? आणि तीं हत्यार जर त्याच्या जवळून नाहींशी झालीं तर तशीच ती अज्ञात भीती पण त्याच्या मनांतून नाहीं का नाहींशी व्हायची ? म्हणजे एका दृष्टीनें आपणच नाहीं का त्या आपत्तीला अशामुळें खतपाणी घालीत ?"

जरा वेळ कांहींच उत्तर आलें नाहीं.

"पण त्याला किती संवय झाली आहे त्यांची !" कांपऱ्या आवाजात डॉक्टर म्हणाले.

"मी तरी निदान तीं जवळ बाळगणार नाहीं;" आपली मान हलवीत लॉरी म्हणाले. डॉक्टराच्या त्या अस्वस्थते बरोबर त्यांचा निश्चय वाढत होता. "मी तर बुवा त्यांचा त्याग करण्याचाच सल्ला देईन. आपल्या सारख्या तज्ज्ञाचा मला फक्त पाठिंबा हवा आहे. त्याच कांहीं अकल्याण नाहीं त्यांत, खास. बोला तर ! मनाचा एक निश्चय करून सांगा तसं मला त्या बिचाऱ्याच्या मुलीसाठींच करतों आहें मी हें सारं डॉक्टर !"

डॉक्टरांच्या मनात विचारांची कांही विलक्षण धडपड चालली होती पण त्यांच्या चेहेऱ्यावर थोड्याच वेळांत निश्चयाची छटा उमटली.

"ठीक तर, त्या पोरीसाठीं केलंच पाहिजे हें ! माझी पूर्ण परवानगी आहे त्याला. मात्र एकच, त्यांच्या गैरहजेरींत तेवढी तीं नाहींशीं करा, आणि कांहीं काळानंतरच त्यांची गैरहजेरी त्याला कळूं द्या, म्हणजे झाल."

लॉरीनी मोठ्या आनंदानें त्याला समति दिली आणि त्यांनी बैठक खलास

झाली. तो सबंध दिवस मग त्यांनीं डॉक्टरनां घेऊन लंडन बाहेर स्वच्छंदी पांखरासारखा खेळत बागडत काढला. डॉक्टरहि पूर्ण खुशींत होते. आणि त्यानंतर चार दिवसांनीं पूर्वी ठरल्याप्रमाणें आपल्या कन्येच्या नि जामाताच्या संगतींत कांहीं दिवस भटकतांत घालविण्यासाठीं ते लंडन सोडून निघून गेले.

त्यांचें पाऊल घराबाहेर पडलें मात्र आणि मि. लॉरींची स्वारी मिस् प्रॉस समवेत हातांत हातोडा, करवत, तासणी घेऊन डॉक्टरांच्या खोलींत प्रविष्ट झाली. आणि थोड्याच वेळात त्या चर्मकारी हत्यारांचे नि त्या बांकाचे त्यांनीं मोडून तोडून पार तुकडे करून टाकुन त्यांना अग्नये स्वाहा केलें, आणि आपल्या सहचरीकडे पहात समाधानाचा एक भला मोठा सुस्कारा सोडला. मिस प्रॉसच्या डोळ्यांतहि त्याच समाधानाची छटा पूर्णपणें उमटली होती.

---

.... १२ ....

तें नवविवाहित दांपत्य आपला सुखप्रवास संपवून सोहो स्ट्रीट वरील आपल्या निवासस्थानीं येऊन दाखल झाल्यानंतर, एकदोन तासांनीच सिडने कार्टनची स्वारी त्याचें अभिनंदन करण्यासाठीं येऊन दाखल झाली. त्याच्या एकंदर जाम्यानिम्यात किंवा आचारांत तसा कांहींच बदल झालेला दिसत नव्हता. पण सूक्ष्म दृष्टीनें पहाणारास मात्र त्याच्या चेहेऱ्यावर अथांग भक्तिभावाची उमटलेली दाठर छटा दिसल्या वांचून राहिली नसती. चार्लस डार्नेच्या दृष्टीस आज तरी ती नवीन दिसत होती नि त्याला त्याचें जरा आश्चर्य वाटत होतें.

" मिस्टर डार्ने, आपल्या दोघांत स्नेहभाव रहावा असं मला आज वाटत आहे ' खोलींत ते दोघेच असल्याची संधी सापडतांच डार्नेचा हात धरून कांहींहि प्रस्ताव न करता कार्टन म्हणाला.

" अहो, पण आपण स्नेही नव्हतों कधीं ? "

" ही आपली एक बोलण्याची नुसती पद्धत आहे झालं, आज आत्तां मला तें नुसतं शिष्टाचारी बोलणं नको आहे. खराखुरा दृढ स्नेह आपल्यांत रहावा असा अर्थ आहे माझ्या बोलण्याचा. अहं, त्याहूनहि कांहींतरी जास्ती ! "

" म्हणजे काय बुवा ? .मी नाहीं समजलों, " त्याच्या पाठीवर थाप देत हंसत हसत डार्ने म्हणाला.

" म्हणजे काय तें सांगणं जरा कठीणच आहे. पण पाहतों हं प्रयत्न करून," कार्टन हंसून म्हणाला. " तुम्हांला तो दिवस आठवतो आहे का — म्हणजे आमचं मद्यप्राशन जरा जादा झाल होत ज्या दिवशीं, तो ? "

" हो हां ! तस एक दिवस माझ्या तोंडून वदवल होतत खर तुम्ही, आठवल आता."

" बरोबर मला चांगला आठवतो आहे तो दिवस त्याची छाया अजूनहि माझ्या मनांत भुतासारखी वावरते आहे. नि माझ्याबरोबरच तिची अखेरी होईलस दिसत आहे. अह, असे दचकू नका ! मी कांहीं एकाद लांबलचक प्रवचन झोडणार नाहीं आहे."

" त्याची नको तुम्हांला काळजी उलट तुमच्या आवाजात आज दिसत असलेली ही उत्कट कळकळ पाहून मला आनदच वाटतो आहे."

" ठीक ठीक ! तर त्या दिवशीं मी थोडा तिरमटासारखाच तुमच्याशीं बोलत होतों, जसे कांहीं तुम्ही माझे कोणी शत्रूच होतां. पण विसरून जा तुम्ही सार ते आतां." कार्टन म्हणाला.

" अहो, ते तर कधींच विसरलों आहें मी, मि. कार्टन "

" हें पहा — हे आल पुन्हा शिष्टाचारी बोलण ! पण मि डार्ने, माझ्या बाबतींत मात्र विस्मृती अशी इतकी, तुम्ही म्हणतां इतकी सुलभ नाहीं आहे. मी कांहीं त विसरलो नाहीं आहे आणि अशा बाह्यातकारी औपचारीक बोलण्याचा ते विसरण्यासाठीं कांहीं उपयोगहि व्हायचा नाहीं."

" माझ ते बोलण केवळ तोंडदेखल, शिष्टाचाराच अस जर तुम्हांला वाटल असेल तर मला माफ करा त्याबद्दल," डार्नेनें उत्तर केलें " तुम्हांला त्याचं एवढ वाटू नये म्हणूनच मी तस बोललो. तुम्ही उगीच आपल्या मनाला तें इतक लाऊन घेतल आहे पण माझ्यावर विश्वास ठेवा मि. कार्टन, मी खरोखरीच तें कधींच विसरलो आहे आणि त्यांत एवढ होत तरी काय न विसरण्यासारखं ? माझ्यावर तुम्ही त्या दिवशीं जे उपकार केलेत त्याची आठवण मी नेहमीं हृदयात बाळगायची, कीं या क्षुल्लक गोष्टीची ? मला तरी तुमच मोठ आश्चर्य वाटतं मिस्टर कार्टन ! "

" हें पहा, तुम्ही असा बाऊ करायला लागलांत त्या उपकाराचा," कार्टन म्हणाला, " म्हणजे मी सांगेन कीं, तो उपकार बिपकार कुछ नाहीं, तो आपला आमच्या धद्यांतला एक टाळीघेऊ भपका आहे. नुसती एक हात-चलाखीची नजरबंदी. अधिक कसलाच विचार त्यावेळीं माझ्या मनांत नव्हता. — त्यावेळीं म्हणतों आहें ह मी, भूतकालाविषयीं बोलण आहे हें माझ "

" तुम्ही नका त्याला इतक महत्त्व देऊ, पण मी कांहीं तो उपकार विसरणार नाही ' "

" सत्य, अगदी निर्मळ सत्यच बोलतों आहें मी तें मि डार्ने ' पण जाऊ दे तें, त्याच्याशीं मला आज कांहीं कर्तव्य नाही मी बोलत होतों आपल्या स्नेहाविषयीं. आतां, तुम्ही मला चांगला ओळखतां, आणि मनुष्यांत जें जें कांहीं उज्वल नि उदात्त आहे त्या सर्वांचा माझ्याजवळ पूर्ण अभावच आहे, हंहि तुम्हांला दिसतच आहे. मी म्हणजे दुर्व्यसनांत आकंठ बुडालेला एक कीटक आहें एकहि सत्कृत्य आजपर्यंत माझ्या हातून कधीं घडल नाहीं नि घडणार पण नाहीं."

" कधीं घडणार नाहीं, अस मी नाहीं म्हणू शकत."

" पण मी म्हणतों ना; आणि माझा शब्दच याबाबत अधिक प्रमाणभूत मानला पाहिजे, नाहीं का ? बर तर ' मग असा माझ्यासारखा व्यसनी, दुर्वृत्त टाकाऊ माणूस जर तुम्हांला खपण शक्य असेल तर, एकच इच्छा आहे माझी, असाच मला या आनदी घरांत कधीं कधीं येऊन इथला आनद लुटण्याची पूर्ण मोकळीक असावी. इथल्या या साऱ्या सुखी पवित्र वातावरणांत माझी अडगळ तर खरीच, तरीहि पण त्या जुन्या आठवणीसाठीं तुम्ही ती सोसावी, एवढीच माझी इच्छा आहे. स्वस्थपणें इथें येऊन कोणाशी काही न बोलता चार घटका मी आपला मधून मधून काढीत जाईन. या प्रसन्न मधुर चांदण्याचे चार किरण आपल्या आंगावर पडले, एवढ्यांतच मी स्वत ला मोठा धन्य समजेन ! या परवानगीचा फाजील फायदा मी घेणार नाहीं. फार तर वर्षांतून तीन चार वेळां काय मी येईन, तेवढाच. पण तितका भाग्यवान मी आहें, यांतच माझं खरखुर समाधान मात्र आहे ह !"

" या घराची दार केव्हांहि खुलीं आहेत तुमच्यासाठीं मि. कार्टन ! "

" अतिशय आभारी आहें मी डार्ने. अशी मारू ना पण मी एकेरी हांक?"

" अगदीं खुशाल, कार्टन, आता पोंचतोच तुला तेवढा आधिकार "

कार्टननें मग अतिशय प्रेमानें त्याच्याशीं हस्तांदोलन करून त्याचा निरोप घेतला. पण त्याच दिवशीं सध्याकाळीं तीं सर्वजण गप्पा मारीत बसलीं असतां, सिडने कार्टन जवळील आपल्या सभाषणाचा उल्लेख डार्ननें केला, आणि कार्टन म्हणजे निष्काळजीपणा नि बेपर्वाई यांचा मूर्तिमत अवतारच आपल्याला वाटतो, असेंहि तो जाता जाता बोलून गेला तसा म्हणजे त्याच्याविषयीं कांहीं तिरस्कार त्यानें बोलतांना दाखविला असं कांहीं नव्हे तरीहि पण केवळ वस्तुस्थितीचच वर्णन एखाद्या तिऱ्हाइतानें करावें, अशा रीतीनें मात्र तो बोलला होता, हे कांहीं खोट नव्हे. पण आपल्या त्या बोलण्याचा कांहीं विशेष परिणाम आपल्या त्या कोमल हृदयी पत्नीवर झाला असेल याची मात्र त्याला कल्पना देखील नव्हती.

पण मग रात्रीं शयनमंदिरात त्यांचो दोघाची एकांत गांठ पडल्यानतर आपल्या पत्नीचा तो गभीर चेहेरा पाहून त्याला जरा नवल वाटलें.

" सरकार स्वारी आज जरा गभीर दिसते आहे ! " आपले हात मोठ्या प्रेमानें तिच्याभोंवती लपेटीत तो म्हणाला.

" होयच मुळी ! तसच कांहीं विशेष सांगायच आहे मला आज "

" काय ग आहे एवढ विशेष ल्यूसी ? "

" एक वचन दे मला तर, कीं मी काय सांगेन त्याचं कारण विरग नाहीं विचारायच मला. कबूल ? "

" अग, हें एकच काय — पण तुझ्यासाठीं काय नाहीं मी कबूल करणार, अं ? " तिच्या गालावर रुळत असणाऱ्या केशगुच्छास हळुवारपणें दूर करीत, तिच्याकडे आपली प्रेमनिर्भर दृष्टि लावीत तो म्हणाला.

" मला वाटतं चार्लस, त्या गरीब बिचाऱ्या कार्टनचा उल्लेख आजच्या-सारखा, एकाद्या तिऱ्हाइताप्रमाणें तू करायचा नव्हतास. "

" एकदम कबूल, ल्यूसी. पण कारण सांगशील मला ? "

" अह, आणि तें मला तू विचारूहि नयेस. पण मी काय म्हणतें तें ऐक — मला अस वाटत कीं आपण तरी त्यांना अधिक सहानुभूती दाखविली पाहिजे. "

" तुझं म्हणणं मला प्रमाण आहे, ह, आणखी काय आहे हुकूम, साहेबांचा ? "

" अशी थट्टा नाहीं हं करायची चार्लस ! नीट ऐक मी काय म्हणतें आहे

तें. त्यांच्याशी नेहमीं नीट बोलत जा आणि त्यांच्या पाठीमागें सुद्धां त्यांची कधीं चेष्टा नाहीं करायची मी सांगतें तुला कीं, आपलं अंत:करण जरी ते कधी उघड करीत नसले तरी, तें अंत:करण अतिशय उमद नि विशाल मात्र खास आहे, आणि कितीतरी खोल जखमांचे वण त्याच्यावर उमटलेले आहेत. चार्लस, मला झाल आहे त्याच दर्शन '

" तस असेल ल्यूसी तर त्याचा मी सहस्रश अपराधी आहें मला खरच कल्पना नव्हती त्याची "

' पण अगदी पूर्ण सत्यच सांगतें आहें मी त्या बाबतींत आणि त्यांना जरी आज त्याच्या मार्गापासून कोणी परावृत्त करण अशक्य असल किंवा त्याच पाऊल थोटफार माग खेचण अशक्य असल तरी, त्याच अंत:करण अतीशय उदार आहे, नि तें सत्प्रवृत्त होण शक्य आहे, नव्हे त्यांच्या हातुन एखादी भव्योदात्त कृती घटणहि शक्य आहे असच मला वाटत '

त्या दुर्वृत्त माणसाबद्दलहि वाटणाऱ्या सहानुभूतीमुळें नि आत्मविश्वासामुळें तिच्या त्या सुदर मुखमंडलावर आत्तां काहीं निराळेंच तेज पसरलं होत, आणि तिच्याकडे तरी पहात असता चार्लस् आपलें देहभानहि विसरून गेला होता

" आणि एकमेकांच्या या प्रेमळ सान्निध्यात आपण कधीं, कळीकाळालाहि जुमानणार नाहीं, पण असा प्रेमाचा, जिव्हाळ्याचा, खबीर आधार त्या बिचाऱ्याला कुठे बर आहे, चार्लस ' " त्याच्या छातीवर विश्रब्धपणें आपलें मस्तक ठेऊन नि आपले डोळे त्याच्याकडे लाऊन ती म्हणाली

तिच्या आवाजांतील त्या मार्दवानें अगदी विरघळून जाऊन तो उद्गारला, " कधींहि विसरणार नाही मी तुझे हे शब्द ल्युसी, अगदीं माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत त्यांची मी पूर्ण आठवण ठेवीन. त्याची काळजी नको ! "

आणि तिच्या अंगाभोंवतील आपल्या हाताची मिठी घट्ट करून त्यानें तिला मोठ्या प्रेमानें हृदयाशी धरलें नि तिच्या सुकुमार मुखाचें मोठ्या हळुवारपणें चुंबन घेतलें. ..

*आणि त्याच्या घराच्या आसपास आसुसलेल्या नि पश्चात्तप्त हृदयानें घोटाळत असलेल्या त्या दुर्दैवी कष्टी जीवाच्या कानांवर जर त्या प्रेमदेवतेचे ते तळमळीचे बोल पडले असते किंवा त्या प्रेमळ नील नेत्रांतून गळणारे अश्रू जर*

त्यानें पाहिले असते, तर त्याचाहि हृदय भरून येऊन त्याचेहि ओठ तिला पूर्ण सुखात ठेवण्यासाठीं त्या सर्वेश्वराची आळवणी केल्याशिवाय खाचित राहिले नसते —

" परमेश्वरा, या दयेच्या देवीला पूर्णसुखात ठेव ' "

— —— ——

.... १३ ....

सोहोस्ट्रीट वरील त्या नेहमींच शांत असणाऱ्या आपल्या घराच्या आवारांत, आंगणांतील त्या रुंदर्पण वृक्षाच्या सांद्रछायेंत ल्यूसी बसली होती. आजहि, तिला असा वारवार ऐकू येणारा पाऊलाचा तो गभीर प्रतिध्वनी नेहमीप्रमाणेंच ऐकू येत होता. आपल्या नाजुक पण चिवट प्रेमभावनांच्या बधनांत सर्वांनाच दृढबद्ध करून अतिशय आनदांत तिच सांसारिक जीवन चालू होत तरीहि आनदाच्या त्या अविरत बरसातींत ती सतत न्हाऊन निघत असतांही, भविष्य काळांतील आगामी घटनांच्या पाऊलाच्या प्रतिध्वनीनें ती मधून मधून अस्वस्थ होई स्वत च्या पूर्ण सुखी जीवनाचा तिला विसर पडे, प्रेमळ वर्डालाची वत्सल मूर्ती तिच्या डोळयाआड होई; तिच प्रेम सर्वस्व, तिच्या यौवनपूर्ण सुख सर्वस्वाचा सर्वाधिकारी — तिचा चार्लस तिला दिसेनासा होई, तिच्यावर अपत्यनिर्विशेष प्रेम करणारी मिस प्रॉस दूर निघून जाई आणि एकच एक तो पाऊलांचा प्रतिध्वनी आपल्या सर्वांगाचा जसा कान करून ती ऐकत राही दुरून वाऱ्यावरून वहात येणाऱ्या त्या प्रतिध्वनीच प्रस्फुटस्वरूप तिला अजून नीट कळत नव्हतं. पण त्या ध्वनींच्या निनादानें आशा शकांच्या समिश्र भावनांची एकच गर्दी मात्र तिच्या मनांत उसळे. कांहींतरी अननुभूत अशा वत्सल प्रेमभावनांनीं तिच ऊर भरून येई. पण त्या अननुभूत वत्सलतेचा आनद उपभोगण्यासाठीं त्या भयकर दिव्यांतून आपली सुखरूप मुक्तता होईल का, अशी शंकाहि लगेच तिच्या मनांत डोकाऊन ती कावरी बावरी होई. अकालमृत्यूचे विचार मनांत थेमान घालू लागत, आणि आपल्यामागें भग्न हृदय होऊन वेड्या पिशासारख्या वैराण जीवन कठण्याची पाळी आलेल्या प्रेमी जीवांच्या विचारानें तर तिच्या काळजाचें पाणी पाणी होऊन, तिच्या डोळ्यांचें पाणी खळत नसे.

पण काळ पुढें चालला होता. त्या भयंकर दिव्यांतून सृष्टिक्रमानुसार तिची सुखरूप सुटका झाली होती. तिच्या लहानग्या ल्यूसीचे गोंडस हात तिच्या वत्सल हृदयाला बिलगले होते. आणि तिच्या कानात नेहमींच भयद रीतीनें निनादणाऱ्या प्रतिध्वनींच्या आवाजात तिच्या चिमुकल्या ल्यूसीच्या दुडदुड चालणाऱ्या पाऊलांचा आवाज आणि तिच्या अवखळ हास्यलहरींचा लाडिक खेळ तिच्या मनाला गुदगुल्या करीत होता तिच्या प्रेमाच्या बधनांच सामर्थ्यहि सारख वाढतच चालल होत, आणि तिच्या कानात आतां घुमणारा पाऊलांचा आवाज केवळ आनददायी असाच कांहीं काळ तरी येत होता तिच्या वडिलाच तें मोठ्या धीरानें नि गभीरपणें पडणारें खबीर पाऊल, तिच्या चालेसच प्रतिदिनीं वाढत्या वैभव सूर्याकडे सरळ पडणार निश्चयी पाऊल आणि त्या चपलजिव्ह पण भाबड्या मिस प्रॉसच दणकट पाऊल, या साऱ्याचा आवाज तिच्या सुखीजीवनाचीच केवळ ग्वाही देत होता

सिडने कार्टनच्या पाऊलाचा प्रतिध्वनीहि मधुन मधून तिच्या कानावर येई वर्षांतून निदान पांच सहा वेळांतरी त्याची स्वारी त्या सुखी ससारास भेट दिल्यावाचून रहात नसे त्या रुदपर्ण वृक्षाच्या सायतन छायेंत स्वस्थपणें, त्याच्या हृदयाच्या त्या अनभिषिक्त स्वामिनीकडे आपली विशुद्ध प्रेमळ नजर लावून, तो वसून राही त्याच्या त्या हृदय स्वामिनीची ती छोटी प्रतिमा तर कार्टनच्याच आगावर त्याचे नाजुक हाल करीत लोळत राही. तिला समजाला लागण्यापूर्वीपासूनच कांहींतरी जननांतर सौहृदानें तिचे चिमुकले हात त्याच्या गळ्याभोंवती बिलगले होते; आणि चद्रकलेसारखी तिची गोड वाढ चालू असतां, आजहि तिच्या वयाच्या चौथ्या पांचव्या वर्षी तितक्याच ओढाळपणें तो आला कीं त्याच्या आंगावर तो झेंप टाकी तिच्याच पाठीवर जगांत येऊन दोन तीन वर्षं खेळल्या बागडलेल्या हसऱ्या बाळानेंहि सिडने कार्टनवरील आपलें अकारण प्रेम तितकेंच उत्कटपणें साऱ्यांना दाखविल होत. आणि तो चिमणा जीव परत देवाघरीं जायला निघाला तरीहि — अगदीं अखेरच्या घटकेलाहि, ' मामा आला काग, मा ? ' म्हणून विचारून, नि " त्याला माझा गोल गोल पापा दे ह ! " म्हणून सांगून त्याच्यावरील आपल प्रेम व्यक्त करीत साऱ्याना रडवीत निघून गेला होता.

असले सखद-खमिश्रित प्रतिध्वनी ऐकत ल्यूसीचा सोहो स्ट्रीटवरील एकांत

संसार चालला होता तिच्या प्रेमळ वडिलांचं जीवन आपली विविध कर्तव्यें यथासांग पार पाडून तिनें अतिशय सुखी केलं होतं. कोणताच भेदभाव किंवा वाटणी न करतां आपल्या अथांग प्रेमाच्या उबाऱ्यांत साऱ्यांनाच ती सारखी सुखवीत होती. कोणत्या जादूच्या जोरावर तिनें साऱ्यांना असं सौख्य सागरांत डुबत ठेवलं होतं याचं त्यांना नवल वाटून ते तिला नेहमीं छेडीत. पण मुग्ध हास्य हेंच एक केवळ उत्तर साऱ्यांना प्रसन्नपणें ती देई आणि याच किमयेच्या जोरावर त्या स्त्रीजीवनानें, त्या आदि — शक्तीनं अखिल विश्व भारून आपल्या पायाशीं आज तागायत खेळत ठेवलं आहे, नाहीं का ?

पण दुरून तिकडून कांही अंतरावरून, सर्वांच्याच छातींत भयानें धडकी भरवील अशा एका प्रतिध्वनीचा आवाज गडगडत त्यांच्या दिशेनें येत होता. आणि आता लहानग्या ल्यूसीच्या सहाव्या वाढदिवशीं एका प्रचंड आगामी वादळाची नि तुफान खवळलेल्या सागराची भीषण घनगर्जना फ्रान्सच्या दिशेनें त्यांना स्पष्टपणें ऐकूं येत होती

*

सतराशें एकुणनव्वद मधील मध्य जुलईचे ते उकाड्याचे दिवस ल्यूसी नि चार्लस खिडकी जवळच वारा घेत बसलीं होती. हवेंत उकाडा अतिशय वाढला होता आणि बाहेर काळोख नि वर आकाशांत काळ्याकुट्ट मेघांची गर्दी वाढूं लागली होती. वाराहि आतां धसमुसळेपणानें वाहूं लागला होता आणि वर विजेनेंहि आपला संचार त्याच्या जोडीनें मग चालू केला. कांहीं वर्षांपूर्वीच्या तसल्याच एका वादळी रात्रीचें दोघानांहि स्मरण झालें नि त्यांनीं अस्वस्थपणें खिडकी बाहेर नजर टाकली. विजेचा एक प्रचंड कडकडाट झाला आणि त्याचवेळीं दार धाडकन आपटून लॉरींनीं आंत पाऊल टाकलें.

" काय विलक्षण रात्र दिसते आहे ही आजची ! " आंत येताच ते उद्गारले. " केव्हां एकदा मी इथे येतों असं झाल होतं मला. पण तिकडे आजच कामाचीहि अशी गर्दी उडाली आहे कीं माझा पाय आज बँकेतून बाहेर पडतो कीं नाहीं, याचीच मला शंका वाटूं लागली होती. ओ ! तिकडे पॅरिसमध्यें काय विलक्षण गडबड घाई उडून गेली आहे नि अस्वस्थता माजली आहे, कीं जो उठतो तो आपली सर्व इस्टेट आमच्या स्वाधीन कराला पाहतो आहे. वेडाची लाटच आली आहे जशी कांहीं त्या सर्व शहरावर. "

" कांहीं बर चिन्ह नाहीं हें, मि. लॉरी; " डार्ने म्हणाला

" बरं नाहीं खरं, पण कारण तरी काय त्याच ? आमच्या सारख्या म्हाताऱ्यांना हें कां इतके सतावीत आहेत, कांहीं कळत नाहीं "

" पण एकंदर वातावरण किती खवळलेल नि भयप्रद झाल आहे, हें तुम्हांलाहि माहितच आहे. "

" तें माहित आहे हो, पण माझं डोक तर अस उडून गेलं आहे कीं — डॉक्टर कुठे आहेत पण ? "

" हा पहा, इथेंच ! " खोलींत प्रवेश करीत डॉक्टर म्हणाले.

" सुस्वागतम् सुस्वागतम् ! आतां जरा धीर वाटला बुवा मला. बँकेंतील त्या गडबडीनें नि लोकांच्या शका कुशकानीं, माझ तर डोकं उठण्याचीच वेळ आली होती आज. आणि बाहेर जाणाहि कांही शक्य नाहीं दिसत, मग ! "

" मग काय, एक डाव टाकू या कीं बुद्धिबळाचा ? "

" छे रे बुवा ! आज कांहीं आपली छाती नाही तुमच्याशीं सामना देण्याची. कायग पण ल्यूसी, चहाची तयारी नाहीं दिसत कुठे ? "

" वा वा ! आणि ती काय तिकडे, " ल्यूसीनें उत्तर केलें

" शाबास बेटा — आणि आमची ती चिमुरडी काय झोंपली कीं काय ! "

" हो तर ! केव्हाच पाघरुणांत गुडुप झाली आहे स्वारी. "

" ठीक ठीक, सर्व कांहीं ठाक ठीक तर ! पण इथे नसायच ठाक ठीक, तर मग कुठे ? देवाचीच कृपा आहे ही. पण मी कीं नाहीं आतां झालों आहे म्हातारा नि त्या कामानेंहि बेट्यानें आज अगदी सतावल होत ! ए पण पोरी, चहा दे कीं तो आमचा इकडे ह, आतां ये इथें अशी आणि सांग पाहू आम्हांला तुझे ते काय प्रतिध्वनी की काय ते. "

" कसले नि काय ! माझी आपली कल्पना आहे ती एक वेडीची. "

" बरं कल्पना — नुसता भास, कांहींतरी, " तिच्या पाठीवर थोपटीत लॉरी म्हणाले. " पण आपण आपले तेच ऐकू या झाल ! "

* * *

त्या वादळी रात्रीं ती छोटी शांतता परिषद खिडकी जवळील त्या काळोखांत इकडे अशी चालू असतां, तिकडे लडनपासून पुष्कळ दूर अंतरावरील सेंट अँटॉइनमधें, कोणत्याहि ससाराची निमिषार्धांत धूळधाण उडवणाऱ्या अशा उग्र,

भीषण नि रक्तानें डागळलेल्या मानवी राक्षसांच्या पाऊलांचा प्रतिध्वनी वाढत्या वेगानें सर्व दिवसभर सारखा घुमत होता. त्या दिवशीं सकाळपासूनच सेंट अँटॉइन म्हणजे देहानें जीर्णशीर्ण पण सूडाच्या धगधगीत भावनांनीं नखशिखांत पेटलेल्या मानवी आकृतींचा एक उकळता समुद्रच बनून गेला होता. कांहीं अज्ञात स्थळांतून अविरत खालीं येऊन पडत असलेल्या प्रत्येक जातीच्या हत्यारा पात्यारासाठीं त्या मानवी समुद्रावर लाटांमागून लाटा सारख्या उसळत होत्या. प्रभात सूर्याच्या रक्तवर्ण प्रकाशांत, सेंट अँटॉइनच्या वर उभारलेल्या अनंत हातांतील शस्त्रास्त्रांची पोलादी चकचकीत पातीं, सारखीं चमकत होतीं आणि त्याच्या विराट कंठांतून सूडाची कानठळ्या बसवणारी भीषण गर्जना एकसारखी चालू होती. त्या विराट पुरुषाच्या देहांतील प्रत्येक नस नि नस आतां रसरसून ताडताड उडत होती आणि आपल्या देहाची कुरबानी करण्यासाठीं तो विराट पुरुष अगदीं अधीर होऊन पिसाटासारखा नुसता थय थय नाचत होता.

त्या उकळत्या मानवी समुद्राच्या मध्यभागीं डेफार्जची उच मूर्ती, घामानें नि बंदुकीच्या दारूनें नखशिखात रगून त्या सर्व हलकल्लोळांत घशाच्या शिरा फाटे-पर्यंत ताणून ओरडत, एखाद्या सेनानायकासारखी सर्वांना हत्यारें पुरवीत हुकूम सोडीत उभी होती.

"जॅकस तीन, तूं माझ्याजवळ रहा आणि तुम्ही जॅकस एक नि दोन दोघेहि वेगवेगळे या साऱ्या देशभक्त वीरांचे म्होरके होऊन आपआपले लोक तयार ठेवा. माझी कारभारीण कुठें आहे ?"

"ही काय, तुझ्यासमोरच उभी आहे !" नेहमींच्या शांत स्वरांत मॅडम डेफार्ज म्हणाली. पण तिचें विणकाम आतां चालू नव्हतें. त्या बारीक लांब सुयांची जागा एका जंगी कुऱ्हाडीनें घेतली होती आणि तिच्या कमरबदांत एक पिस्तूल नि एक भला मोठा रुंद सुरा आज दिसत होता.

"तुझी कोणती दिशा कारभारणी ?"

"सध्यां तरी जी तुमची तीच माझी." मॅडम म्हणाली "पण थोड्याच अवकाशांत या बायांची मीच म्होरकी होणार !"

"ठीक तर !" घनगर्जना करीत डेफार्ज म्हणाला. "वीर हो, चला एक-दम बॅस्टील !"

साऱ्या फ्रान्सचा आवाज एकवटल्या सारखा त्या उसळत्या मानवी समुद्रांतून एकच प्रचंड जयघोष दशदिशा घुमवित वर उसळला, नि बॅस्टिलच्या रोखानें मानवी समुद्राच्या त्या भरीव, ठाशीव लाटा तुफान वेगानें पसरल्या. भयसूचक घंटाचा घणघणाट नगाऱ्यांच्या आवाजांत मिसळला आणि त्या समुद्राच्या लाटा एकामागून एक किनाऱ्यावर प्रचंड सामर्थ्यानें आदळू लागल्या — बॅस्टिलच्या हल्ल्यास सुरुवात झाली.

तुफान खवळलेल्या त्या समुद्राच्या उत्तुंग लाटा बॅस्टिलच्या अजस्र भक्कम दगडी भिंताडांवर आतां अशा सतत दोन तास बेगुमानपणें धडका देत होत्या. भिंतींच्या आंतून शिपायांकडून होत असलेल्या भीषण अग्निवर्षावाला दाद न देतां लाटांची ती चाल सारखी चालूच होती, आणि त्या विराट पुरुषाच्या गगनभेदी आरोळ्यांनींहि तोफांच्या धडधडाटालाहि कांहीं काळ मागें टाकून अगदीं निष्प्रभ करून टाकलें. आणि लाटांच्या त्या प्रचंड रेट्यापुढें बॅस्टिलच्या त्या अजस्र राक्षसी भिंतीहि हादरू लागून, थोड्याच वेळांत त्या तुफान समुद्राचा लोंढा बॅस्टिलच्या अंतर्भागांत प्रविष्ट झाला, आणि मुख्य प्रवेश द्वाराच्या तोंडाशीं डेफार्जच्या नेतृत्वाखालील आघाडीची लाट, अंगांतील सर्व अवसान एकवटून प्राणपणानें लढू लागली — खंदकावरील पहिला पूल सर झाला !

"दोस्तहो, असेच नेटानें हल्ला चढवा ! " तो विजयी सेनानायक — डेफार्ज ओरडत होता. "जॅकस एक, जॅकस दोन नि असंख्य दोस्त जॅकस हो, लढा ! देवाच्या नि सैतानाच्या कोणाच्याहि नांवाचा जयघोष करीत असेच कांहीं वेळ नेटानें लढा. बॅस्टिलच्या या प्रचंड भिंतीहि तुमच्यापुढें थरथर कांपत आहेत. पुढे व्हा ! मर्द हो, असेच पुढे व्हा ! "

"आणि तुम्हीपण नका मागे सरू, माझ्या शूर मैत्रिणींनो !" त्याचा आवाज थांबतो न थांबतो तोंच त्याची अर्धांगी किंचाळली. "त्या सैतानांच्या टांचाखालीं चुरडलेल्या आपल्या बालबच्चांच्या नांवानें, आपणहि आपल्या मर्दांप्रमाणें त्यांच्या मुंड्या भाजीसारख्या चरचर चिरू. या, माझ्या मागें या ! " आणि तिच्या या किंचाळ्यानीं चेकाळलेल्या त्या असंख्य डाकिनी हातांतील लहान मोठीं शस्त्रें परजीत सुडाच्या नि रक्ताच्या तहानेनें व्याकूळ होऊन किंचाळत तिच्या मागोमाग त्या गर्दीत पुढें घुसल्या.

चार तासांचं भीषण रणकंदन, नि शरणागतीचं पांढरं निशाण, त्या तुफान

लाटांच्या प्रचंड रेट्यापुढें हतबल झालेल्या बॅस्टिलच्या त्या अजस्र भिंतीवर, कॆविलवाणें फडफडूं लागलें. विजयघोषाच्या आरोळ्यांनीं दशदिशा दणाणून गेल्या. आंतील प्रावारांत त्या तुफानी लाटांचे आक्रमण सुरू झालें, आणि समोर दिसेल त्याचा विध्वंस करीत त्या क्रूर लाटांचा संचार अनिर्बंधपणें सुरू झाला. चार तासांच्या अविरत श्रमानें कांहींसा श्रांत दिसत असलेला डेफार्ज भिंतीच्या आश्रयानें एकदोन क्षण उभा राहिला. त्यानें आपली दृष्टि मागें टाकली जॅकस तीनची, ती जगाला खाऊं कीं गिळूं करणारी आधाशी मूर्ति, त्याच्याजवळच त्याला दिसली. तिकडे कांहीं अंतरावर स्त्रियाच्या एका टोळक्याच्या अग्रभागीं मिरवत असलेली मॅडम डेफार्जची मूर्ति हातांतील ती लखलखीत रुंद सुरा परजीत उभी होती, आणि सभोंवार, जिकडे तिकडे विजयाच्या उन्मादानें मत्त होऊन ते पिसाट मानवी संतान, अक्राळ विक्राळ ओरडत विध्वंसनाचें आपलें कार्य मनसोक्तपणें चालवीत होते.

" राजबंदी, राजबंदी ! "

" बॅस्टिलची कचेरी ! "

" त्या अंधार कोठड्या ! "

" राजबंदी, राजबंदी ! "

अशा असंख्य गर्जना त्या जनसमुद्रावर उठत होत्या पण त्यांतील " राजबंदी ! " ही एकच गर्जना बहुसंख्य मुखांतून वेगानें सभोंवार पसरत त्या भिंतींच्या आंत घुमूं लागली. लाटांचा रेटा पुन्हा पुढें चालू झाला. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना आपल्यापुढें रेटीत डेफार्जच्या आधिपत्याखालील आघाडीची लाट आंतील चौकांत घुसली.

" चलो, एकदम नॉर्थ टॉवर ! ए बदमाष, नॉर्थ टॉवर कुठें आहे बोल ! चल झटपट ! ' हातांतील दंडुक्यानें एका वृद्ध अधिकाऱ्याला आपल्यापुढें ढकलीत डेफार्ज ओरडला

" दाखवतों, दाखवतों महाराज, पण त्यांत कोणींच नाहीं."

" चल — चल, आधीं पुढें हो, तुझी बकबक नको आहे मला. हो पुढें ! " डेफार्ज ओरडला.

जवळच असलेला जॅकस तीन त्याच्या कानांत कांहींतरी कुजबुजला. पण सभोंवार चाललेला मानवीसमुद्राचा तो भीषण कल्लोळ त्यांना कांहींच सुस्पष्ट

ऐकूं बोलूं देत नव्हता. ते तिघेच तसे पुढें नॉर्थ टॉवरच्या दिशेनें आंत जात होते भिंतींच्या बाहेरील सागराच्या त्या लाटा तशाच तुफान वेगानें अजून गर्जत होत्या. आणि त्या कानठळ्या बसवणाऱ्या हलकल्लोळातून मधूनच कांहीं आरोळ्या, वर आकाशात उंच उसळणाऱ्या जलतुषारांप्रमाणें, त्याच्या कानांवर आंत पडत होत्या.

मित्र अधाऱ्या — सूर्यदर्शन कधींच न झालेल्या बोळकंड्यांतून आणि असंख्य दुर्दैवी जीवांना आपल्या भेसूर जबड्यात चूर करून नष्ट करणाऱ्या नि नरक-यातना देणाऱ्या अक्राळविक्राळ यन्त्रांच्या रांगांतून, ते कसेबसे ठेचाळत पुढें चालले होते. असख्य वळणांच्या चक्रव्यूहांतून नि सभोंवार खड्या असलेल्या अजस्र पोलादी चौकटी नि कमानींखालून गुदमरल्यासारखे ते तिघे चालले होते किती तरी ओबडधोबड उभ्या खड्या जिन्यांची चढउतार त्यानी केली असेल अखे-रीस एका उच मनोऱ्याच्या सखल दाराजवळ तो वृद्ध हवालदार उभा राहिला; आपल्या हातातील किल्लीनें त्यानें दाराचे तें गजलेलें जगी कुलूप उघडले आणि खालीं वाकून त्या तिघांनीं आंत प्रवेश केला

"एकशें पाच नॉर्थ टॉवर !" तो हवालदार आंत जाताच उद्गारला

एक अरुंद ओबडधोबड दगडांनीं बांधलेली ती खोली होती भक्कम लोखडी गज असलेली एक निरुंद खिडकी एका भिंतीवर चांगली उचावर बांधलेली आणि तिच्या जवळच थोड्या अतरावर आंतून जाड गजांची जाळी असलेलें एक निमुळतें उच दगडी धुराडें, एवढीच फक्त हवा आत येण्याजाण्याची सामुग्री त्या खोलींत दिसत होती एका बाजुला एक बुरसटलेलें स्टूल नि टेवल आणि त्यांच्या पलीकडे एक गवती बिछानाहि तिथें दिसत होता, आणि या साऱ्यांची एक प्रकारची कुबट घाण आंत मुक्तपणें वावरत होती

"ए, हातांतील ती चूड अशी भिंतीजवळून फिरव नीट"

त्या वृद्ध हवालदाराच्या त्या चुडीच्या उजेडात डेफार्जनें भिंतीचें निरीक्षण सुरू केलें. "थाब थाब ! हें काय आहे इथें पहा जॅकस !"

"ए. एम्. !" जॅकस तीन किंचाळला.

"अलेक्झॅडर मॅनेट," आपलीं दारूनें लडबडलेलीं बोटें त्या अक्षरांवरून फिरवीत, डेफार्जे त्याच्या कानांत म्हणाला "बरोबर, या पहा, कांहीं तारखा पण आहेत खाली खोदलेल्या. पाहू तुझ्या हातांतली ती पहार पाहू जॅकस !"

आपल्या हातांतील दारू ठासण्याचा दांडा जॅकसजवळ देऊन त्याच्याजवळील पहारीनें त्या कुजक्या टेबलाचे नि स्टुलाचे त्यानें दोन तीन फटकाऱ्यातच आर्धी तुकडे केले, आणि मग हातांतील चूड उच धरण्यासाठीं त्या वृद्ध हवालदाराच्या आंगावर खेंकसून तो त्या धुराड्याकडे वळला. थोडा वेळ हातानें आत नीट चाचपून एका बारीक फटींत त्यानें आपली पहार खुपसली. चुनामातीचा एक थर खालीं कोसळला. झटकन आपली मान थोडी बाजूला करून आतां रुंद झालेल्या त्या फटींत त्यानें आपला हात सावधगिरीनें घातला, आणि हाताला आलेलें कांहींतरी झटकन खिशांत कोंबून तो मागें वळून म्हणाला; " आहे का काहीं त्या राखेंत नि त्या गवती बिछान्यांत ?"

" कांहीं नाहीं." जॅकसनें उत्तर दिलें.

" चला तर, पेटवून देऊ या हें सारं. ए थेरड्या, लाव तुझी ती चूड याला नि पेटव सारं !"

तो छोटा होलिकोत्सव उरकून मग आल्या वाटेनें ते तिघे परत बाहेर पडले. आत्तांपर्यंत त्यांना ऐकू येत नसलेला किंवा गुदमरल्यासारखा येत असलेला तो खवळलेल्या समुद्राचा आवाज त्यांच्या कानावर आतां परत आदळूं लागला. ते किल्याच्या मध्य चौकांत येऊन पोंचले आणि सेंट अॅटॉईनचा तो विराट समाज पुरुष आपल्या म्होरक्याच्या पुनर्दर्शनानें आनंदित होऊन त्यांच्याभोंवतीं पिंगा घालूं लागला. बॅस्टिलचा मुख्याधिकारी त्यांच्या हातांत आतां सापडला होता. तोफा डागण्याचा हुकूम देऊन त्यांच्या देशबांधवांच्या रक्ताचा त्यानें बॅस्टीलमध्यें घातलेला सडा त्यांना चेव आणीत होता, आणि हॉटेल् द व्हिलेच्या लोकन्याया-सनासमोर त्याचा झटपट फैसला उरकून त्याच्या रक्तानें रंगण्याचा त्यांचा निश्चय त्यांना धीर निघू देत नव्हता.

सूडाच्या एकच एक भीषण विकारानें थयथय नाचत असलेल्या त्या जन-समुद्रांत, बॅस्टीलच्या मुख्याधिकाराच्या उग्रगभीर मूर्ति शेजारीं, अगदीं शांत-पणें उभी असलेली मॅडमची मूर्ती डेफार्जेला पाहून तितक्याच शांतपणें उद्गारली: " तो पहा माझा घरधनी, डेफार्ज ! " आणि मग तशीच शांतपणें, तो प्रचंड जनसमुदाय त्या अधिकाऱ्याला घेऊन हैदोस दुल्ला करीत वाट चालूं लागल्यावर, ती त्याच्या अगदीं जवळून चालत होती, आणि न्यायासनाजवळ येऊन त्या अधिकाऱ्याच्या आंगावर पाठीमागून एकामागून एक शस्त्राचे घाव सुरू झाले

तरीहि ती तशीच शांतपणें त्याच्या बाजूला उभी होती. आणि अखेरीस जेव्हां त्या घावांनीं तो विशीर्ण होऊन त्याचा मृत देह खालीं कोसळला त्यावेळीं अतिशय चपळाईनें आपला भरदार पाय तिनें त्याच्या मानेवर ठेवला आणि मग शांतपणें तिच्या हातांत किती वेळ तरी अधीरपणें चुळबुळत असलेल्या आपल्या रुंद सुऱ्यानें त्याचें मस्तक तिनें धडावेगळें केलें.

तिच्या त्या भीषण मूर्तीकडे समाधानानें पहात, सूडाच्या आनंदानें उन्मत्त झालेला सेंट ॲटॉईनचा तो विराट पुरुष, क्रांतीच्या तांडवनृत्याच्या त्या पहिल्या पाउलांचा आवाज, सत्राशें एकूणनव्वदच्या मध्य जुलईच्या त्या दिवशीं पॅरिसच्या रस्त्यारस्त्यावर सारखा घुमवीत नि आपल्या विजयगर्जनांनी आकाश दुमदुमून सोडीत, बेहोशपणें नाचत होता.

---

## .... १४ ....

सेंट ॲटॉईनच्या जनसमुद्रावर क्रांतीच्या तांडवनृत्यानें उठलेली ती पहिली भीषण लाट गेले आठ दिवस मागेपुढें सारखी हेलावत होती. आतांपर्यंत दुबळयासारखे वावरत असलेले त्या विराट पुरुषाचे ते असंख्य अवयव, आतां पुनीत होऊन कांहीं वेगळयाच आत्मविश्वासानें फुललेले दिसत होते. स्वतःच्या आंगातील विध्वसनाचें सुप्तसामर्थ्य काय कार्य करू शकतें, याची चुणूक त्यांनीं त्या आठ दिवसांत अजमावली होती. आतापर्यंत रिकामे असलेले त्या विराट पुरुषाचे अस्थिपजर हात, आता पोलादी सामर्थ्यानें प्रतिपक्षाचा चक्काचूर करण्यास चटावले होते. आणि आपआपल्या घरकुटांत विणकाम करीत बसलेले त्यांच्या गृहस्वामिनींचे हातहि, विध्वसनाच्या या नवीन गृहकृत्यांत तितक्याच चापल्यानें वावरण्यास शिकले होते. इतका स्पष्ट त्या विराट पुरुषाच्या सर्वांगावर क्रांतीचा तो ठसा उमटून त्यानें त्याचें स्वरूप आपाद मस्तक पालटून गेलें होतें. जणू काय, गेलीं कित्येक वर्षे एकक्षणहि विश्रांति न घेतां, अदम्य आत्मविश्वासानें काळाच्या कठोर हातानें घडत असलेली ती क्रांतिमूर्ती पूर्ण होऊन, सेंट ॲटॉईनमध्यें आज सुप्रतिष्ठित झालेली दिसत होती.

सेंट ॲटॉईन मधील हा बदल निवल्या डोळयानीं पहात, मॅडम डेफार्ज

आपल्या नेहमींच्या जागीं आपल्या नेहमींच्याच शांतपणें आज बसली होती. तिचे हात आतां विणकामांत गुंतलेले नव्हते. पण तिच्या दुय्यम सेना नायकाचे —एका उग्र चेहेऱ्याच्या नि दाठर शरीराच्या तिच्याशेजारींच बसलेल्या स्त्रीचे हात मात्र आजाहि विणकामांत गढले होते. गेल्या आठ दिवसांतील आपल्या कामगिरीमुळें कराल काली या नांवानें ती आतां प्रसिद्ध झाली होती.

" आवाज बद ! " काली ओरडली. " कोणाच्या पाऊलांच्या आवाज येतो आहे हा ? "

आपट बाराच्या स्फोटासारखा सेंट ॲटॉईनचा एकच आवाज आला, " डेफार्ज ! "

" होय, डेफार्ज. " मॅडम शांतपणें म्हणाली. " पण तुमचा आवाज नको आहे आतां कोणाचा, मर्द हो, सारे एकदम शांत ! "

हातांतील तांबड्या टोपीनें वारा घेत डेफार्ज धापा टाकीत आंत आला नि त्यानें सभोंवार दृष्टी फिरवली. सारेजण जीवाचे कान करून त्याच्याकडे टवकारून पहात होते.

" बोला डेफार्ज, काय आहे बातमी ? " मॅडम म्हणाली.

" परलोकची बातमी आहे ! "

" परलोकची ? म्हणजे याचा काय अर्थ ? " मॅडमनें विचारलें.

" तुम्हां साऱ्याना तो बदमाप फौलन आठवतो, नाहीं ? पोटांत कांटे भरायला सांगत होता आपल्याला. त्याचा मुडदा पडला होता नि नरकाला गेली होती ती स्वारी ? "

" अर्थात, अर्थात, कोणाला नाहीं आठवत ? " ते सर्वजण ओरडले.

" आच्छा ! पण परत आली आहे ती स्वारी आतां आपल्यात ! "

" आपल्यांत ! आणि तसा मुडदा पडल्यावर ? " परत ते ओरडले.

" अरे नाहीं ! त्या भागूबाईनें सार ढोंग केल होत तें त्यावेळीं. पण आतां जीवत सांपडला आहे तो बोकड आपल्याच तडाक्यात. बोला तर, घ्यायचा कीं नाहीं तो बळी ? "

कोणाच्याहि हृदयात भयानें धडकी भरवील एवढ्या मोठ्या होकारार्थी आवाजांत तो विराटपुरुष एकमुखानें ओरडला. नि मग एक क्षणभरच परत

चौंफेर शांतता पसरली. डेफार्ज आणि-त्याच्या पत्नीचा डोळयाला डोळा भिडला; आणि कालीनें आपल्या पायानें काउटर मागील पडघम पुढें ओढला.

" माझ्या मर्दबधूनों ! " सेनानायकाची गर्जना झाली " हुश्शार ! "

मॅडमचा तो लखलखीत रुद सुरा तिच्या कमरबदात एकदम प्रविष्ट झाला, आकाशांतून पडल्यासारखा एकदम पुढें आलेल्या पडघमवाल्याची टिपरी पडघमवर नाचू लागली, आणि करालकाली विलक्षण हातवारे करीत नि मोठ्यानें किंचाळत दारादारांतून नाचू लागली.

हाताला येईल तें हत्यार घेऊन क्रांतीचे ते भेसूर गण अक्राळ विक्राळ ओरडत रस्त्यात धांवत जमा होऊ लागले, आणि त्यांच्या गृहस्वामिनीहि हातांतील आपला कामधदा तसाच टाकून नि म्हाताऱ्या कोताऱ्यांना आणि पोराबाळांना तसेच तडफडत ठेऊन मोठ्यानें किंचाळत एकमेकींना पुढे ढकलीत, मुक्त केश, पिसाटासारख्या धांवत रस्त्यांत गोळा होत होत्या रागानें वेड्यापिशा होऊन छाती पिटीत नि डोक्यावरील झिंज्या उपटीत, त्या बदमाष फौलनच्या नांवाचा बीभत्स उद्धार करीत उन्मत्तपणें त्या रस्त्यांत नाचत होत्या. त्या निष्ठुर सैतानी फौलनच्या क्रौर्यामुळें अकालीं तळमळत मृत्युमुखीं पडलेल्या आपल्या कच्चाबच्चांची आठवण, त्यांच्या हृदयांत जागी होऊन सूडाचें भूत काहीं विलक्षण त्वेषानें साऱ्यांच्या अतरगांत जसें थयथय नाचत होतें तुकडे, काड्याच्या अणूवर फक्त राहतील इतके त्याच्या जित्या शरीराचे फाडून तोडून राई राई एवढे तुकडे करण्यासाठीं, त्या साऱ्या सतप्त आयाबहिणी अनावर वेगानें एकमेकींना पायांखाली तुडवीत, बेगुमानपणें हॉटेल द व्हिलेच्या रोखानें आता पळत सुटल्या होत्या.

एकमेकांना एक क्षणाचीहि उसत न देता सेंट अॅटॉईनचा तो विराट पुरुष, प्रचंड वेगानें घोंघावत न्यायासनाच्या प्राकारांत आता उसळला होता. न्यायासनाच्या मध्यभागीं फौलनची ती वृद्ध, करपटलेली दुष्ट मूर्ती हातपाय पूर्णपणें जखडलेली अशी दिसत होती आणि त्याच्या पासून थोड्याच अतरावर मॅडम नि मसिअर डेफार्ज, कराल काली आणि जॅकस तीन त्याच्याकडे कठोरपणें पहात उभे होते.

" पहा, पहा नीट पहा त्या थेरड्याचं थोबाड ! " हातांतील सुरा त्याच्याकडे करून मॅडम म्हणाली. " खा, आता खा काटे म्हणाव; चिणा, चागले

थोबाडांत चिणा ते त्याच्या, समजूंद्या एकदा त्याला पण कांटे खाण्याच सूख! वा, वा ! काय मजा दिसते आहे आतां " सुरा खांकेत धरून नि हातानें टाळ्या पिटीत आणि खदखदां हंसत मॅडम म्हणाली.

तिच्या पाठीमागें उभ्या असलेल्या त्या विराट पुरुषानेंहि आपल्या अनंत हस्तानें तिची जोरानें साथ केली, आणि काय घडतें आहे याची त्या विराट पुरुषाला नीटशी कल्पना येण्यापूर्वीच डेफार्जचे हात फौलनच्या आंगावर पडले आणि तो खालीं कोसळला. आणि "आणा, इकडे बाहेर ओढा त्या थेरड्याला," अशी एकच प्रचंड आरोळी त्या न्यायासनांत कांहीं वेळ घुमत राहिली.

किती तरी हात त्या खालीं पडलेल्या फौलनच्या आंगावर आतां पडले आणि त्याच्या तोंडांत काटे कोंबीत पायऱ्यांवरून त्याचें डोकें थाडथाड आपटीत नि त्याला फरफटत ओढीत, सूडाचा तो जागा झालेला सैतान त्याला पुढें आणीत होता अनत हातांच्या त्या फटकाऱ्यानीं रक्तबबाळ होऊन अर्धा मेला झालेला फौलन, गुदमरलेल्या आवाजांत केंविलवाणा ओरडत सारखा तडफडत होता. पण ते अनत हात पाय त्याला तसाच पायाखालीं तुडवीत, ठेंचकाळत, फरफटत रस्त्यावर ओढून नेत होते. फौलनच्या केंविल-वाण्या किंकाळ्या चालूच होत्या आणि जवळच नेटानें चालत असलेल्या मॅडमचे हात त्याच्या तोंडांत कांट्याचा तोबरा सारखा चिणीतच होते. पण मग कंदी-लाच्या खांबाजवळ तो अर्धमेला चोळा मोळा झालेला मांसाचा गोळा आणल्या वर, तिनें आपली जागा सोडली आणि गळ्याभोंवतीं दोरी बांधून खांबाला लट-कत वर चढत असलेल्या फौलनच्या मूर्तीकडे पहात ती स्वस्थ उभी राहिली. तोंडांत कांट्यांचा तोबरा चिणलेला तो मांसाचा लोळा गोळा आतां खांबावर उंच निर्जीवपणें लोंबकळत होता, रस्त्यावरील घाणीचा वर्षाव त्याच्या आंगावर अजूनहि बेभानपणें किंचाळत चालूच होता, आणि सेंट अॅटॉईन आनदानें बेहोष होऊन त्या कंदीलाच्या खांबाभोंवतीं पिशाच्चासारखा किती वेळ तरी नाचत होता

सायंकाळपर्यंत सेंट अॅटॉईननें फौलनच्या जांवयाचा आणखी एक बळी घेऊन आपला आत्मा त्या दिवसापुरता शांत केला, आणि एकमेकाच्या प्रेमालिंगनांत सारी रात्र आनदानें नाचत बागडत घालवून, सूडाचे ते मानकरी पहांटेच्या पहिल्या प्रहरांत श्रांत होऊन झोंपी गेले.

उगवत्या सूर्याची पहिली रक्तवर्ण प्रभा पूर्वेकडे पसरली आणि गिऱ्हाइकांचें अखेरचें टोळकें दुकानाबाहेर पडल्याबरोबर दारबंद करीत घोगऱ्या आवाजांत डेफार्ज उद्गारला —

' अखेरीस उजाडला तो दिवस, नाहीं लाडके ' "

" हो तर काय, तसच म्हणायच ' " मॅडमनें उत्तर केलें

* * *

मॉस्यूर दि मार्क्विसच्या त्या राजप्रासादतुल्य भव्य वाड्याजवळील टेकडीच्या पायथ्याशीं असलेलें तें खेडेगांव त्याच दिवशीं आज नेहमींची वेळ होऊन गेली तरी अजून जागेंच होतें कोणत्याच घराच्या खिडकींत आज दिवा जरी दिसत नव्हता तरी, खेड्यातील सर्व स्त्रीपुरुष आपआपसांत मंदस्वरांत कुजबुजत, कृष्ण पक्षांतील रात्रीच्या त्या मिट्ट काळोखात एकाच दिशेनें मोठ्या उत्सुकतेनें पहात उभे होते टेकडीच्या माथ्यावर नेहमींप्रमाणें आपलें काम करीत असलेल्या त्या रस्ता कामगारानें आपलें काम आटोपून खालीं येत असतां, गावकऱ्यांच्या एक दोन पिढ्यांच्या कानांनीं कधींच न ऐकलेली अशी एक लोक विलक्षण बातमी आपल्याबरोबर आज आणली होती. आणि ती बातमी आल्यापासून सारे गांवकरी अतिशय आनंदित होऊन मोठ्या उत्कठेनें गावातील त्या कारंजाजवळ तसे एकाच दिशेला पहात स्तब्ध उभे होते. त्यांच्या त्या विलक्षण वर्तनानें कांहींसा चकित होऊन गाव कामगार मसिअर गॅबेलेहि अस्वस्थ होऊन आपल्या घराच्या गच्चीवरून त्या मिट्ट काळोखांत तसाच तिकडे पहात उभा होता. त्याच्या घरासमोर गोळा झालेल्या त्या जनसमुदायाचा आजचा एकदर नूर त्याला चैन पडूं देत नव्हता कांहीं तरी अज्ञात भयानें त्याचें हृदय थरथरत होतें. क्षणांत समोर खालीं दिसत असलेल्या त्या भयद गमीर मूक जनसमुदायाकडे तो आपली नजर अस्वस्थपणें लावी, तर दुसऱ्याच क्षणीं ते पहात असलेल्या दिशेकडे त्याचे डोळे न कळत वळत. अखेरीस त्याच्यानें धीर न निघून त्यानें प्रार्थना मदिराच्या रखवालदाराला सावध राहण्याची सूचना देण्यासाठीं हळूच आपुला माणूस पिटाळला. न जाणो मदिरांतील तो भयसूचक घटानाद करण्याची रात्री बेरात्रीं जरूर लागली तर ?

रात्र वाढत चालली नि काळोखाची भीषणता अधिकच प्रगूढ झाली. सोसाट्याचा वाराहि वाहू लागला आणि त्या भव्य प्रासादाच्या सभोंवारच्या गर्द वृक्ष

रात्रीनें, आपलाहि अस्वस्थपणा त्या वास्तुदेवतेच्या निदर्शनास आणण्यास प्रारंभ केला. वादळी पावसानेंहि त्याच्या पाठोपाठ वाड्याच्या सर्वांगावर जोरानें वर्षाव करून आगामी सकटाची जणु काय सूचना देण्यास सुरुवात केली. वारा तर वाट मिळेल तिथून आंत घुसुन सर्व वाडाभर जसा कांही धिंगाणा घालीत नाचत होता आणि त्याच वेळीं वाड्याच्या चार दिशांनी त्या मिट्ट काळोखात दबत दबत आलेल्या चार कृष्णवर्ण मूर्ति वाड्याच्या पुढील चौकात मोठ्या सावधगिरीनें प्रविष्ट झाल्या. — चार जळत्या चुडांचा उजेड एक क्षणभरच चौकांत पसरला नि दुसऱ्याच क्षणीं त्या चार दिशेनें नाहींशा होऊन काळोखाचें साम्राज्य पूर्ववत तेथें पसरलें.

" पण थोडाच वेळ. आणखी चार दोन क्षणातच वाड्याच्या अतर्भागांतून प्रकाशाचे झोत सर्व वाड्याला जसे काहीं आंतून उजळा देत चोंहीकडे पसरले. बाल अग्निनारायणाचे चिमुकले हात कांहीं काळ तसेच त्या सर्व वाड्यांत अखंड पसरत होते. पण क्रमानें त्यांचा विस्तार मग वाढू लागला आणि थोड्याच वेळांत सर्व वाडाभर एकच प्रचड आगीचा डोंबाळा काडकाड आवाज करीत वर उसळला

वाड्यातील नोकरांची धावपळ सुरू झाली, प्रार्थना मदिरातील घटा रात्रीच्या त्या प्रशांत प्रहरांत मोठ्यानें आवाज करीत भयानकपणें सारखी घणघणू लागली, आणि घामानें डबडबलेली अशी घोडेस्वाराची एक मूर्ती मसिअर गॅबेलच्या दाराशीं येऊन उभी राहिली " धांवा धांवा, गॅबेल! लोकहो, चला — माझ्या बरोबर चला!" तो घोडेस्वार ओरडला. मदतीची याचना करीत ती घटाही तशीच जोरानें घणघणत होती पण तिथे उभ्या असलेल्या त्या दोनतीनशें मानवी व्यक्तींतून एकहि व्यक्ति कसलीच हालचाल मात्र करीत नव्हती. ते तीनशें मानवी देह, आगीचा डोंबाळा उठलेल्या त्या एकाच दिशेनें पहात स्वस्थ अगदीं स्वस्थ उभे होते. " तीस चाळीस फूट उच उसळला आहे आगीचा डोंब!" जाग्यावरून एक रतिभरहि न हालतां दात ओठ आवळून ते एकमुखानें बोलत होते.

त्या भव्य प्रासादाला चोहोंबाजूनी आपल्या लळलळीत तीक्ष्ण पल्लेदार जिभांनीं ग्रासीत असलेल्या त्या संतप्त अग्निनारायणाला पाहून शांतचित्त झालेले ते सर्व नागरिक, आतां मोठ्या आनदानें मसिअर गॅबेलच्या मकाणाकडे वळले.

आणि त्याच्या घरांत नि कचेरींत होत्या नव्हत्या तेवढ्या लहान मोठ्या मेण-बत्त्या त्यानीं सक्तीच्या खुशीनें त्याच्याजवळून घेऊन, क्रांति देवतेचे ते भावी पाईक आपआपल्या खराड्यात परतले. थोड्याच वेळात प्रत्येक घरांत पेटलेल्या त्या मिणमिणत्या दीपांच्या रांगा आपला आनद महोत्सव साजरा करीत शात-पणें प्रकाशू लागल्या. आणि मसिअर गॅवेलच्या अस्वस्थ हृदयांत मृत्यूची भीषण छाया दाटू लागली.

तो भव्य प्रासाद — मॉस्यूरच्या अनेक पिढ्यांच तें अभिमान स्थान — विलास ऐश्वर्य नि सत्तेचा तो भव्य मानदंड, शांतपणें जळत होता. वर उंच आका-शाला भिडू पाहणाऱ्या त्या अग्निनारायणाच्या अनतकोटि जिभा, त्या प्रासा-दाचा सर्वांगानें सपूर्ण ग्रास करीत होत्या प्रासादाच्या आवारांतील ती गर्दवृक्ष-राजी त्या प्रचड उष्णतेनें होरपळून कोळपून सुसाट वाऱ्याच्या माऱ्यानें जमीन-दोस्त होत होती, आणि धुराचा एकच प्रचड लोट वर आकाशांत उच उसळत होता. आंतील भिंतीवरील ती अजस्र तुळवटें, काड काड आवाज करीत आपल्याबरोबर भिंतीनाहि जमीनदोस्त करीत खालीं कोसळत होती, आणि त्या कवखवखलेल्या अग्निनारायणाच्या अथांग उदरांत चारदोन क्षणांतच भस्म-सात होऊन गडप होत होती त्या प्रचड आवाजानें आणि प्रखर उष्णतेनें आपल्या सुखनिद्रेंतून दचकून जागे होऊन वेड्यासारखे सैरावैरा पळत असलेले असंख्य पक्षी, त्या धडकलेल्या अग्निकुडांत धडाधड कोसळत होते आणि एक-प्रकारचा विलक्षण उग्रदर्प सभोंवार दशदिशा पसरत होता. आणि तो भव्य प्रासाद — विलास, भोग, ऐश्वर्य, उन्मत्त बेपर्वाई नि निष्ठुर सत्ता या साऱ्याचं तें मूर्तिमत प्रतीक — असख्य धूलिकणाऱ्या रूपांत आतां वाऱ्यावर विरून नाहींसा होत होता

कृष्णपक्षांतील त्या मिट्ट काळोखी रात्रीच्या घनदाट छायेंत कांहीं वेळापूर्वी लपत छपत चार दिशांनी प्रवेश केलेल्या त्या चार कृष्णमूर्ति, कृतकृत्यतेच्या समाधानान नि त्यांनी धडाकून पेटविलेल्या क्रांतीच्या प्रचंड ज्योतीच्या त्या उजेडांत, नितक्याच मूकपणें ज्योतीची ही दीपावली अन्यत्र प्रकाशित कर-ण्यासाठीं इष्ट दिशेनें निघून गेल्या. प्रार्थनामदिरांतील घणघणत असलेला तो भयसूचक घटानादहि आतां थांबला. पण थोडयाच वेळात त्या जागृत झालेल्या

क्रांतीच्या तीनशें पाईकांचा आनद मुक्तकठ व्यक्त करीत तोच घंटानाद मग परत आसमतांत घुमत राहिला.

पण मसिअर गॅबेलचा जीवमात्र निदान आज तरी बचावला होता.

---

....१५....

सेंट अॅटॉईनच्या प्रावारांत उठलेली क्रांतीची ती भीषण लाट एक क्षणभरहि उसंत न घेतां नि मागें न येतां वाढत्या सामर्थ्यानें सारखी पुढे पुढेच चालली होती. तिचा प्रचड विस्तार आतां साऱ्या फ्रान्सभर पसरला होता क्राति लाटेच्या जोरदार प्रगतीपुढें समाज पुरुषाचे नि राष्ट्रपुरुषाचे कुजके किडके अवशेष जमीनदोस्त होऊन जात होते. आणि स्वसामर्थ्याच्या प्रभावी जाणीवेनें आणि सत्ता वारुणीच्या उन्मादानें बेहोष झालेल्या क्रांतीच्या त्या पहिल्या पिसाट गणाचा नंगानाच, साऱ्या देशभर अविछिन्नपणें चालला होता. फ्रान्सचें सत्ताकेंद्र असलेल्या त्या विलासी पॅरिस मधीलहि अतर्बाह्य कुजलेला तो मानकऱ्यांचा, दरबारी मुत्सद्यांचा नि सत्ताधिकाऱ्यांचा वर्ग पार नाहींसा झाला होता आणि सामर्थ्य सपन्न, सर्व सत्ताधारी असा राजमुकुटहि पदभ्रष्ट होऊन आता अखेरच्या घटकेची वाट पहात चार भिंतींच्या आंत कोंडून पडला होता.

पण फ्रान्समधील संपन्न जमीनदारांचा कांहीं दैववान अवशेष मात्र जिवाच्या भयानें, आपल्या जमीन जुमल्यावर पाणी सोडून वाट फुटेल तिकडे या वादळापूर्वी हळूच निघून गेला होता असल्या कितीतरी पळपुट्या पण दैववान लोकाची मालमत्ता टेलसन बॅकेच्या लडनमधील तिजोरींत आधींच येऊन बसली होती. जणु काय टेलसन बॅकेचें ऑफिस म्हणजे या दैववान निर्वासितांचें माहेरघरच बनून गेलें होतें. आणि म्हणूनच फ्रान्समधून येणाऱ्या गरमागरम बातम्यांची लज्जत चाखण्यासाठीं त्या सुरक्षित ठिकाणीं त्यांची रोज गर्दी उडून जाई

आजहि आतां सायकाळ होत आली तरीहि बॅकेंतील ती गर्दी अजून कायमच होती, आणि बॅकेच्या सूचना फलकावरील बातम्यांची ती खुर्दामोड सारखी हाताळली जात होती. त्या खुशाल चेंडूंकडे पहात नि त्यांच्या टेबलाला टेकून

उभ्या असलेल्या चार्लस डार्नेजवळ हळू आवाजांत बोलत मिस्टर लॉरी बसले होते.

" पण तुमचा उत्साह जरी आमच्या सारख्या तरुणांना लाजविणारा असला तरी, मला आपल तुम्हाला सांगावस वाटतच आहे कीं -- " कांहींसा अड-खळत डार्ने म्हणाला

" समजल, समजलं ! इतका म्हातारा झालों आहे मी ? "

" हवा ही अशी अनिश्चित, दूरचा प्रवास, प्रवासाचीं साधनहि बेभरवशी, तो देश तसा तुफान अदाधुद आणि तें पॅरिस तर केवळ वखवखलेल्या सिंहाची गुहाच. मग तिथें तुमच जीवित सुरक्षित कस ? "

" अरे पण बेट्या, हीं तर तुझी कारण मला जा म्हणूनच सांगताहेत, रहा म्हणून नव्हे " त्याच्या पाठीवर थाप देत हसून लॉरी म्हणाले. " मला तर कांहीं नाहीं तिथें धोका दिसत अरे, माझ्यापेक्षां अधीक मौल्यवान मसाला त्यांना रोज तिथें मिळत असतां, माझ्यासारख्या एकपाय थडग्यांत गेलेल्या म्हाताऱ्याकडे रे बाबा कोण पहाणार ? आतां अदाधुदीविषयीं म्हणशील, तर माझ्यासारख्या बॅकेंत काळ्याचे पांढरे झालेल्या, विश्वासु नि अनुभवी मुरब्ब्याला नाहीं त्या माझ्या पूर्ण परिचित असलेल्या पॅरिसला आतां पाठवायचा, तर कोणाला ? आणि हा लांबचा त्रासाचा प्रवास नि ही हिवाळी वादळी हवा याचा जर मी अशा निकडीच्या वेळीं बाऊ करायला लागलों, तर टेलसनच अन्न इतकी वर्षे मी फुकटच खाल्ल म्हणायच ! "

" मलाच जातां आल असत तर किती बर झाल असत ! " अस्वस्थपणें स्वत शींच बोलल्यासारखा चार्लस उद्गारला.

" वा , छान ' काय पण बोलतं आहे बाळ ! " लॉरी मान हलवीत म्हणाले. " तू जाणार ना ? आणि तू जन्मजात फ्रेंचमन ? तारीफच केली पाहिजे तुझ्या अकलेची."

"अहो पण लॉरी, बोलणार नव्हतों मी, पण मी अस्सल फ्रेंचमन आहें म्हणूनच अनेकवार माझ्या मनांत हा विचार येतो आहे. त्या दलित वर्गाविषयीं माझ्या मनांत पूर्ण सहानुभूती आहे नि त्यांच्यासाठींच मी थोडाफार त्यागहि केला आहे. यांमुळेंच मला राहून राहून अस वाटत कीं माझ कदाचित ते थोड फार

ऐकतील. आणि त्यांच्या त्या अत्याचारी वृत्तीला मला कांही आळा घालतां येण शक्य आहे. काल रात्रींच तुम्ही गेल्यावर ल्यूसीजवळ मी कांहीं — ”

“ तिच्या जवळ ! कांहीं शरम पण नाहीं का वाटत सांगायला ? ” लॉरि रागानें उसळून म्हणाले. “ या असल्या दिवसांत तू फ्रान्समध्यें ? — हद्द झाली आतां ! ”

“ अहो पण, मी जायला निघालों का आहे ? ह ! जरा थंड व्हा पाह आतां, ” हसत हसत त्यांना हात जोडीत डार्ने म्हणाला “ आतां पुढं ह मि. लॉरी पॅरिसला जाऊ इच्छितात ”

“ अलबत, जाणारच आहें मी ! खरी गोष्ट अशी आहे, चार्लस, ” आपल आवाज खालाऊन नि आपल्या ऑफिसभर एकदां दृष्टि फिरवून मि लॉरि म्हणाले, “ तिकडे आमच काम किती विकट होऊन बसल आहे नि मा कागदपत्र कसे धोक्यांत आहेत, याची तुला कल्पना नाहीं येणार आमचे त कागदपत्र जर जप्त झाले किंवा त्यांची जर नासधूस झाली, हो काय नेम त्याचा त्या पॅरिसलासुद्धां आग लाऊन बेचिराख करतील त्याला ते हैवान — त किती लोकांचा जीव धोक्यांत सांपडेल तें एक परमेश्वरच जाणें बाबा ! तेव्ह त्यांतले अगदीं महत्त्वाचे कागद तेवढे तेथून हलवून नि बाकींचे पार नाहींस करून टाकण, आणि तें पण अगदी झटपट, हें माझ्याशिवाय दुसर कोण कर शकणार आज ? आणि या पूर्ण जाणीवेनेंच टेलसननें तें माझ्या आंगावर अस एकदां सोंपविल्यानंतर, या म्हाताऱ्या देहाला जरा त्रास पडेल म्हणून म मागं सरायच ? आणि तेंहि या टेलसन बँकेच साठ वर्ष अस अन्न खाल्यानतर पण तसा मी तरणाच आहें अजून, चार्लस ! ”

“ तुमच्या या धडाडीच मी मन पूर्वक अभिनदन करतों, मि. लॉरी.”

“ हे ! अरे अभिनदन कसल ! — आणि, हें बघ चार्लस,” सभोंवार परत एकदां दृष्टिक्षेप करीत लॉरी म्हणाले, “ या दिवसांत पॅरिसच्या बाहेर कांहींि काढायचं म्हटलं तर जवळ जवळ अशक्यच आहे. सूळावरची पोळीच आ ती. आजच बघ — अगदीं गुपित आहे ह तें, तुझ्याशीं सुद्धां बोलू नये ख म्हटल तर, पण — अशा कांहीं विलक्षण लोकांच्या हातांतून आणि अश कांहीं विलक्षण धाडसानें कांहीं कागदपत्र आले आहेत बँकेंत, कीं विश्वासा नाहीं बसणार कोणाचा त्यावर. तळहातावर अगदीं शीर घेऊनच त्या पठ्ठयान

पॅरिसची सरहद्द ओलांडली. अजूनपर्यंत काय, असे हंसत खेळत आमचे कागद-पत्र येत जात होते. पण आतां जसं सतीचं वाण झालं आहे तें."

" आणि खरंच जाणार तुम्ही आज रात्रीं?"

" होय, आज रात्रींच, कारण आतां एक एक दिवस म्हणजे नुसता सोन्याच्या मोलाचा झाला आहे."

" आणि बरोबर कोणीच घेत नाहीं तुम्ही?"

" अरे, किती तरी नांव सुचवलीं होतीं मला, पण मला कोणींच पटला नाहीं त्यांतला. मी आपला आमचा जेरी नेईन म्हणतो आहे. गेली कितीतरी वर्षं माझ्या संगतींत आहे तो. अगदीं इमानी आहे पठ्ठा तो माझ्या आंगाला कोणी हात लावला तर फाडून खाईल त्याला बेटा. विचार बिचार त्याला कांहीं माहीत नाहीं नि त्याची कुणाला शकाही नाहीं यायची."

" तुमच्या धडाडीच पुन्हा एकदा अभिनदन करावसं वाटत मि. लॉरी."

" आणि मलाहि म्हणावस वाटत, अरे कसल अभिनदन! आतां एवढी ही कामगिरी सपली कीं मग टेलसनजवळ पेन्शन मागणार आपण. म्हातार-पणचा विचार करायला मग मिळेल पुष्कळ वेळ."

त्यांच्या सभोंवार त्या खुशाल चेंडूच्या गप्पा अजून चालूच होत्या. त्यांना आणि इग्लडमधील त्या वर्गाच्या जातभाईंना त्या भीषण क्रांतीची खरी खुरी कल्पना आलेलीच नव्हती. वर्षानुवर्षे चाललेली गरीबगुरीबांची ती क्रूर पिळणूक त्याच्या डोळ्यांना कधींच दिसली नव्हती, कीं त्या क्रियाशून्य विलासी वाचिवीरांच्या उन्मत्त ससाराचा त्यानीं कधीं विचार केला नव्हता. सुजला नि सुफला असलेली फ्रान्सची ती भूमी आज नि:सत्व, केवळ मरूभूमीच कां बनून राहिली आहे याचा विचार त्यांना कधीं शिवला नव्हता. आणि त्या असख्य वर्षे टांचाखाली चुरल्या जात असलेल्या जनता जनार्दनाच्या मनांत सूडाचा स्फुलिंग धुमसून, त्याचा कधीं तरी साऱ्या विश्वाचा ग्रास करण्यास निघालेला असा प्रलयकालचा अग्निनारायण प्रकट होईल, अशी अंधुकहि कल्पना त्यांच्या बथ्थड डोक्यांत उत्पन्न झाली नव्हती. म्हणूनच फ्रान्समध्यें आतां प्रकट झालेल्या खऱ्या क्रांतीचें स्वरूप न उमजून त्यांच्या बाष्कळ गप्पा अजून चालूच होत्या. पण क्रांतीच्या विचारांनी गेले कांहीं दिवस अस्वस्थ

झालेल्या चार्लसच्या डोक्यांत मात्र त्या गप्पा ऐकून विचारांचें काहूर अधिकच जोरानें आज उठत होतें. त्यांच्याकडे एकवार तिरस्कारानें दृष्टिक्षेप करून तो तिथून बाहेर पडणार होता. पण काळाच्या उदरांत तयार होत असलेल्या एका अज्ञात घटनेनेंच जणु काय त्याला तसें करूं दिलें नाहीं.

शिपायानें मि. लॉरींच्या टेबलावर एक मळकट पाकीट आणून ठेवलें. चार्ल-सच्या हाताजवळच तें पाकीट ठेवलें गेल्यानें त्यावरील पत्ता त्याला स्पष्टपणें वाचतां आला; " अतिशय निकडीचें. मसिअर सेंट एव्हरमॉड. C/o मेसर्स टेलसन अँड कंपनी, बॅंकर्स, लंडन."

त्याच्या विवाहाच्या दिवशीं सकाळीं त्यानें आपलें नांव डॉक्टर मॅनेट यांस सांगितलें होतें. पण त्यांच्याच सागण्यावरून आजतागायत तें नांव इतर सर्व परिचित व्यक्तींपासून मात्र गुप्त ठेवण्यांत आलें होतें त्याच्या लाडक्या ल्यूसी-लाहि त्याची कल्पना नव्हती, आणि लॉरींना तर मुळींच नव्हती.

" अजून पर्यंत तर कांहींच पत्ता नाहीं लागला या गृहस्थांचा, " त्या शिपा-याकडे वळून ते म्हणाले. " या सर्व गृहस्थांना मी विचारलहि होत. आतां पुन्हां विचारतों, आहेत का हे गृहस्थ कोणाच्या परिचयाचे ? "

या ना त्या उपायांनीं आपल्या पश्चात् भागास पाय लाऊन फ्रान्समधून भेकडासारख्या पलायमान होऊन आलेल्या त्या सर्व सद्‌गृहस्थांनीं, तो प्रश्न ऐकून आपल्या जिभा कांहींहि भीडमुर्वत न ठेवतां मग मोकळ्या सोडल्या, आणि त्या सेंट एव्हरमॉडविषयीं अनेक प्रकारचे निंदाप्रचुर प्रलाप चार्लसच्या सभोंवार घुमूं लागले. कुणी त्याला भेकड म्हणाले, कुणाला तो कर्तव्य पराङ्‌मुख वाटला, तर कुणी त्याला नादान ठरवून तो कुलकलंक जगायलाहि नालायक म्हणून ठासून सांगू लागले.

कांहीं विलक्षण मनःसंयमानें तें सारें गालिप्रदान ऐकत डार्ने उभा होता. " त्याच्या मनांतले विचार आपल्याला समजण्याला पण काय मार्ग आहे ? मी ओळखतो त्याला." अखेरीस त्यांच्याकडे गभीरपणें पहात तो म्हणाला.

" जरूर काय त्याची. बोलून चालून पळपुट्या तो ! " गवताच्या ढिगाऱ्यांत लपून बसून पॅरिस बाहेर कसेबसे जीव घेऊन निसटलेले एक वीर उद्गारले. आणि त्यावर झालेल्या टाळ्यांच्या कडकडाटांत ते सारे पलायनशूर बॅंके-बाहेर पडले.

" मग तुम्ही द्याल का त्यांना तें पत्र ? कांहीं दिवस झाले तें घेऊन म्हणाव." ते दोघेच मागें राहिल्यावर लॉरी म्हणाले.

" बरं, मी देईन तें पत्र. इथूनच निघणार का तुम्ही आज ?"

" होय, इथूनच, रात्रीं आठला."

" ठीक तर, मी येतोंच त्या वेळपर्यंत परत."

अतिशय अस्वस्थ मनानें, स्वतःवर कांहींसा चिडून डार्ने मग तिथून बाहेर पडला आणि टेंपलबारमधें जाऊन त्यानें तें पत्र उघडलें.

ॲबेचा तुरुग, पॅरीस.
जून २१ सन १७९२.

मसिअर, पण माजी मॉस्यूर द मार्किस,

आपला वाडा भस्मसात झाल्यानतर पुष्कळ दिवस मी घरींच होतों — कसा तें एक माझं मलाच माहीत पण अखेरीस खूप मारपीट करीत 'नि पायीं रखडवीत मला इथे आणून डांबल आहे माझ घर तर कधींच जमीनदोस्त झाल आहे. आणि माझा अपराध काय, तर मी लोकसत्तेचा द्रोह केला, एका परागदा उमरावाचा मी नोकर होतों, त्याच्या हुकुमाची मी तामिली करीत होतों. मी त्यांच्या कानींकपाळीं ओरडून सांगितल कीं आपल्या सांगण्यावरून मी त्यांचच बर केल आहे, त्यांचा साराहि मीच भरला, भाड वसूलीहि केली नाहीं कीं कोणावर खटला पण कधी भरला नाहीं पण त्यांचं उत्तर एकच, त्या परागंदा उमरावाचा मी नोकर, आणि तो उमराव आतां कुठें आहे ?

खरच मालक ! कुठे आहे तो परागदा उमराव ? झोपेंतसुद्धां मी तोच प्रश्न विचारतों. परमेश्वर नाही का त्याला माझ्या मुक्ततेसाठीं इकडे पाठवणार ? मालक ! माझी ही दीनवाणी हांक आपल्या कानांवर नाहीं-का कुणी घालणार ? आपण नाहीं का माझ्यासाठीं धाऊन येणार ? मृत्यू क्षणाक्षणांनीं मला भेडसावीत माझ्याजवळ येतो आहे. मी नेकजात राहिलों हाच माझा अपराध. तोच नेक-जातपणा आपण नाहीं का दाखवणार ? परमेश्वराच्या नांवासाठीं, कर्तव्य पालना-साठीं, घराण्याच्या नांवासाठी, न्यायनीतीची चाड बाळगून, आपण नाहीं का मला या यातनांतून मुक्त करणार ? अधिक काय लिहू !— आपला,

दुर्दैवी गॅबेल.

गेले कांहीं दिवस डार्नेच्या मनांत आधींच धुमसत असलेला तो अस्वस्थ-पणा त्या पत्राच्या वाचनानें आतां चांगलाच प्रज्वलित झाला. त्या जुन्या इमानी वृद्ध नोकरावरील तें त्याच्या नेकजातीनें उत्पन्न झालेलें प्राणसंकट, भुतासारखें त्याला आतां सारखें भेडसावीत होतें, आणि आपल्याच कमकुवतपणामुळें तो बिचारा हकनाक मृत्युमुखीं पडणार, हा विचार तर त्याला तोंड वर काढू देत नव्हता.

स्वत.च्या चुलत्याविषयीं त्याला वाटत असलेला तीव्र तिरस्कार, गोरगरी-बांच्या गांजणुकीमुळें ख्यातनाम झालेल्या आपल्या कुटुंबाविषयीं त्याला वाटत असलेली चीड, आणि त्याच कुळाचा तो कुजका नि रक्तलांछित गौरव राख-ण्याची त्याच्यावर येत असणारी जबाबदारी, या सर्‍यांचा वीट येऊनच त्यानें त्या कुळाचें बदनाम सोडून देऊन आणि त्या इस्टेटीला लाथ मारून फ्रान्सची मायभूमी घाईघाईनें सोडली होती. पण त्याच्या त्या विटलेल्या मन स्थितीमुळें त्याचा तो त्याग अपुरा राहिला होता. आपल्या इस्टेटीचा वारसा जाहीररीतीनें सोडून देऊन ती मालमत्ता त्यानें लोककल्याणासाठीं लोकनायकांच्या हातीं अजूनपर्यंत केली नव्हती. आपल्या त्यागाला असें पूर्ण स्वरूप देण्याचा विचार त्याच्या मनांत असंख्य वेळां येऊन गेला होता, पण तो अजूनहि सत्यसृष्टींत उतरला नव्हता हेंहि तितकेंच खरें होतें लंडनमधील ल्यूसीच्या संगतींतील त्याचा तो सुखी संसार नि नेहमीं कार्यमग्न असलेलं त्याचं वैयक्तिक जीवन यानींच ती गोष्ट अजूनपर्यंत, मॉस्यूरचा खून होऊन, इस्टेटीचा वारसा त्याच्या-कडे येऊन इतकीं वर्षे लोटलीं तरीही, त्याच्या हातून घडलेली नव्हती नि कसलच कायदेशीर स्वरूप त्याला अजून दिलं गेलं नव्हतं.

आणि त्यानंतर क्रांतीचा तो पहिला भीषण सिंहनाद झाल्यावर तर, अशा कांहीं विलक्षण वेगवान गतीनें त्याच्या मायदेशांतील स्थिति पालटत गेली कीं, या बदलत्या गोंधळलेल्या अराजक अवस्थेंत काय नि कसें करावें हेंच त्याला कळत नव्हतें. कांहीं तरी करून मनांतील विचारांना मूर्त स्वरूप देण्याची क्रिया जरी त्या बदलत्या परिस्थितीमुळें त्याच्या हातून घडत नव्हती, तरी ते विचार त्याला रोज बेचैन करण्यास मात्र चुकत नसत. अनुकूल कालाची तो वाट पहात बसला होता, पण तोच अनुकूल काल त्याच्या हातांतून हळूच निसटूनहि जात होता हेंहि त्याला स्पष्ट दिसत होतें. फ्रान्समधील उमरावांचा सारा वर्ग,

आपली मालमत्ता अराजक क्रांतिदूतांच्या हातांत विध्वंसनासाठीं तशीच टाकून देऊन, प्राणभयानें सैरा वैरा पळत सुटलेला त्याला दिसत होता, त्यांच नांव स्मृतिशेष होण्याच्या मार्गाला लागलं होत आणि त्याबद्दल त्याला वाईटहि वाटत नव्हतं. पण हा सारा अकरणरूप त्याग होता हें मात्र त्याला अजून स्पष्ट उमजल नव्हत. उलट त्याच मन त्याला असच नेहमीं सांगत आल होत कीं, तू कांहीं कुणाचा छळ केलास नाहीं, तू कांहीं कुणाला तुरुगांत डांबून ठेवल नाहींस कीं आपल्या विलासतृप्तीसाठीं कुणाच्या सौंदर्य नि यौवनपूर्ण आयाबहिणींवर हात टाकला नाहींस, उलट तू लोकांना कराची सूट दिलीस, स्वत च्या मालकी जगलांतून लांकूड फांटा त्यांना मोफत नेऊं दिलास आणि त्या पातकी इस्टेटींतील एका तनसडीसहि न शिवतां, स्वत.च्या उपजीविकेसाठीं निढळाचा घाम गाळण्यास त्या इस्टेटीवर लाथ मारून इकडे दूर देशीं निघून आलास. आणि तुझ्याच लेखी सूचनांबरहुकूम गॅबेलेनेंहि गांवचा कारभार, लोकांच्या शक्य त्या सुखसोई पहात आजपर्यंत हांकला नाहीं काय? त्याचें आशावादी मन त्याला नेहमीं विचारी. तोच आशादायी विचार, आज तो असा अतिशय अस्वस्थ होऊन गेला असतां, त्याच्या मनांत जोरानें उत्पन्न न होणें अशक्यच होतं. आणि हाच विचार, पॅरिसला निघून जाण्याच्या त्याच्या मनांत उत्पन्न होत असलेल्या कल्पनेला आतां मूर्तस्वरूप आणू पहात होता नि तो पॅरिसकडे ओढला जात होता.

होय, सर्व सजीव निर्जीव सृष्टीचें आपल्या लहरीप्रमाणें नियमन करणारी ती सर्वसमर्थ अदृष्ट नियति, त्याला पॅरिसकडेच ओढीत होती, आणि त्याला तिकडे जाण भाग होत मनांत उत्पन्न होत असलेला प्रत्येक विचारतरग त्याला त्या एकाच दिशेनें वाहून नेत होता आणि तोहि अगतिकपणें त्या तरगांवर वहात जात होता. त्याचबरोबर त्याच्या मनांत असाहि विचार उत्पन्न होत असे कीं, त्याच्या मायदेशभर उठलेल्या क्रांतीच्या त्या उत्तुग प्रभावी लाटेचें नेतृत्व भलत्याच माणसांकडे गेल्याकारणानें, क्रांतीचें स्वरूप केवळ सूड द्वेषांच्या हीन भावनांनीं विकृत होत होतें; आणि त्याच्यासारखीं समजस कार्यवादी माणसं जर त्या दुर्दैवी देशाला लाभतील, तर मानव्याच्या नि दयेच्या उदात्त भूमिकेवर उभ राहून, त्याच्या मायदेशांत प्रातीदिवशी पडत असलेला तो रक्ताचा भीषण सडा थांबवण सहज साध्य आहे. आणि हा विचार तर त्याच मन.स्वास्थ्य पार

बिघडवून टाकी नि कर्तव्य पराङ्मुखतेची जाणीव त्याला सारखी टोंचत राही. साहजिकच मग, प्राणै कठगतैरपि कर्तव्यमेव कर्तव्यं, या धीर गंभीर वृत्तीनें अराजक फ्रान्समध्यें उतारवयांत हि पाऊल टाकण्यासाठीं सरसावलेल्या लॉरींची मूर्ती, त्याच्या डोळ्यांपुढें उभी राही नि त्याच मन अभावितपणें त्याची निंदा करी. याच विचाराच्या पाठोपाठ कांहीं काळापूर्वी त्या खुशालचेंडूनीं न जाणतां त्याला केलेलें गालिप्रदान नि भीरुत्वाचा आरोप तर त्याच्या मर्मस्थानालाच जाऊन भिडली होतीं. नामर्दाईच्या त्या अहेरा मागोमाग निरपराधी गॅबेलचें पत्र येऊन ठेपलें होतें, त्या एकनिष्ठ दुर्दैवी सेवकानें त्याला, कर्तव्याच्या, न्यायाच्या, घराण्याच्या प्रतिष्ठेच्या नि परमेश्वराच्या नांवानें कळवळून आवाहन केलें होतें. आणि आतां टॅपलबारमध्यें अस्वस्थपणें तो फेऱ्या मारीत असतां त्याच मन विचारीत होत, " काय ठरवलस चार्लस ? "

स्वाभिमानी चार्लसनें धीरोद्धतपणें एकच उत्तर दिलें, पॅरिसला त्यानें गेलच पाहिजे — चार्लसचा निश्चय ठरला.

होय, त्याचा निश्चय ठरला ती अटळ नियति त्याला पॅरिसकडे खेचीत होती. त्याचा रस्ता त्याला स्पष्ट, नि निर्भय दिसत होता. कोणतेच खांच खळगे आपल्या वाटेंत त्याला दिसत नव्हते, एकच आशादायी विचार त्याला आश्वासित होता. आपल्या देशबांधवांच्या कळवळ्यानें आपण कांहीं तरी केल आहे; मग तें कितीहि अपुर असो. आणि आपण आपल्या मायदेशांत पाऊल टाकल, कीं जरूर तर आपल्या त्यागाची जाणीव आपल्या त्या चुकलेल्या देशबांधवांना देऊन, आपले विचार त्यांना आपल्याला पटविता येतील आणि मग आपलं पुढलं कार्य सुलभ आहे

लोक कल्याणाच्या अनेक सुखद कल्पना त्याच्या डोळ्यापुढें आतां उभ्या रहात होत्या. अशा कितीतरी दयाशिल पण भावड्या सज्जनांना, सुखस्वप्नांच्या या मृगजळानें, आतांपर्यंत आपल्या मागें नाचविलं असेल तेंच मोहक मृगजळ, लोककल्याणाच्या एकाच इच्छेनें भारावलेल्या चार्लसला, आपल्या मागून ओढीत पॅरिसच्या रस्त्याला नेत होत, नि क्रांतीच्या त्या पिसाट पाईकांचं नेतृत्व स्वीकारून वनाच उपवन करण्याची मोहक कल्पना त्याला लंडनबाहेर खेचीत होती.

* * *

लंडनच्या नेहमींच अस्थिर चंचल असणाऱ्या हवामानानें आतां कुद्र उदास स्वरूप धारण केलें होतें. वर नीलाकाशांत असख्य पांढरीं काळीं अभ्रखंडें, दाटीदाटीनें गोळा होऊन त्या कृष्णपक्षांतील काळया रात्रीला अधिकच भीषण बनवीत होतीं. आणि बाहेरील त्या उदास, नीरव, कुद्र वातावरणांत् तितक्याच जड अत करणानें पण कर्तव्यकठोर निश्चयानें, डोव्हरच्या दिशेनें घरांत कोणा-लाहि न सांगतां कीं कोणाचाहि निरोप न घेतां, केवळ दोन पत्रें मागें ठेऊन, चार्लम डार्ने आपला घोडा भरधांव फेंकीत आतां चालला होता. त्याच्या लाडक्या पत्नीची नि लहानग्या ल्यूसीची प्रेमळ मूर्ता आणि डॉक्टरांची ती धीरगभीर वत्सल मूर्ता, त्याच्या पाणावलेल्या डोळयांसमोर एकसारखी उभी रहात होती. पण त्या पतितपावन परमेश्वराच्या नांवानें, न्यायनीतीच्या नांवानें आणि घराण्याच्या इभ्रतीच्या नांवानें त्या दुर्दैवी गॅबेलनें त्याला तळमळून मार-लेली हाक, त्याच्या कोमल हृदयाला कठोर करून डोव्हरच्या दिशेनें घेऊन जात होती. आणि त्या साऱ्या अथांग विश्वपसाऱ्यांत जीवित सर्वस्व असलेल्या त्याच्या प्रेमविषयाना मागें टाकून, अटळ नियतीच्या जोरदार प्रवाहाबरोबर चार्लस डार्नेहि आतां क्रांतीच्या त्या आवर्त बिंदूकडे वेगानें वहात चालला होता.

# वादळाचा प्रवास

.... १ ....

हिंवाळ्यांतील मंदतेज सूर्य नारायण, त्याच्या प्रवासमार्गावर गर्दी करून त्याची गति कुंठित करण्याचा प्रयत्न करीत असणाऱ्या सान थोर असंख्य अभ्रखंडांतून आपली वाट मोठ्या कष्टानें काढीत, प्रवास मार्ग आक्रमित होता. पॅरिसच्या रोखानें निघालेला चार्लस डार्नेहि, तसाच अराजक अदाधुंद फ्रान्सच्या अस्ताव्यस्त रस्त्यांतून, त्या हंगामी सत्तेच्या हंगामी देशभक्त अमलदाराच्या नि देशबंधूच्या रोखलेल्या बंदुकांच्या ओळींतून नि उर्मट प्रश्नांच्या सरबत्तींतून कशीबशी वाट काढीत, पावलो पावलीं अडथळे होत आपला मार्ग आक्रमित होता प्रत्येक गांवाच्या नि टोलनाक्याच्या आसपास सदैव जागरूकपणें जागत्या हत्याराप्रात्यारासमवेत धुंद होऊन हिंडत असलेल्या, नि स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या उगवत्या लोकराज्याच्या ब्रीदवाक्यांच्या घोषणा वेळीं अवेळीं गर्जत असलेल्या क्रांति दूतांच्या बदलत्या लहरींना तोंड देत, डार्नेचा प्रवास चालू होता फ्रान्सच्या किनाऱ्यावर पाय टाकून पॅरिसच्या रस्त्यानें कांहीं अंतर गेल्याबरोबरच त्याला कळून चुकलं कीं, पॅरिसमध्यें पोंचून देशभक्ताचा शिक्का त्याच्या डोक्यावर उठल्याशिवाय आल्या रस्त्यानें परत मागें जाणं आतां आपल्याला अशक्य आहे. आणि आतां कांहींहि झालं तरी प्रवासाचं अखेरचं टोंक हें गाठलंच पाहिजे. मागे जात असलेलं प्रत्येक बारीक सारीक खेडं, म्हणजे त्याच्या परत फिरण्याच्या मार्गावरील बंद होत असलेल्या दारांचे लोखंडी अडसरच होते. एकेक नवी शृंखलाच जशी त्याच्या आगाभोंवती गुंडाळली जात होती, आणि आपलं स्वातंत्र्य पावलोंपावलीं कमी कमी होत असून या नवीन लोकराज्याचे संपूर्ण बंदिवान म्हणूनच आपला प्रवास आतां संपावयाचा आहे, याबद्दल त्याची पूर्ण खात्री पटत होती. लंडनचा रस्ता त्याला आता कायमचाच बंद झाला होता, नि म्हणूनच मागें परत जाण्याची आशाहि आतां त्याला सोडून गेली होती.

लंडन सोडून त्याला बरेच दिवस झाले होते तरीहि पॅरिस नगरीच्या परिसराच्या आसपाससुद्धा तो अजून येऊन पोंचला नव्हता. प्रवासाचा गांठलेला प्रत्येक टप्पा आपल्या कायमचा पदरांत पडला असा अनुभव त्याला मुळीं येतच नव्हता. आपआपल्या गांवसीमेजवळ किंवा त्याच्याहि पलीकडे अनिर्बंध नि सर्व सत्ताकपणें भटकणाऱ्या लोकराज्याच्या पाईकांच्या टोळ्या, आपल्याला परत मागें खेंचून केव्हां नि किती वेळा नेतील, याचाहि कांहीं नियम नसल्याचें त्यानें अनुभविलें होतें. आणि मसिअर गॅबेलचें ॲबेचया तुरुगांतून लिहिलेलें पत्र जर त्याच्या जवळ नसतें तर चार्लस डानें पॅरिसला कधींच जाऊन पोंचला नसता. त्या एका पत्राच्या जोरावरच डार्ने मदगतीनें' का होईना पण पॅरिसच्या दिशेनें प्रगतच होत होता. त्याच्या प्रवासी वैभवातहि, त्या नवीन लोकराज्याच्या लहरी इच्छेनें, पण त्याच्याच खिशाला चाट लावीत आतां भर पडली होती; आणि मागें पुढे चालणाऱ्या सहा घोडेस्वार देशभक्तांच्या जागरूक देखरेखीखालीं त्याचा प्रवाम चालू झाला होता. आणि खऱ्याखुऱ्या मद्यपानानें आणि सत्तेच्या उन्मादानें बेहोष झालेल्या त्या देशभक्त सैनिकांच्या अचकट विचकट भाषणांचा आस्वादहि डार्नेला सर्व प्रवासभर मिळत होता या सर्वांचा त्याला जरी त्रास होत होता तरीहि आपलें जीवित या पिसाटांच्या सानिध्यांतहि धोक्यांत आहे असें मात्र त्याला वाटत नव्हतें आणि तिकडे पॅरिसमध्यें पोंचल्यानतरहि आपला इन्साफ आपल्या व्यक्तिगत गुणदोषांवरच अवलंबून राहील, असं त्याच आशावादी मन त्याला अजूनहि सांगत होत.

पण बोव्हे गांवाच्या हद्दींत त्यानीं सूर्यास्ताच्या सुमारास पाऊल टाकलें आणि त्यांच्या स्वागतासाठी गोळा झालेल्या ज्वलत् जहाल क्रांतिदूतांच्या पिसाट आकृती जेव्हां त्यांच्याभोंवतीं गोळा झाल्या, तेव्हां त्यांचें तें उग्ररूप पाहून मात्र चार्लसच्या मनांत त्याच्या पुढें वाढून ठेवलेल्या ताटाची सुस्पष्ट कल्पना मूर्तिमत उभी राहिली आणि पोस्टापुढील जागेंत येऊन त्याचा घोडा उभा रहातांच तो खालीं उतरत असतां, लोकाची एकमुखानें ठोकलेली, "परागंदा देशद्रोह्यांचा नायनाट होवो!" ही आरोळी ऐकून आपलें घोड्यावरील आसन तसेंच स्थिर करून तो म्हणाला—

"दोस्तहो, मी परागदा! स्वेच्छेनेंच नाहीं का मी हा परत फ्रान्समधें आलों?"

"तू देशद्रोही आहेस," हातांतील घण परजित एक लोहार आवेशानें ओरडला, "आणि तू त्या नादान ढेरपोट्या शेटजीभटजींच्याच जातींतला आहेस !"

"असू द्या, असू द्या लोहार दादा, पॅरिसमध्यें होईल त्याचा न्यायनिवाडा," त्याचा हात धरून त्याला मागें ओढीत पोस्टमास्तर म्हणाले.

"न्याय !" हातांतील घण पुन्हां एकदां सरसावून लोहार ओरडला. "हां, हा ! एकदम शिरच्छेद" आणि त्याच्या सोबत्यांनीहि मोठ्यानें ओरडून त्याला आपली समति दिली.

"दोस्तहो, तुमची चुकभुल होत आहे; मी देशद्रोही नाहीं" त्या ओरड-ण्याचा आवाज थोडा कमी होतांच डार्ने म्हणाला

"झूट, एकदम झूट !" लोहार पुन्हा गर्जला. "नवीन कायद्याप्रमाणें तूं देशद्रोहीच आहेस आणि तुझा जीव आतां लोकांच्याच मालकीचा आहे !"

त्याचवेळीं पण ते पोस्टमास्तर पुढें होऊन त्यानीं डार्नेच्या घोड्याची लगाम धरून त्याला आतील आवारांत नेलें, आणि त्याच्या बरोबरीला ते सहा पहारे-करीहि आंत येतांच त्यानीं आवाराचें लोखडी दार घाईघाईनें लाऊन टाकलें. न हींतर नवीन कायद्यानें लोकाच्या मालकीचा झालेला त्या परागदा उमरावाचा तो जीव, आणखी पांच दहा मिनिटातच अक्षरश खराच त्याच्या खास माल-कीचा झाला असता ! दार बद होतांच लोहारदादांनीं आपला घण एकदा जोरानें त्या लोखडी दारावर आदळला. पण त्यांनीं किंवा लोकांनींहि अधिक कांहीं हालचाल मात्र केली नाहीं. चार्लसचें नशीब अजून तरी जोरावर होतें

मध्यरात्र होईपर्यंत थोडासा विसांवा घेऊन झाल्यावर नि सारा गांव गाढझोंपेंत मग्न झाल्यानतर डार्नेचा प्रवास परत सुरू झाला. वरून बारीक पावसाची थडगार झिमझिम चालूच होती. आणि वाटेंतील प्रत्येक लहानमोठ्या खेड्यांत देशभक्तांच्या मस्त टोळ्यांचें उन्मत्त स्वागत नि प्रश्नांची सरबत्तीहि, वरील पावसाच्या बुरबुरीप्रमाणें सर्वरात्रभर त्याची साथ करीत होती. अरा-जकतेची मुक्तकंठ साक्ष देणारे — जाळले पोळलेले किंवा मोडून तोडून पार उध्वस्त केलेले असख्य घरांचे अवशेष त्याला वारंवार सामोरे येत होते, आणि प्रवास मार्गाच्या आसमंतांत विखुरलेल्या सृष्टिदेवतेचें भकास स्वरूप, मधूनच त्याच्या दृष्टीस पडून त्याच्या मनाची उदासीनता आतां वाढवीत होतें.

अखेरीस सूर्योदयाच्या सुमारास पॅरिसच्या प्रवेशद्वाराजवळ ते येऊन पोंचले. प्रवेशद्वाराचीं दारें अजून बंदच होतीं. पण हे सर्व घोडेस्वार तेथें येऊन पोंचतांच, "या कैद्याचे कागद पत्र कुठे आहेत ?" असा कठोर अधिकारयुक्त आवाजांत कोणीतरी प्रश्न केला.

त्या शब्द प्रयोगानें चमकून चार्लसनें त्या प्रश्न करणाऱ्या व्यक्तीला नम्रपणें सांगितलें कीं, आपण कांहीं कुणाचे कैदी नाहीं नि एक स्वतंत्र फ्रेंच नागरिक म्हणूनच आपण येथें आलों आहों.

पण त्या प्रश्न करणाऱ्या व्यक्तीकडून त्याच ताठर आवाजांत परत तोच प्रश्न केला गेला "या कैद्याचे कागदपत्र कुठें आहेत ?"

डार्नेबरोबर असलेल्या त्या पानमत्त देशभक्तानें लटपटत्या हातानें आपल्या टोपींतून कांहीं कागद काढून त्या अधिकारी व्यक्तीसमोर केले. पण गॅबेलच्या पत्रावर दृष्टी जातांच त्या अधिकाऱ्याचे डोळे आश्चर्यानें एकदम विस्फारले नि वर मान करून त्यानें डार्नेच्या चेहेऱ्याचें एकदां सूक्ष्म निरीक्षण केलें आणि तो आतील खोलींत गेला.

डार्नेनें आपल्या सभोंवार दृष्टि टाकली एक भली मोठी लष्करी शिपाई नि देशभक्तांची तुकडी त्या प्रवेशद्वाराचें रक्षण करीत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. आणि त्यांच्याकडे पहातांच साऱ्यांच्याच चेहेऱ्यावर ती बेपर्वाईची छटाहि बेछूटपणें वावरत असलेली त्याच्या नजरेस आलें. त्याच्याच सारखे कितीतरी लोक त्या प्रवेशद्वाराच्या आंत बाहेर गर्दी करून तिथें उभे होते; आणि आंत येणारांपेक्षां बाहेर जाणारांची तपासणी अधिक कसोशीनें होत असल्याचेंहि त्यानें पाहिलें. आंत बाहेर जाण्यायेण्यास होणाऱ्या विलंबाच्या जाणीवेनें कांहींजणानीं खालीं बैठक मारून धूम्रपान सुरू केलें होतें तर कांहींजण बसल्याजागींच मुरकुंडी मारून प्रभातनिद्रेची मजा लुटीत होते पण सगळीकडेच स्त्रीपुरुषांच्या डोक्यावरील टोप्यांत नि लष्करी शिपायांच्या टोप्यांतील फितीवर एकच एक लाल रंगाचें अधिराज्य पसरलेलें मात्र त्याला दिसत होतें.

अर्ध्या तासाच्या या निरीक्षण कार्यक्रमानंतर आंतील खोलींत अदृश्य झालेली ती अधिकारी व्यक्ती डार्नेसमोर येऊन परत दाखल झाली. ते लोखंडी प्रवेशद्वार खुलें झालें, डार्ने पायउतार झाला, आणि त्याच्या बरोबरील पहारेकऱ्यांच्या

हातांत कैदी सुरक्षित पोंचल्याची पावती पडून आपल्या घोड्यांची तोंडे मागें फिरवून ते पहारेकरी आंत प्रवेश न करतांच परत चालू झाले आणि डार्नेहि त्या व्यक्तीच्या मागोमाग आंतील खोलींत प्रविष्ट झाला.

आंत खोलींत मद जळत असलेल्या दिव्यांचा, तबाखूचा नि गावठी दारूचा ऊग्र ओंगळ दर्प जसा काहीं दुथडी भरून वहात होता खालीं जमिनीवर, कांहीं गाढ झोंपेंत तर कांहीं अर्धवट झोंपेंत नि कांहीं ताडीमाडीच्या धुंद बेहोष अवस्थेंत कांहीं तरी बरळत अस्ताव्यस्त पसरलेले किंवा झोकांड्या देत उभे असलेले असे काहीं लष्करी शिपाई नि देशभक्त तिथे दिसत होते त्या मदतेज तेल्या दिव्यांचा नि उगवत्या दिवसाचा अभ्राच्छादित प्रकाश खोलीभर सरमिसळ पसरला होता. एका टेबलावर दोन तीन लठ्ठ रजिस्टर्स उघडीं पडलीं होतीं आणि एक ओबड धोबड पण उदासवाण्या चेहेऱ्या मोहोऱ्याचा असा अधिकारी अध्यक्षस्थानीं विराजमान झाला होता.

"मिटिझन डेफार्ज, हाच काय तो परागदा एव्हर मॉड ?" एक कागद पुढें घेत त्या अधिकाऱ्यानें चार्लस बरोबरील व्यक्तीला विचारलें.

"होय, हाच तो"

"तुझं वय, एव्हर मॉड ?"

"सदतीस"

"विवाहित ?"

"होय."

"कुठे ?"

"इंग्लंडांत"

"अर्थात, अर्थात. तुझी पत्नी एव्हर मॉड ?"

"इंग्लंडांत"

"बरोबर, बरोबर ला फोर्सच्या तुरुंगांत केली आहे तुझी रवानगी."

"देवाची मर्जी !" डार्ने उद्गारला "पण कोणत्या कायद्याखालीं नि कोणत्या अपराधासाठी ?"

"आता कायदेकानु आणि अपराधाच्या याद्याहि पालटल्या आहेत, एव्हर मॉड." हातांतील कागदावरून एक क्षणभर दृष्टी काढून नि कठोर हास्य करीत, तो म्हणाला.

" असूं द्या. पण मेहेरबानी करून एक गोष्ट लक्षांत ठेवा कीं मी आपखुशीनें नि एका देशबधूच्या पत्रावरून इथे परत आलों आहे. तें पत्र आपल्या समोर आहेच. तरी मला त्याची ताबडतोब भेट घेऊ द्या, एवढीच माझी मागणी आहे. इतका तरी हक्क मला आहे कीं, नाहीं ?"

" परागदा लोकांना कांहींहि हक्क नसतात, एव्हरमॉड," ताठरपणें उत्तर आलें. आणि हातांतील कागदावरील त्याचें लिखाण संपल्यानतर त्यानें तें एक-वार आपल्याशींच वाचून पाहून नि त्यावर वाळू टाकून तें डेफार्जच्या हवाली केलें आणि त्याच्याकडे पहात तो म्हणाला, " खास तैनात !"

डेफार्जनें आपल्या मागुन येण्यास डार्नेला खुणावलें आणि दोन हत्यारबंद क्रांतिदूतांच्या पहाऱ्यांत डार्ने खोली बाहेर पडला.

" आतां कायमच्याच जमीनदोस्त झालेल्या बॅस्टिलची हवा खल्लेल्या डॉक्टर मॅनेटच्या मुलीशीं तुम्हींच लग्न केल आहे, नव्हे ?" ते बाहेर रस्त्याला लागल्या नतर बरोबरच्या दुसऱ्या हत्यारबद शिपायांना ऐकू जाऊ नये म्हणून हळू आवाजांत डेफार्जनें प्रश्न केला

" होय." त्याच्याकडे आश्चर्यानें पहात डार्ने म्हणाला.

" माझ नांव डेफार्ज, सेंट ॲटॉईनमधें एक दारू दुकान आहे माझें तुम्हीं ऐकल असेल माझ नांव कदाचित "

" होय ! आपल्या वडीलांना नेण्यासाठीं तुमच्याच घरीं माझी पत्नी आली होती मला वाटत, नाहीं ?"

त्या पत्नी या शब्दानें मॅडम डेफार्जची डेफार्जला एकदम आठवण झाली आणि विमनस्कपणें तो म्हणाला, " त्या 'ला गिलोटीन' या नवीनच जन्मास आलेल्या सैतानी बाळाच्या नांवानें मी विचारतों कीं, तुम्ही फ्रान्समधें कशाला आलांत ?"

" एक दोन मिनिटांपूर्वींच मी सांगितल कीं कारण तें. तुम्हांला नाहीं खर वाटत तें ?"

" तुम्हांला मारक आहे पण तें," कपाळाला आंठया घालून नि समोर पहात डेफार्ज म्हणाला.

" मी तर गुगच झालों आहें अगदीं. कारण सारं जग जस उलट पालटं झाल आहे इथेंस दिसत. नि न्यायनीतीला कुठें वावच दिसत नाहीं आहे मला.

सर्व कांहीं संपल्यासारखच वाटत आहे मला. तरी पण तुम्ही करू शकाल का कांहीं मला मदत ?"

"काडीची सुद्धां नाहीं." त्याच्याकडे न पाहतां डेफार्जनें उत्तर केलें.

"एकाच प्रश्नाच निदान उत्तर तरी देऊ शकाल का मला ?"

"कदाचित ! तें त्या प्रश्नावर अवलंबून राहील."

"केवळ अन्यायानें ज्या तुरुगांत मी आतां डांबला जाणार आहें, त्याच्या बाहेरील जगाशीं मला कांहीं सबध ठेवतां येईल का ?"

"कळेल तुम्हाला लौकरच."

"आणि माझ म्हणण काय तें ऐकूनहि न घेतां नि कायद्याला धाब्यावर बसवून मला तसच कुजत ठेवणार काय ?"

"तेंहि कळेल तुम्हांला पण त्याचं काय ! असे असख्य जीव तुमच्या पूर्वी कुजत होते कीं "

"पण त्यात माझा कांहीं हात नव्हता, सिटिझन डेफार्ज ?"

डेफार्जने त्याच्याकडे एक नुसता रागाचा दृष्टिक्षेप केला, पण उत्तर मात्र कांहींच दिलें नाहीं आणि त्याच्या मौनभगाची आशा न दिसल्यामुळें डार्ने जरा वेळानें त्याला म्हणाला —

"टेलसन बॅंकेचे येथील प्रतिनिधी मि लॉरी, यांना मी ला फोर्सच्या तुरुगांत आहें एवढ तरी जरुर कळलच पाहिजे आहे माझ्यासाठीं आपण तेवढ कराल काय ?"

"तुमच्यासाठीं मी काहींहि करू शकत नाहीं;" डेफार्जचें ताठर उत्तर आलें. "माझा देश नि देशबाधव यांच्याच केवळ एक कर्तव्यानें मी बांधलेला आहें, आणि तें कर्तव्य तुमच्या सर्वस्वीं विरुद्ध आहे. मी तुमच्यासाठी काहीच करू इच्छित नाही."

त्याच्या चेहेऱ्या मोहोऱ्यावरून नि आवाजावरून आतां प्रश्न विचारण्यांत कांहींच अर्थ नाहीं हें डार्नेला कळून चुकलें आणि त्याचा स्वाभिमानहि आतां जागा झाला. त्यानेंहि मग मौनव्रत स्वीकारलें आणि त्यांचा पुढचा प्रवास मग चालू झाला. तुरुंगाच्या रस्त्यानें ते असे जात असतां त्याच्याकडे कोणीहि कुतूहलानें पहात नव्हतें. सदा कुतूहलप्रिय बालबच्चेसुद्धां त्याच्याकडे चुकूनहि दृष्टिक्षेप करीत नव्हते. इतका हा, असले कैदी तुरुंगाकडे सारखे जात अस-

ण्याचा देखावा सर्वांच्या परिचयाचा झालेला दिसत होता. नित्याच्या शांतपणें सभोंवार साऱ्यांचे व्यवहार चाललेले दिसत होते. चार्लसच्या पोशाकावरून त्याचें उच्च कुलीनत्व ओळखून, काय कुणाचे एक दोन कुत्सित शब्द उच्चारले जातील तेवढेच. बाकी कांही नाहीं. पण मध्येंच रस्त्यावरील एका नाक्यावर एक हंगामी मैदानवक्ते घसा खरडून राजेसाहेब नि त्यांचे कुटुंबीय यांच्या अपराधाची लांबलचक मालिका आपल्या देशभक्त श्रोत्यांच्या गळ्यांत घालीत होते. म्हणून तेथून जातांना कानांवर आलेल्या त्या चार शब्दांवरून राजा शृंखलाबद्ध आहे आणि परराष्ट्रांच्या एकूण एक प्रतिनिधींनीं आपआपल्या देशांत प्रयाण केलें आहे एवढे चार्लसला आज प्रथमच कळून आलें कारण फ्रान्सच्या किनाऱ्यावर पाऊल ठेवल्यापासून बातमी अशी आज तागायत त्याला कोणतीच कळली नव्हती. आणि या बातमीबरोबरच आपल्या सभोंवार संकटांची परंपरा सारखी वाढती आहे, आणि आपलें जीवित अधिकाधिक धोक्यांत पडत चाललें आहे याची त्याला पूर्ण जाणीव होत होती. संकटांचा जोर वाढत चालला आहे, आणि तो असाच वाढत आपल्या गळ्याभोंवतींची तांत कधीं आवळली जाईल याचा कांहींच नियम नाहीं, हेंहि त्याला कळून चुकलें होतें याची थोडी फार आधीं कल्पना येती तर आपण हा प्रवासाचा धोका पत्करला नसता असेंहि त्याच्या एकदां मनांत आलें. तरीहि भविष्यकाळाविषयीं भोळी आशा बाळगण्यासाठीं त्याचें वेडें मन त्याला सांगत होतें

पण भविष्याच्या पोटांत डोकाऊन कोणाला कधीं काहीं स्पष्ट दिसलें आहे? कालचक्राच्या एका चिमुकल्या हालचालीबरोबर असंख्य मानवी जीवाच्या रक्तानें ती पॅरिसची भूमी आता न्हाऊन निघणार होती, आणि क्रांति देवतेच्या त्या नवजात कराल अपत्याच्या — त्या ला गिलोटीनच्या गळ्यांत किती नर मुंडांची माला घातली जाणार होती, याची त्याला अजून कल्पना नव्हती. त्याची पूर्ण कल्पना त्या कराल कालीच्या भाविक भक्तांनाहि कदाचित् त्या घटकेला नसेल मग डार्नेसारख्या अनघवृत्ति शांत माणसाच्या कल्पनासृष्टींत तर ती कशी दिसायची?

आणि म्हणूनच तुरुंगांतील हालअपेक्षा, अन्याय्य तुरुंगवास आणि प्रियजनांचा दुःसह वियोग, यांचीच काय ती त्याला सुस्पष्ट कल्पना आली होती. पण या पलीकडे स्पष्टपणें तो कांहीच पाहूं शकत नव्हता. आणि याच उदास विचारांच्या तंद्रींत त्याचें पाऊल ला फोर्स तुरुंगाच्या भयाण आवारांत पडलें.

एका गलेलठ्ठ प्राण्यानें तें भक्कम लोखंडी प्रवेशद्वार उघडून डार्नेला आंत घेऊन त्याची पावती दिल्याबरोबर डेफार्ज व ते शिपाई मागें वळून चालते झाले

"परागंदा एव्हरमॉड ! ह हं ! आणखी किती आता ? आपल तर पोट फुटणार आतां बहुतेक आणि हें काय ? खास तैनात, वा वा !" हातातील कागदांवर दृष्टि टाकल्यावर जेलरसाहेब उद्गारले आणि एका तारेला तो कागद लाऊन नि कपाळाला आठ्या घालून कांहीं वेळ ते कांहींहि न बोलतां तसेच फेऱ्या मारीत राहिले

अखेरीस अर्ध्यातासाच्या श्रमतीनतर साहेबानीं आपल्या किल्ल्या हातांत घेतल्या आणि "ह, चला एव्हरमॉड !" म्हणून ते उद्गारले

तुरुगाच्या त्या अधाऱ्या, कुबट, दुर्गंधी वातावरणांतून जिन्यांची चढउतार करीत नि दारांची उघड झांक करीत ते एका मोठ्या पण बसक्या बांधणीच्या खोलींत येऊन पोंचले. अनेक स्त्रीपुरुष बदीवानांची तिथें आंत गर्दी दिसत होती. एका लांबलचक टेबलाजवळ बसून त्या बदीवान स्त्रिया, वाचीत लिहीत विणीत किंवा कांहींतरी शिवीत बसल्या होत्या, आणि पुरुष बहुतेक त्यांच्या खुर्च्यांच्या मागे स्वस्थपणें उभे राहिलेले किंवा फेऱ्या मारीत असलेले असे दिसत होते

कैदी म्हटला की हरएक प्रकारच्या दुष्कृत्यांची नामावली डोळ्यांसमोर उभी करण्याची सामान्यपणें सवय असलेला डार्ने, तो बंदीजनांचा समुदाय आपल्यासमोर उभा असलेला पाहून एक क्षणभर दचकला पण दुसऱ्याच क्षणीं त्या सर्वांनां, उत्थापन करून आदरपूर्वक त्याचें स्वागत केलेलें पाहून नि त्या स्वागताच्या पद्धतींत अभिजात खानदानी डौल मिरवत असलेला पाहून, तर त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना तरीहि त्या कुबट वातावरणांतील भेसूर उदासपणा त्या खानदानी चेहेऱ्यांवर नि त्याच्या एकदर हालचालींवर भकासपणें पसरलेला त्याला दिसलाच आणि आपण अकालमृत अतृप्त जीवांच्या समुदायांतच आतां उभे आहोंत असें त्याला वाटलें एथून तेथून सारा पिशाचांचा मेळावा ! मोहक सौंदर्य, उमदी भव्याकृती, सहज सुदर गतिविलास, अभिमान, बुद्धिवैभव, तारुण्य नि वार्धक्य या सर्वांची तीं अकाल पिशाचें, जणुं काय मृत्युलोकाच्या त्या भयाण ऐलथडीवर शेवटच्या क्षणाची वाट पहात शांतपणें उभीं होतीं. तुरुगाच्या त्या चार भिंतींच्या आंत तो येतांच जीवन्मृत बनलेले ते सर्व बदी त्याच्याकडे आतां पहात होते.

कांहींहि हालचाल न करतां भयानें स्तिमित होऊन त्यांच्याकडे पहात तो स्तब्धपणें उभा होता. तुरुंगाधिकारीहि त्याच्या बाजूला कांहीं वेळ स्वस्थ उभे होते. किती भेसूर विरोध ! मुसमुसलेलें तारुण्य, मुग्धमोहक सौंदर्य नि खानदानी डामडौल यांच्यासमोर, ओबडधोबड शरीराकृतीचा क्रूर चेहेऱ्या मोहोऱ्याचा समाजाच्या खालच्या थरांतील तो ओंगळवाणा तुरुंगाधिकारी, विरोधानें जसा अगदीं उठून दिसत होता. पिशाचांचा मेळावा — खराखुरा पिशाचांचा मेळावा !

" या माझ्या समदुःखी सहकाऱ्यांच्या वतीनें ला फोर्सच्या या तुरुंगांत मी आपलें स्वागत करतों ! " त्या खानदानी कैद्यांच्या मेळाव्यांतून मोठ्या डौलानें पुढें येत एक भव्य आकृती उद्गारली " आणि आपल्या दुर्दैवानें आपल्यावर आणलेल्या या विपत्तींत आम्हीहि आपले भागीदार आहों, असें नम्रपणें सुचवितों. परमेश्वर कृपेनें आपण यांतून लौकरच मुक्त व्हा ! आपलं नांव विचारणं उद्धटपणाचं नाहीं ना दिसणार ? "

डार्ने आपल्या विचारतंद्रीतून जागा झाला आणि त्यानेंहि मग नम्रपणें आपली सर्व माहिती त्यांना पुरवली

" पण आपण खास तैनातीखालीं नाहीं ना ?" जेलरकडे पहात त्या भव्या कृतीनें विचारलें.

"तो शब्दप्रयोग मी ऐकला आहे, पण मला त्याचा कांहीं बोध नाहीं झाला "

" अरेरे ! पण कांहीं हरकत नाहीं, धीर धरा आपण. आमच्यापैकीं कांहीं-जणांनी, तोहि अनुभव घेतला आहे. कांहीं फार दिवस नाहीं टिकणार तो. " आणि मग आपला आवाज उचाऊन तो म्हणाला, " मला सांगायला वाईट वाटतं मंडळी — खास तैनात ! "

सहानुभूतीचे अनेक सुसकारे चार्लसला ऐकू आले आणि मग जेलरच्या मागून तो त्या गजांच्या बंद दाराकडे जात असतां किती तरी स्त्रीपुरुषांनी — विशेषत. स्त्रियांनी त्याला आतिशय कळवळून सहानुभूतीपूर्वक धीर दिला. दाराजवळ पोंचतांच एकदां मागें वळून त्यानेंहि सर्वांना नम्रपणें अभिवादन करून त्यांचे आभार मानले, दार बंद झालें आणि ते असंख्य जीवन्मृतांचे चेहेरे त्याच्या मग कायमचे दृष्टीआड झाले.

दाराच्या आंतील दगडी जिन्याच्या ते पायऱ्या चढत वर जात होते. चाळीस पन्नास पायऱ्या चढल्यावर जेलरनें एक अरुंद ठेंगण काळंकुट्ट दार उघडलें आणि ते त्या एकांत कोठडींत शिरले. आंत खोलींत उजेडाला मज्जाव नव्हता पण खोली मात्र दमट नि अतिशय थंडगार अशी भासत होती.

" ह, हें आपल निवासस्थान, " जेलर म्हणाला.

" पण एकांतवास का ? "

" मला कस कळायच ? '

" मला दऊत टांक कागद तरी मिळतील ? "

" तसा मला हुकूम नाहीं गय्यां अन्न फक्त विकत मिळेल, इतर कांहीं नाहीं. " जेलरसाहेब म्हणाले, आणि खोलीतील भिंतीवर एकदां चौफेर नजर टाकून ते बाहेर पडले, आणि दार बद झालें

दार बद होतांच डार्नेनें खोलीतील टेबल नि गवती बिछान्याकडे आपली दृष्टि फिरवली आणि त्याच्या आगावर किळसानें शहारे आले. तो बिछाना कांही सजीव प्राण्यांनीं नुसता बुजबुजला होता. " ह ! मृत्यूनतर आपल्या देहाची याच प्राण्यांशीं पहिली दोस्ती व्हायची आहे ! " आंगावर शहारे देत नि भेसूर हमत तो आपल्याशींच उदासपणे उद्गारला

" दहा फूट रुद नि आठ फूट लांब, दहा फूट नि आठ फूट, दहा नि आठ. " चार्लस पाऊलें मोजीत खोलींत फिरत होता बाहेरील जगाचा नित्याचा कोलाहल गुदमरत्या आवाजात त्याच्या कानांवर येत होता; आणि दुसरेहि कांहीं आवाज बेबदपणें त्यात मिसळलेले होते " बूटाची शिलाई, बूटाची शिलाई. " पण या आवाजाबरोबर जोरानें मान हलवून डार्ने आपली चाल वाढवून फेऱ्या मारू लागे. " आतां दार बद झाल. बाहेर त्या जीवनमृताच्या मेळाव्यात, खिडकीला टेकून उभी असलेली एका स्त्रीची मोहक आकृति दिसत होती. तिच्या सोनेरी केसांवर प्रकाशाच्या कशा लहरी मारीत होत्या, आणि ती— कुणासारखी ? .. पण चला, मेहेरबानी करून आतां पुढें चला, आतां वाटेंत वेळ नको मोडू . त्याची बुटांची शिलाई चालू होती, बुटांची शिलाई, बुटांची शिलाई !—दहा फूट नि आठ फूट, दहा नि आठ, दहा नि आठ .."

डार्नेचें पाऊल विचारांच्या वेगाबरोबर जलद पडत होतें. मनाच्या खोल

अंतर्गाऱ्यांतून गतस्मृतींचे असले लहान मोठे अनत फुटकळ अवशेष अनिर्बंधपणें वर उसळत होते. बाह्य जगाचा कोलाहल तसाच गुदमरल्यासारखा त्याच्या कानावर अजून पडत होता, पण बाकीचे आवाज मात्र करुण रोदन ध्वनींसारखे त्याच्या कानांत आतां घुमत होते.

---

.... २ ....

सकाळच्या न्याहारीच्या वेळीं घ्यावयाच्या चाकोलेटचा प्याला तयार करण्यास तीन आचाऱ्यांची आवश्यकता भासणाऱ्या, पण उगवत्या क्रांति सूर्याच्या किरणप्रभेनें जाग आलेल्या देशभक्तांच्या पायरवाची चाहूल लागून नि त्यानें बेचैन होऊन, त्याच आचाऱ्यांच्या भोंगळ पोषाखांत जीव घेऊन फ्रान्सबाहेर पळत सुटलेल्या एका मिजासखोर पण वैभव सपन्न अशा उमरावाच्या भव्य इमारतींत, टेलसन बँकेची पॅरिसमधील शाखा विराजमान झाली होती पण सूर्योदयाच्या वेळीं आकाशांत झपाझप होत असलेल्या रग पालटाप्रमाणें, त्या नवीन लोकराज्यांत कायदे कानूंची आयात निर्गतहि तशीच झपाट्यानें चालू होऊन नि त्या भव्य इमारतीचा ताबा लोकसत्तेकडे जाऊन लोकसत्तेचें तिरंगी निशाण त्यावर आतां फडकत होतें, आणि गांवठी दारूच्या बाटल्या उडवीत लोकराज्याचे पहिले पाईक, त्या भव्य इमल्यांत डुकरासारखे सदा अस्ताव्यस्त लोळत होते.

कितीतरी सपन्न लोकांच्या ठेवी बॅंकेच्या तिजोरींत आज केवळ लोळत पडल्या होत्या. त्यांच्यांत कोणत्याच तऱ्हेचा चढउतार आतां होत नव्हता. त्यांतल्या कितीतरी ठेवी त्या ठिकाणीं आणखीं कितीतरी वर्षे तशाच धूळ खात पडणार होत्या. कितीतरी बहुमोल सुवर्ण रत्नालकार, त्यांचे मालक तिकडे तुरुगांत कुजत पडले असतां किंवा परलोकची वाट तडकाफडकी चालत असतां, तसेच तिथें किती तरी वर्षे गंजत रहाणार होते आणि कितीतरी उमद्या जीवांचा हिशेब आतां या जगांतील टेलसन बॅंकेत पुरा न होतां, धर्मराजाच्या आधिपत्याखालील पेढींत लवकरच पटवला जाणार होता बॅंकेच्या पॅरिस शाखेचा व्यवहार हा असाच चालायचा

काय आणि किती दिवस? याच गुंतागुतीच्या प्रश्नाचा विचार करीत मि. जार्व्हिस लॉरी आपल्या कचेरीच्या खोलींत बसले होते त्यांच्या निर्भय मुखमडलावर हिंवाळ्यांतील त्या रात्रीं चिंतेची नि भीतीची कृष्णछाया दाट पसरलेली दिसत होती. सभोंवारच्या अदाधुंद अराजक परिस्थितींत, केवळ एक कर्तव्यपालनाच्या कठोर निश्चयानेंच त्याचा सर्व व्यवहार आत्तापर्यंत चालला होता विचारांच्या तद्रेंत त्यांच्या खोलीसमोरील खालच्या चौकांत दोन खांबाना बाधलेल्या मशा-लींच्या उजेडांत दिसत असलेल्या एका भल्या मोठ्या धार लावण्याच्या दगडा-कडे, बसल्या जागेवरून मधूनच उठून ते पहात होते एक दोन क्षण तिकडे पाहून आंगावर शहारे देत ते मग खिडकी बद करून खोलींतील उबदार शेगडी-कडे तोंड करून बसत आणि आपल्या विचारांत परत गढून जात. वाड्याच्या उच उच भिंती नि लोखडी कवाडापलीकडील रस्त्यांवरून त्याच्या नेहमींच्या परिचयाचे असख्य आवाज त्याच्या कानांवर आतांहि येत होते पण आज काहींतरी अगदीं नवीन नि विलक्षण अशी भीषण धार त्या आवाजांना चढलेली त्यांना भासत होती, आणि तीच धार त्या भल्या मोठ्या दगडाच्या दर्शना-सारखीच त्यांच्या मनात भीतीचें काहूर उसळवीत होती.

" परमेश्वराचीच खैर म्हणायची ही, कीं माझा असा जवळचा आप्तस्वकीय आज या भयाण नगरांत कोणींच नाहीं आणि या पिसाटांच्या तावडींत सांपड-लेल्या या असंख्य जीवांचा केवळ तोच एक आता पाठीराखा आहे परमेश्वरा, कृपा कर बाबा त्यांच्यावर ! " आपले हात जोडुन वर दृष्टि लाऊन लॉरी उद्गारले.

त्याच क्षणीं बाहेरच्या घटेचा घणघणाट सुरू झाला " आले वाटत सैतान पुन्हा ! " असं आपल्याशींच पुटपुटून त्यानीं बाहेरचा नीट कानोसा घेतला पण त्याच्या कल्पनेप्रमाणें खाली चौकात कसलाच गल्का झाला नाहीं आणि तें लोखडी फाटक परत बद झाल्याचा आवाजहि झाला आणि सर्व कांहीं पूर्ववत शांत झालें.

त्यांच्या मनांत काहींतरी शका आली आणि बॅकेच्या सुरक्षिततेची जबाबदारी सर्वस्वीं त्यांच्यावर असल्यामुळें खाली पहारेकऱ्यांच्या खोलीकडे जाण्यासाठीं ते आपल्या खुर्चीवरून उठले. पण इतक्यांत त्यांच्या खोलीचें दार एकदम उघडून दोन व्यक्ति आंत घुसल्या आणि त्यांच्याकडे दृष्टि जातांच आश्चर्यानें अगदीं स्तिमित होऊन ते आपल्या खुर्चीत मटकन खालीं बसले.

ल्यूसी आणि तिचे वडील !

भयानें पांढरी फिकट पडलेली ल्यूसी असहायपणें आपले हात पसरून त्यांच्या-कडे येत होती. तिच्या नाजुक चेहेऱ्यावर, त्यांनीं पुष्कळ वर्षांपूर्वी पाहिलेला तो भावनोत्कट उत्कंठेचा भाव, आजहि तितक्याच उत्कटपणें तसाच उमटलेला त्यांना आतां परत दिसत होता.

" म्हणजे ?" गोंधळून धाप टाकीत लॉरी म्हणाले. " हा काय प्रकार ? ल्यूसी ! डॉक्टर ! तुम्ही का इथे ? काय झाल — बोला, काय झाल ?"

" लॉरी, लॉरी ! काय सांगू ? माझा चार्लस !" — त्यांच्या वृद्ध पण कण-खर बाहूचा आश्रय घेत स्फुंदत ल्यूसी म्हणाली

" तुझा चार्लस ?"

" होय हो."

" मग ?"

" अहो, इथं आहे तो."

" कुठे, इथे पॅरिसमध्यें ?"

" होय हो, लॉरी ! किती तरी झाले दिवस तो आल्याला — नक्की नाहीं सांगतां येत मला. आम्हांला कांहीं न समजता कुणासाठीं तरी धाऊन आला तो इथे, पण इथें येतांच कैदी होऊन पडला आहे हो तो आतां !"

लॉरींनीं अतिशय निराशेनें तळमळून मोठ्यानें एक दु:खोद्गार काढला आणि त्याचवेळीं देवडीवरील ती घंटा परत एकदां मोठ्यानें घणघणली नि असंख्य पाऊलांचा आणि आरडाओरडीचा आवाज खालील चौकांत मोठ्यानें घुमूं लागला.

" कसला चालला आहे एवढा ओरडा ?" खिडकीकडे जात डॉक्टर म्हणाले.

" अं हं, अं हं !" लॉरी ओरडले. " तिकडे जाऊं नका डॉक्टर, शपथ आहे तुम्हांला त्या पडद्याला हात लावाल तर !"

खिडकीच्या कडीवरील आपला हात तसाच ठेऊन डॉक्टर मागें वळले आणि शांतपणें धीर गंभीर हसत ते म्हणाले —

" असे घाबरू नका मि. लॉरी; माझं जीवित या शहरांत अगदीं मंत्रानें भारल्यासारखं सुरक्षित आहे. इथल्या बॅस्टीलची हवा मी चाखली आहे. आणि या पॅरिसमध्यें — पॅरिसमध्यें ? — अहं या सबंध फ्रान्समध्यें, बॅस्टीलचा मी

मानकरी होतों हे कळल्यानतर मला घेऊन बेहोषपणें नाचणार नाहीं किंवा मला घट्ट आलिंगन देणार नाहीं असा एकहि देशभक्त सांपडणार नाहीं त्या माझ्या जुन्या तपश्चर्येनें एक प्रकारच सामर्थ्य आतां माझ्यांत उत्पन्न झाल आहे; आणि त्याच सामर्थ्याच्या जोरावर आतांपर्यंतचे सर्व अडथळे मी सुलभपणें ओलाडले, चार्लसचा पत्ता मिळवला आणि इथें हा असा सुखरूप येऊन तुमच्या-समोर आतां माझ्या ल्यूसीला घेऊन मी उभा आहे. तसा मला आत्मविश्वासच होता; नि चार्लसला सकट मुक्त करण्याची आशाहि मला त्याच जोरावर वाटते आहे ' ल्यूसीला मी तस बोललों सुद्धा आहे — पण हा आवाज कसला ?" त्याचा हात परत खिडकीजवळ गेला.

" मेहेरबानी करून बाहेर पाहू नका डॉक्टर '" लॉरी परत मोठ्यानें ओरडले.

" अह, ल्यूसी ! नाहीं, तू पण नाहीं ' " तिचा हात त्यानीं घट्ट धरून ठेवला.

" तस एवढ ध्यायच कारण नाहीं, पोरी त्या परमेश्वराचीच मी अगदीं शपथ घेऊन सांगतों कीं चार्लसच्या जीवाला कांहीं धोका असल्याच मला कळल नाहीं. आणि या पेटलेल्या खाईत तो येऊन पडला आहे याची सुद्धां मला अजून कल्पना नव्हती कुठल्या तुरुंगांत आहे तो ? "

" ला फोर्स "

' ला फोर्स ' ल्यूसी, पोरी, तशी तू धीराची आहेस आणि आमची अवज्ञा-पण तू कधीं केला नाहींस की धीर सोडला नाहींस — जरा शांत हो, आणि मी सांगेन त्याच्या बाहेर तिळमात्रहि जाऊ नको — त्यावरच आतां सर्व कांहीं अवलबून आहे. आज रात्रीं काहीं करणचस काय पण बाहेर पडणहि तुला शक्य नाहीं. कठीण आहे मी काय सांगतों तें करण, पण चार्लसच्या जीवासाठीं तें केलच पाहिजे त्या मागच्या खोलींत जाऊन तू आता स्वस्थ बस आणि कांहीं वेळ आम्हां दोघांनाच थोडा विचार करू दे जा बये, जगण्या मरण्या-चीच ही आतां झुज आहे, यात विलब मुळींच चालायचा नाहीं; चल."

" माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे लॉरी नि तुमचा चेहेराहि मला स्पष्ट-पणें तेंच सांगतो आहे, चला तर."

लॉरीनीं तिचें झटकन मोठ्याप्रेमानें चुबन घेतलें आणि घाईघाईनें त्यानीं तिला आतल्या खोलींत सोडून, दार बाहेरून बद करून ते डॉक्टरांजवळ खिड-कीशीं आले आणि ती खिडकी उघडून खालीं चौकात त्या दोघांनीं एकदमच दृष्टी टाकली.

पन्नास पाऊणशें लोकांचा जमाव तिथें चौकात आतां गोळा झाला होता. ते सारे स्त्रीपुरुष त्या धार लावण्याच्या दगडाजवळ गर्दी करून उभे होते. आणि क्रूर चेहेऱ्याचे दोन पिसाट, दातओठ आवळून तो दगड जोरानें फिरवीत होते. त्याचे लांब लांब रुक्ष पिसकारलेले केंस, मानेच्या प्रत्येक हिसक्याबरोबर त्यांच्या घामानें लडबडलेल्या चेहेऱ्यावर नाचत होते, आणि तोंडाला लाव-लेल्या खोट्या मिशांमुळें त्यांचे चेहेरे अधिकच अक्राळ विक्राळ असे दिसत होते. त्यांच्या सभोंवार अस्ताव्यस्त उभ्या असलेल्या स्त्री पुरुषांतील कांहीं त्यांना जोर देत विक्राळपणें ओरडत होते, तर कांहीं त्यांच्या हातांतील दारूचे पेले त्या भेसूर कामकऱ्यांच्या ओठाजवळ धरून त्यांचे घसे ओले करीत होते. त्या सग-ळ्यांच्या चेहेऱ्यांवर, आंगातलि फाटक्या तुटक्या कपड्यांवर आणि हातातील अनेक जातीच्या ओबडधोबड किंवा लखलखीत पोलादी हत्यारा पात्यारावर रक्ताचे डाग जिकडे तिकडे उठून दिसत होते त्या हत्याराना धार लागत असतां दगडांतून लालबुद ठिणग्या वर उडत होत्या, मशालींचा भीषण लाल उजेड त्याच्या रक्तलांछित तोंडावर नि कपड्यांवर नाचत होता आणि चोका-तलि तें सर्व वातावरण जस काहीं सर्वांगानें रक्ताळल्यासारख लालच लाल अस दिसत होत. चौकांतील एकहि स्त्रीपुरुष व्यक्ति रक्ताच्या लाल रंगाशिवाय सुनी दिसत नव्हती. प्रत्येकजणाची पुढें घुसण्यासाठीं रेटारेटी चालली होती. आणि धार लाऊन लखलखीत झालेलीं आपलीं हत्यारें घेऊन पिसाटासारखे ओरडत डोळ्यांत खून चढून कांहींजण तसेंच चौकातून बाहेर ओरडत धांवत जात होते, आणि त्यांच्या सहधर्मचारिणीहि तशाच पिशाचिनीं सारख्या किंचाळत हातांतील हत्यारें वर धरून नाचवीत त्याच्या मागोमाग सुसाट धांवत जात होत्या.

एकाच दृष्टिक्षेपात मृत्यूच्या गणांच तें तांडव नृत्य पाहून ते दोघे खिडकी-पासून दूर झाले आणि पांढऱ्या फटक पडलेल्या आपल्या दोस्ताच्या चेहेऱ्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें डॉक्टरनीं आपली नजर लावली.

" तुरुगातील कैद्यावर ही सक्रांत आज वळली आहे, " आंत ल्यूसी अस-लेल्या त्या खोलीकडे पहात खालच्या आवाजात लॉरी म्हणाले तुम्ही म्हणतां तसलं सामर्थ्य तुमच्या आंगात जर असेल — तें आहे अस मला खास वाटतं — तर आतां या सेनानींसमोर प्रकट व्हा डॉक्टर आणि त्यांच्या मागोमाग ला फोर्सची वाट चालू लागा. कदाचित् होणार होऊनहि चुकल

असेल — कोणास ठाऊक — पण आतां तरी एक क्षणहि व्यर्थ जाता कामा नये ! ”

डॉक्टरनीं त्याचा हात प्रेमभरानें दाबला आणि ते तसेच डोक्याला टोपीहि न चढवतां खोलीबाहेर पडून खालीं चौकांत दाखल झाले

मंद वाऱ्यावर भुरभुरत असलेले त्याचे पांढरे शुभ्र लांब केस, धीरगंभीरवृत्ती, चेहऱ्यावरील दृढ आत्मविश्वास आणि हातानें जसें पाणी मागे लोटीत असल्यासारखे वाटेंतील तीं परजलेलीं हत्यारें दूर सारीत निर्भयपणें पुढें पुढें येत असलेली त्यांची ती उंच धिप्पाड आकृती पाहून, लोकांनीं त्यांना झपाझप वाट मोकळी केली, आणि एक दोन मिनिटांतच डॉक्टर चौकाच्या मध्यभागीं गंभीरपणें उभे राहिले कांहीं क्षणाच्या शांततेनंतर आपसांत कांहींतरी कुजबुजत लोक मार्गेपुढें हलू लागले आणि डॉक्टराचा आवाज अस्पष्टपणें वर खिडकीशीं उभ्या असलेल्या लॉरींच्या कानावर आला आणि मग वीस वीस जवानाच्या खांद्याला खांदा भिडलेल्या दोन टोळक्याच्या मध्यभागीं डॉक्टरांना घेऊन त्यांच्या नावाचा जय जयकार करीत नि ला फोर्समधील त्याच्या जावयाच्या मुक्ततेसाठीं एकमेकांना आरोळ्या देत चौकांतील लोक बाहेर पडले “ डॉक्टरांचा जयजयकार करा ! बॅस्टीलचा हा वीर चिरायू होवो ! वाचवा, वाचवा, एव्हरमॉंडला वांचवा ! ” त्यांची गर्जना चालू होती आणि तिचा प्रतिध्वनी आतां आसमंतात दूरपर्यंत घुमत होता.

घाईघाईनेंच लॉरींनी मग खिडकी बंद केली आणि तसेच घाईघाईनें ल्यूसीकडे जाऊन तिच्या वडीलांच्या पुण्याईचा पराक्रम त्यांनीं तिला मोठ्या उल्हासानें सांगितला मिस प्रॉस आणि छोटी ल्यूसी पण तिथें आत बसलेलीं पाहून त्यांना त्याच्या त्या आनंदाच्या भरांत कांहींच नवल वाटलें नाहीं स्वस्थपणें आपल्याच विचारांच्या तंद्रेत त्यांच्याकडे पहात रात्रीच्या त्या अस्वस्थ शांतींत ते किती तरी वेळ बसले होते त्यांच्या हाताला धरून तशीच त्यांच्या पायाजवळ खालीं जमिनीवर अर्धवट गुंगींत ल्यूसी लवडली होती; आणि पलीकडे त्यांच्या बिछान्यावर छोटी ल्यूसी स्वप्नसृष्टांत रंगून गेली होती नि मिस प्रॉसची स्वारी जवळच तिच्या आंगावर हात टाकून बसल्या बसल्या निद्रासुखाचा अनुभव घेत होती. त्या कटाळवाण्यारात्रीचा अमल वाढत चालला होता; ती दुर्दैवी पत्नी सुसकारे सोडीत तळमळत पडली होती, तासामागून तास उदासवाणे पुढें

जात होते; पण तिच्या पित्याचा अजून कांहींच पत्ता नव्हता आणि दुसरी कसली बातमीहि तिच्या कानांवर येत नव्हती !

विश्व यन्त्रांतील त्या प्रचंड दगडी चाकानें — त्या विशाल भूगोलानें आपली अर्धफेरी सपवून परत एकदा सूर्यनारायणाकडे पहाण्यास सुरवात केली आणि मि. लॉरीनीहि डोळे उघडून समोर पाहिलें. सूर्याचे तांबडे किरण खालीं चौकांत पडले होते आणि तो धारेचा निसणा आतां एकटाच खऱ्याखुऱ्या काळसर लाल रंगांत रंगून सकाळचा थंडगार वारा घेत स्वस्थ बसला होता

.... ३ ....

दुसरे दिवशीं नित्त्याप्रमाणें बॅंकेच्या ऑफिसचीं दारें उघडून बॅंकेचे व्यवहार सुरू झाल्याबरोबर, व्यवहारज्ञ नि कर्तव्यपरायण मि जार्व्हिस लॉरींच्या मनात एकच विचार प्रामुख्यानें उभा राहिला. लोकसत्ताद्रोहाच्या आरोपावरून तुरुंगांत बंदी होऊन पडलेल्या एका राजबंदीच्या पत्नीला बॅंकेच्या आवारांत असा आश्रय देणं सुरक्षित आहे कीं नाहीं ? हाच तो बिकट प्रश्न होता ल्यूसी किंवा तिच्या त्या छोट्या कन्येच्या सुरक्षिततेसाठीं, आपली मालमत्ताचशी काय पण आपला स्वतःचा जीवहि ओवाळून टाकण्यास ते मागें सरले नसते. पण बॅंकेची मालमत्ता अशी त्यासाठीं धोक्यांत टाकण्याचा त्यांना काय अधिकार होता ? उलट कर्तव्यनिष्ठ नोकर या नात्यानें त्याच्या सर्वस्वीं ताब्यांत असलेली बॅंकेची मालमत्ता, कोणत्याहि धोक्यापासून दूर ठेवणं हेंच त्यांच कर्तव्य होत. आणि कर्तव्य करण्याची वेळ आली कीं लॉरी मग दुसर तिसर कांहीं जाणत नसत.

पण मग ल्यूसीला सुरक्षित ठेवणहि त्यांच कर्तव्यच नव्हत काय ? होय. पण त्यासाठीं बॅंक धोक्यांत टाकण हीहि कर्तव्यच्युतीच होती. मग डेफार्जच्या दुकानाच्या जागेंत ल्यूसीला इथून हलवून ठेवली तर ? पण क्रांतीची ठिणगी ज्या ठिकाणीं पडली, त्या स्फोटक द्रव्यांनी परिपूर्ण भरलेल्या वातावरणांत तिच जीवित सुरक्षित राहण शक्य तरी आहे ? अर्थात तोहि विचार सोडूनच दिला पाहिजे. पण मग त्यांना ठेवायचीं तरी कुठें ? लॉरी आपल्या डोक्यास सतावीत होते.

पण इकडे दुपार झाली तरीहि डॉक्टर परत आले नाहींत. आणि या लहरी पिसाट लोकक्षोभाचा तर कांहीं नियम सांगवत नव्हता. म्हणून ल्यूसीला हलविण्याचा विचार लांबणीवर टाकणंहि इष्ट नव्हत. लॉरी मग तसेच उठून आंतील खोलींत गेले आणि त्यांचा विचार विनिमय चालू झाला ल्यूसीच्या सांगण्यांत असं आलं कीं, डॉक्टराच्याहि मनांतून बँकेजवळच आपल्यासाठीं वेगळी जागा पहावी, असं होतं. आणि आतां डॉक्टर चार्लसला बंधमुक्त करून जरी घेऊन आले तरी पॅरिसच्या बाहेर ताबडतोब पडणं अशक्य असल्यामुळें कांहीं काळ तरी पॅरिसमध्येंच राहणं त्यांना भाग होतं म्हणून लॉरींनाहि ती कल्पना पटून ते बँकेबाहेर पडले आणि थोड्याच वेळांत जवळच असलेली नि एकांत अशी माडीवरील एक जागा त्यांनीं पसंत केली. आणि नंतरहि मुळींच वेळ न मोडतां ल्यूसी, तिची ती छोकरी नि मिस प्रॉस, यांची त्यांनीं नव्या जागेंत रवानगी करून आणि शक्य त्या सुखसोयींची तेथें व्यवस्था करून त्यांनीं आपल्या विश्वासू जेरीला त्यांच्या दिमतीस दिलें. स्वतःच डोकं फुटल्याशिवाय तो कोणालाहि आंत जाऊं देणार नाहीं अशी लॉरींना खात्री असल्यामुळेंच त्यांनीं जेरीची योजना त्या ठिकाणीं केली होती. स्वतःच्या मनांतील दोन कर्तव्यांचा झगडा हा अशा रीतीनें मिटवून समाधानानें पण काहींशा विषण्णपणें आपल्या बँकेंत लॉरी येऊन दाखल झाले आणि त्यांचें दैनंदिन व्यवहाराचें कंटाळवाणें रहाटगाडगेंहि रोजच्यासारखें मग चालू झालें. पण लॉरींच्या मनाचा विषण्णपणा मात्र रात्रिभरहि तो सारा दिवसभर कमी झाला नाहीं

सायंकाळीं बँक बंद झाल्यावर आपल्या कचेरींतून उठून ते आंतील खाजगी खोलींत शिरले आणि पुढें काय, याचा विचार करीत खालीं खुर्चीत लवंडले. त्याच वेळीं जिन्यावर कोणाचें तरी पाऊल वाजलें आणि त्याच्या पाठोपाठ कोणी तरी, त्यांना नांवानें पुकारीत, नि त्यांच्या चेहेऱ्याचें सूक्ष्म निरीक्षण करीत त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला.

"काय हुकूम?" लॉरींनीं विचारलें. "आपण मला ओळखतां?"

काळेकुरळे केस नि भक्कम बांधा असा पन्नाशीच्या सुमाराचा तो माणूस त्यांच्या समोर उभा होता. त्यानेंहि त्याच आवाजांत तोच प्रश्न उत्तरादाखल केला—

"आपण मला ओळखतां?"

" कुठें तरी पाहिल आहे मी आपल्याला."

" माझ्या दारू दुकानांत असेल बहुधा ?"

" डॉक्टर मॅनेटकडून आलांत आपण ?" मोठ्या उत्सुकतेनें पण धडधडत्या अत:करणानें मि. लॉरीनीं विचारलें.

" होय, डॉक्टर मॅनेटकडून " डेफार्ज म्हणाला आणि डॉक्टरांच्या हस्ताक्षरांतील एक उघडें पत्र त्यानें लॉरींच्या थरथरत्या हातांत दिलें.

" चार्लस सुखरूप आहे, पण मी येथून निघण अजून इष्ट नाहीं. हें पत्र आणणाराबरोबर चार्लसच ल्यूसीला एक पत्र फक्त मला पाठवितां आल. तें त्यालाच समक्ष नेऊन देऊ द्या."

ला फोर्सच्या तुरुंगांतून एक तासापूर्वीच तें पत्र सुटल होत.

" असे माझ्यामागून आपण याल का ?" पत्र वाचून जीव जरा भांड्यांत पडून आनदाने लॉरी म्हणाले. " जवळच आहे येथून तें."

" चला," डेफार्जनें उत्तर केलें

त्याच्या बोलण्याच्या पद्धतींतील नि आवाजांतील तो तुटक परकेपणा त्यांच्या लक्षांत न येतां लॉरी डोक्याला टोपी चढवून त्याला घेऊन खालीं चौकांत आले. चौकांत येतांच तेथें उभ्या असलेल्या दोन स्त्रियांकडे त्यांची नजर गेली, एकीच्या हातांतील विणकाम चालू होतें.

' मॅडम डेफार्ज, मला वाटत !" सुमारें सत्रा वर्षांपूर्वी अगदीं ततोतत त्याच स्थितींत पाहिलेल्या मॅडमकडे दृष्टि टाकून लॉरी म्हणाले.

" होय, मॅडम डेफार्ज "

" या पण आपल्याच बरोबर येणार का ?" त्यांच्या मागोमाग मॅडम डेफार्जचें पाऊल उचललेलें पाहून लॉरीनीं विचारलें.

" होय, तिनेंहि त्यांना नीट पाहण इष्ट आहे. त्यांच्याच सुरक्षिततेसाठीं आहे तें "

डेफार्जच्या वागणुकींतील तुटकपणा आतां लॉरींच्या लक्षांत येऊन त्यानीं थोडें चमकून त्याच्याकडे पाहिलें आणि ते पुढे झाले. त्या दोन्ही स्त्रियांहि त्या दोघांच्या मागोमाग बाहेर पडल्या. ती दुसरी स्त्री कराल काली होती.

शक्य तितक्या जलद पाऊलें टाकीत त्यानीं तें इष्ट स्थान गांठलें. आणि

जिना चढून वर गेल्यावर जेरीनें त्यांना दार उघडून आत घेतलें. ल्यूसी एकटीच अश्रु गाळीत बसलेली त्याना समोरच दिसली. पण लॉरींनी सांगितलेल्या चार्लसच्या खुशाली बरोबर तिच्या हृदयाला आनंदाचें जसें उधानी भरतें आलें आणि भरल्या अंत करणानेंच तिनें ती चिठ्ठी तिच्या हातात देणाऱ्या डेफार्जचा हात कृतज्ञतेनें घट्ट धरला — पण त्याच हातानें चार्लसच्या सभोंवार कसल्या रंगाचा सडा थोड्या वेळापूर्वी शिंपडला होता, आणि जर शक्य असत, तर तितक्याच बेफिकीर क्रौर्यानें चार्लसच्या रक्तानेंहि ते हात हा वेळपर्यंत रंगले असते, याची त्या बिचारीला कल्पनाहि नव्हती

" ल्यू सी, — धीर सोडू नको मी सुखरूप आहे आणि तुझ्या वडीलांच्या वजनाचा मला फायदा होतो आहे पत्राचें उत्तर मला मिळू शकणार नाहीं. लाडक्या ल्यूसीला गोड गोड पापे "

बस्स, इतकेच शब्द पण त्याच शब्दांसाठी अहोरात्र अश्रु गाळीत बसलेल्या त्या कोमल हृदयाला ते कितीतरी वाटले. आणि तेंच कोमल हृदय मग मॅडम डेफार्जकडे वळून तिच्या राकट हातांवर त्यानें आपले नाजुक ओठ मोठ्या कृतज्ञपणें टेंकले. भरल्या हृदयाचा, कृतज्ञतेचा, प्रेमाचा नि स्त्रीजातीच्या सर्व नाजुक भावनांचा तो सहज आविष्कार होता. पण त्या राकट हातांनीं त्याला कसलेंच प्रत्युत्तर दिलें नाही थंडपणें, अगदीं बर्फासारख्या संवेदन शून्य थंडपणें त्यांचें विणकाम चालू होतें !

त्या भावनाशून्यतेनें ल्यूसी थोडी चमकली चार्लसची चिठ्ठी हृदयाजवळ जपून ठेवण्यासाठी वर उचललेला तिचा हात जागच्या जागींच थांबला, आणि भयभीत अंत करणानें ती मॅडम डेफार्जच्या चेहेऱ्याकडे पाहू लागली तिच्या त्या भयचकित चेहेऱ्याकडे मॅडमनें फक्त निर्विकार, थंड मुद्रेनें नुसतें एकदां पाहिलें.

' तिकडे रस्त्यांत कीं नाहीं ल्यूसी, सारखी कांहींतरी धामधूम चालू आहे." घाईघाईनें स्पष्टीकरण करीत लॉरी म्हणाले "आणि आलीच जर तशी वेळ — तशी येणार नाहीं म्हणा — आणि तुमच्यावर पण ती संक्रांत जर वळली तर आपल तुम्हांला नीट पाहिलेल असाव, म्हणजे तुमची सुटका करण तेवढ सोपं जाईल यांना; कारण तसच वजन आहे याच त्या साऱ्या लोकांवर. बरोबर आहे ना, " — त्या तिघांची ती बर्फासारखी ताठर तुटक वृत्ती पाहून मधेंच थांबून लॉरी म्हणाले, " मी काय म्हणतों तें, सिटिझन डेफार्ज ? "

डेफार्जेनें आपल्या पत्नीकडे उदासपणें पाहिलें आणि अनुमतिदर्शक असा नुसता तुटक हुकार मात्र केला.

" आणि हें बघ, " आपल्याकडून सर्व कांहीं शक्य तितक सावरून घेण्याचा प्रयत्न करीत लॉरी म्हणाले, " तुझ्या त्या चिमुरड्या पोरीला नि आपल्या मिस प्रॉसना पण घे बोलाऊन इथे. आमच्या मिस प्रॉस, बर का डेफार्ज, म्हणजे चांगल्या कुळांतल्या एक इंग्लिश बाई आहेत. पण त्यांना फ्रेंच मात्र येत नाहीं बर का "

कोणत्याहि सकटांना, अडीअडचणींना आणि कुठल्याहि देशाच्या भूतांना भीक न घालतां त्यांनां अगदीं पुरून उरण्याच्या आत्मविश्वासांतच, मिस प्रॉसची स्वारी छातीवर हात धरून त्यांच्यापुढें खडी झाली आणि कराल कालीकडे प्रथम दृष्टि जाऊन ती पुटपुटली, " बघतेस काय अशी, ए निलाजरे ' काय समजलीस तू मला ? " आणि मग मॅडम डेफार्जकडे पहात तिनें नुसता तुच्छता दर्शक हुकार केला पण त्या कोणींच तिकडे फारस लक्ष दिल नाहीं

" त्याचीच ना ही छोकरी ? " आपली सुई प्रथमच थोडी थाबवून आणि ती धाकट्या ल्यूसीकडे काळाच्या कठोर पाशाप्रमाणें रोखून मॅडम डेफार्जेनें विचारलें.

" होय, मॅडम, " लॉरीनीं उत्तर केलें, " हीच ती आमच्या दुर्दैवी राज-बंदीची लाडकी नि एकुलती एक मुलगी "

मॅडमची दृष्टि परत धाकट्या ल्यूसीवर खिळल्याबरोबर, मृत्यूची भीषण छाया तिच्याभोंवती दाटत आहे असें वाटून, तिच्या आईनें झटकन खालीं गुडघे टेकून तिला आपल्या छातीशीं घट्ट दाबून धरलें. पण मॅडम डेफार्ज आणि मडळीची ती उग्र भयानक छाया त्या दोघींनाहि आतां पूर्ण ग्रासीत असल्या-सारखी मात्र दिसु लागली.

" चला, माझं पाहून झाल डेफार्ज. जाऊ या आतां आपण " मॅडम डेफार्ज म्हणाली.

पण त्या एकदर तुटक, भीषण वातावरणांतील गर्भित धमकी ल्यूसीच्या हृदयाला धडकी भरविण्यास पुरेशी होती. अतिशय अस्वस्थ नि भयभीत चित्तानें तिनें कळवळून मॅडम डेफार्जचा झगा पकडला आणि ती म्हणाली —

" माझ्या चार्लसवर दया कराल तुम्ही ? त्याला नाहींना कांहीं इजा पोंचू देणार? त्याची माझी भेट घाल का घडवून ? "

"तुमच्या त्या नवऱ्याशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं," शांतपणें तिच्याकडे पहात मॅडम म्हणाली. "डॉक्टरांच्या मुलीशींच फक्त इथे मला कर्तव्य आहे."

"बर तर, माझ्यासाठीं — डॉक्टरांच्या या मुलीसाठीं तरी कराल ना एवढी दया? माझ्या या पोरीच्या नावानें तरी एवढी भीक घाला मला. परमेश्वराजवळ उदंड आयुष्य मागेल तुम्हांला ती पहा, आतां तुमच्यावरच आहे आमची सारी भिस्त!"

मॅडम डेफार्जनें मोठ्या डौलानें आपल्या पतीकडे पाहिलें. आपल्या आंगठ्याचें नख कुरतडीत अस्वस्थपणें डेफार्ज उभा होता पण आतां पत्नीकडे दृष्टि जाताच आपल्या चेहेऱ्यावर उग्रपणा आणण्याचा त्यानें प्रयत्न केला.

"काय लिहितो तुझा नवरा त्या पत्रांत?" कुरठेपणानें हसत मॅडमनें विचारलें "वजन, वजन का कायसं म्हणतो न तो?"

"माझ्या वडीलांचं वरच वजन आहे तिथे, असं लिहिलं आहे त्यानें," घाईघाईनें कागद बाहेर काढीत पण भयभीत मुद्रेनें तिच्याकडे पहात ल्यूसीनें उत्तर दिलें.

"मग सुटेलच कीं तो? करा म्हणाव त्याचा उपयोग." मॅडम म्हणाली

"पत्नी आणि माता या नात्यानें तुमच्यापुढें आतां मी पदर पसरतें. दया करा माझ्यावर, नि तुमच्या साऱ्या वजनाचा उपयोग माझ्या त्या निष्पाप पतींचा घात करण्यासाठीं करू नका त्याच्या प्राणांची एवढी ही भीक तुमच्या या गरीब बहिणीला घाला. या दीन पत्नीची नि मातेची तुम्हांला तरी करुणा येऊं द्या!"

मॅडम डेफार्जनें अगदीं निर्विकार मुद्रेनें त्या दोन अर्जदाराकडे पाहिलें आणि मग आपल्या मैत्रिणीकडे — त्या कराल कालीकडे वळून ती म्हणाली —

"पत्नीची आणि मातेची कींव याच्या पूर्वी कितीं वेळां केली गली, तें सांगा? त्या असंख्य गरीब बिचाऱ्यांचे पती नि म्हातारे बाप तिकडे तुरुंगांत कुजत असतांना, कुणाला झाली दयेची आठवण? सारा जन्मभर आमच्या आया बहिणींना नि त्यांच्या पोरांबाळांना, दारिद्र्याच्या मूर्तिमंत खाईत कपड्यांवांचून थंडी पावसांत कुडकुडत, भुकेनें तहानेनें व्याकूळ होत, आजारापाजारांत कसल्याहि मदतीशिवाय टाचा घाशीत तडफडत प्राण सोडतांना मी पाहिलं आहे.

जुलूम जबरदस्तीच्या जात्याखालीं त्यांचं पीठ होतांना आम्हीं उघड्या डोळयानीं पाहिलं आहे. तेव्हां कुठे होती ती दया ? "

" अगदीं खरं आहे, दुसरं कांहींच दिसलं नाहीं आम्हाला कधीं, " कराल काली म्हणाली.

"खूप दिवस केला हा जुलूम आम्ही सहन बर," ल्यूसीकडे परत दृष्टि वळवून मॅडम डेफार्ज म्हणाली 'तुझा न्याय ' एका बायलीची आता आम्हांला कींव यायची होय ? विसर, विसर बर ! "

आपल्या हातांतील सुयाना परत गती देत ती दाराबाहेर पडली आणि तिच्या मागोमाग काली नि मग डेफार्ज बाहेर पडून दार बंद झालें

" अशी धीर नको सोडू माझे बाई," असहायपणें तिकडे पहात असलेल्या तिला वर उठवीत लॉरी म्हणाले " धीर, फक्त एक धीर ' अजून पर्यंत सर्व कांहीं ठीक आहे — त्या असंख्य दुर्दैवी जीवापेक्षां आपण पुष्कळच भाग्यवान आहों. एवढे तरी त्या दयाघनाचे उपकारच नाहीं का, पोरी ? "

" ते विसरण्याइतकी मी कृतघ्न खास नाहीं पण त्या बयेची सावली माझ्या साऱ्या सुखावर नि आशेवर पडल्यासारखी आज मला वाटते आहे ! "

" भलतच कांहींतरी ! वेडी नाहींतर ! इतका धीर कसा सुटला माझ्या या धिटुकल्या पांखराचा, अं ? कसली सावली घेऊन बसली आहेस, ल्यूसी ? सावली बिवली कुछ नाहीं. कुछ दम नहीं इसमे ! " लॉरी उद्गारले

पण सूक्ष्म दृष्टीनें पहाणारास मात्र, डेफार्ज पतिपत्नीच्या या मुलाखतीची छाया त्यांच्या अंत करणावर पडलेली खास दिसली असती लॉरींच्या मनाच्या खोल गाभाऱ्यात भीतीची अशुभ पाल आज स्पष्टपणें चुकचुकत होती आणि लॉरी अतिशय अस्वस्थ झाले होते.

.... ४ ....

आज बरोबर चार दिवसांनीं जनप्रवाहावर आरूढ होऊन ला फोर्सच्या तुरुंगाकडे गेलेले डॉक्टर मॅनेट, लॉरीच्या कचेरींत आता परत प्रविष्ट झाले होते त्या चार दिवसांच्या रक्तमुख धुमश्चक्रीत, हजार बाराशें असहाय अश्रापबंदी, स्त्रीपुरुष किंवा बालवृद्ध असा कोहाच भेदभाव न होता, जनताजनार्दनाची रक्तपिपासा शांत करण्यासाठा निष्ठुरपणें बळी दिले गेले होते त्या चार दिवस, भयद मृत्यूची कृष्ण छाया पॅरिसमधील साऱ्या नरनगावर अविच्छिन्नपणें अहोरात्र पसरली होती आणि आसमंतातलें सर्व वातावरण त्या भीषणकृत्यांनीं दूषित झाले होत पण त्याच दुर्गंधी वातावरणात आपल्या पित्याच्या वाट पहात बसलेल्या ल्युसींच्या कानावर मात्र या साऱ्या कृष्णकृत्यांची नामावली चुकूनहि पडणार नाहीं, अशी खबरदारी आतिशय कसोशीनें घेतली गेली होती, आणि फ्रान्स सोडून ती दूर जाईपर्यंत, लोक अतिशय खवळून त्यांनीं तुरुंगांवर हल्ला केला आणि कोहीं कैदी त्यांच्या रागाला बळी पडले एवढेंच काय तें तिच्या कानावर आलें होतें

डॉक्टरना त्या चार दिवसात घेतलेला अनुभव मोठा विलक्षण होता. अनेक नरबळांनी होत असलेली क्रूर काटाकाट नि खालीं वाहत असलेले अशुद्धाचे प्रवाह यांच्या मधून वाट काढीतच आपल्या बरोबरील त्या तीस चाळीस क्रातीभैरवांच्या संगतात डॉक्टर ला फोर्सच्या तुरुंगात त्या रात्रा जाऊन दाखल झाले तडफड न्यायदान करण्यासाठीं उत्पन्न झालेल्या स्वयंनिर्मित नि स्वयंशासित मोटेशाही हंगामी न्यायासनासमोर. ला फोर्सच्या तुरुंगांतील निरपराध बायाबापड्यांचा न्यायनिवाडा त्यांच्यासमोरच चालू होता शिरच्छेदाची शिक्षा भराभर सनावली जात होती, दीनवाणे ओरडत असलेले स्त्रीपुरुष गुरासारखे फरफटत पिसाळलेल्या यमदूतांच्या हवालीं केले जात होते, आणि सूडाची एकच एक भावना विक्राळपणें तुरुंगाच्या आवारांत डॉक्टरांच्या सभोवार थैमान घालीत होती. आंत पाऊल टाकताच डॉक्टरनी आपलें स्वतःचें नांवगाव जाहीर करून, बस्टीलच्या तुरुंगाचे विनाचौकशी अटक झालेले असे अठरा वर्षे आपण एकांतवास मानकरी होतों ही गोष्ट त्यांनी आपल्या श्रोत्यास सांगून,

आपली ओळख त्या यमदूतांच्या तसल्या मेळाव्यांत न चुकतां हजर असणाऱ्या डेफार्जच्या मदतीनें, त्यांनीं करून दिली.

त्या स्वयनिर्मित ट्रायब्यूनलच्या परिसरात त्यांनी आतां आपलें आसन ठोकलें होतें. त्यांच्या आसपास कांहीं मद्यपानानें बेहोष होऊन जमिनीवर लोळत असलेले, तर कांहीं अर्धवट गुंगीत, कांही गाढ झोंपेत घोरत पडलेले तर कांहीं डुलक्या घेत बसलेले, कांही निरपराध मानवी जीवांच्या रक्तानें हात डागळलेले तर काहीं त्यापासून थोडेफार अलिप्त राहिलेले, असे त्या स्वयनिर्मित नि स्वयशासित ट्रायब्यूनलचे अधिकारी सरमिसळ पसरलेले होते. त्यांऱ्यापुढें पसरलेल्या त्या कागदावरून चार्लसनें याच लोकांसमोर न्यायदानाची अनेकवार विफल याचना केली होती, तरीहि त्याच्या जीवाला मात्र अद्याप कांहीं अपाय झाला नसल्याचें त्यांच्या नजरेस आलें डॉक्टरनीं भोगलेल्या तुरुगवासाऱ्या जोरावर आरभीं त्यांचे तुफानी स्वागत त्या सैतानांनीं केलें, आणि त्या उन्मादाच्या भरांत लोकमताचा तो निर्बुद्ध वारा, डॉक्टरांचा जयघोष करीत चार्लसला त्यांच्या समोर घेऊन हजरहि झाला. चौकशीस सुरुवात झाली, डॉक्टरांच्या तपश्चर्येचा जोर अजून शाबूत दिसत होता आणि चार्लसच्या सुटकेचा हुकूम लिहिण्यास प्रारभहि झाला पण डॉक्टरनां अज्ञात असलेल्या काहीं विलक्षण सामर्थ्याची दगडी भिंत त्या अनुकूलतेच्या लहरी लोंढ्याऱ्या आड आकस्मिकपणें खडी झाली आणि न्यायासनाच्या गुद्दीवर असलेल्या पदाधिकाऱ्यांची डोकीं अगदीं एकमेकांना घासीत कांहींतरी गुप्त कुजबूज करू लागलीं. अध्यक्षांनीं, चार्लस अजून तुरुगांत राहणच इष्ट आहे पण त्याच्या जीवाला मात्र कांहीं धोका पोंचणार नाहीं, असें डॉक्टरनां गभीरपणें सुनावलें चार्लस परत तुरुगाच्या अंतर्गृहाची वाट चालू लागला बाहेर असख्य निरपराध जीवांच्या हत्याकांडांत उन्मत्तपणें नाचत असलेल्या क्रांतीवीरांच्या कानठळया बसवणाऱ्या गर्जना चालूच होत्या डॉक्टरांचे कान त्या आरोळ्यांनीं बधिर झाले होते. त्यांनीं दीनपणें अध्यक्ष महाशयांची विनवणी करून आपल्या जांवयाच्या जीवाच्या सुरक्षिततेसाठीं त्याच्या जवळ राहण्याची परवानगी मागितली. आणि आतां त्याच्या जीवाला धोका कमी आहे असें वाटतांच ते इकडे बाहेर आले होते. बाकीचा इतका सारा वेळ त्यांनीं ला फोर्सच्या तुरुगातच काढला होता.

त्यानीं त्या चार अहोरात्रींत पाहिलेल्या भीषण कृत्यांचा इतिहास अज्ञातच

रहायचा होता केव्हां तरी नि कसे तरी चार घांस पोटांत ढकलून आणि मिळेल ती अपुरी झोंप पदरांत पाडीत चार्लस भोंवती जागता पहारा करून त्यानीं ते चार दिवस घालवले होते कांहीं एकाद दोन दैववान कैद्यांच्या सुटके मुळें झालेला बेहोष आनंद, अगणित शस्त्रांच्या घावांखालीं छिन्नविच्छिन्न होऊन खालीं पडत असलेल्या प्राण्याच्या वेदनांनीं संतुष्ट होऊन त्या भेतानी आनंदात बेहोषपणें नाचत असलेले नर पिशाच, त्या चार दिवसांत त्यानीं पाहिले होते. एक दुर्दैवी जीव त्या न्याय कोर्टातून जीव बचावून बाहेर पडत होता. दारांतून बाहेर पडतां पडतां कांहीं पिसाटांच्या घावांना तो पुराच बळी पडत होता. पण बलवत्तर दैवयोगानें ओळख पटून त्याच्या शुश्रूषेसाठीं डॉक्टरनीं धांवून जावें लागलें होतें. त्याला घेऊन धरून बसलेले ते लोक, कांहीं क्षणापूर्वीं त्यानींच घेतलेल्या नर बळींच्या देहासनावर विराजमान झाले होते. पण डॉक्टराच्या उपचारानंतर त्यानीं आपल्या हातांची झोळी करून मातेच्या वत्सलतेनें त्या जखमी माणसास त्या भयंकर स्थानापासून दूर नेऊन ठेविलें होतें. आणि दुसऱ्याच क्षणीं त्या क्षणिक कोमल भावनांना कठोरपणें दूर करीत नि आपलीं रक्ताळलेलीं हत्यारें परजित, कोणाहि सहृदयास पाहवणार नाहीं इतक्या क्रूरपणें दुसऱ्या अनाथ जीवांची नि कोवळ्या अर्भकांचीं खाडोळी करण्यासाठीं, उन्मत्तपणें पुन्हा धाऊन जात होते. किती भयंकर नि किती विलक्षण विरोध! डॉक्टरनीं आपले डोळे घट्ट मिटून घेतले नि आधारासाठीं त्यानीं भिंतीचा आश्रय घेतला.

चक्षुर्वैसत्य अशी ती भीषण हकीगत डॉक्टर सांगत असतां, त्याच्या त्या वृद्ध चेहेऱ्याकडे टक लाऊन पहात असलेल्या लॉरींच्या मनांत, या सर्व भयंकर अनुभवांनीं डॉक्टरांचा तो जुना मानसिक रोग परत डोकें तर वर काढणार नाहींना, अशी शंका राहून राहून उत्पन्न होत होती पण त्यांच्यासमोर आत्तां बसलेली ती डॉक्टरांची मूर्ति म्हणजे तपश्चर्येच्या तेजानें दीप्तिमान बनलेला त्यांचा तो नवा अवतार होता, हें त्यांना आतां प्रथमच कळायच होतं डॉक्टरांचा आत्मविश्वास आता पुरा जागा झाला होता त्याच मन त्यांना स्पष्टपणें सांगत होत कीं, आपल्या दीर्घ तपश्चर्येच्या दिव्याग्नींत पाणी चढत असलेल पोलादी हत्यार, आपल्या लाडक्या कन्येच्या पतीच्या लोहशृंखला तटातट तोडून त्याला खात्रीनें बंधमुक्त करील. "हें पहा दोस्त, माझ्या हाल अपेष्टा फुकट

गेल्या नाहींत, त्या नरकाच्या गर्तेतूनच हें माझ सामर्थ्य आज उत्पन्न झालेल आहे, त्या मरणांतूनच हें जीवन आतां खात्रीन निर्माण होणार आहे ! माझ्या पोरीन जसा थडग्यांतून ओढून काढून आपल्या प्रेमाच्या जोरावर मला परत जीवत माणसांत आणल, तसाच मी पण तिच्या त्या जिवाच्या जिवलगाला मृत्युच्या खाईतून, त्या दयाघन परमेश्वराच्या साहाय्यानें खास ओढून काढीन" ते म्हणाले. आणि हें सर्व सांगत असतां, त्याच्या डोळ्यांत उसळत असलेलं आत्मविश्वासाच तेज, दृढनिश्चयी करारी नि गंभीर मुद्रा पाहून, जार्व्हिम कॉरींना वाटल कीं, गेलीं किती तरी वर्षे असंख्य वालुकामय बांध बधाऱ्यात कोंडून घुटमळत असलेला हा जीवन प्रवाह, आता मुक्त होऊन आंगांतील साऱ्या सुप्त शक्ती वर उमळीत, जोरानें पुढें उफाळत चालला आहे खास. ते मुग्ध होऊन डॉक्टरांकडे पहात होते.

याच आत्मविश्वासाच्या जोरावर त्यांच्यासमोर उभ्या असलेल्या संकटापेक्षां मोठी संकटहि वितळून गेल्यावांचून खास राहिलीं नसतीं पण डॉक्टरनां आपल पाऊल अत्यंत सावधगिरीनें टाकणच भाग होत आणि तसं तें टाकीतहि होते. त्यांच्या सभोंवार वावरत असलेल्या असंख्य सुदैवी दुर्दैवी जीवांना, बंदीवानाला नि बंधमुक्ताला, लोकसत्तेच्या सामान्य पाईकाला नि पदाधिकाऱ्याला, आपल्या यशस्वी वैद्यकी ज्ञानाचा मुक्तहस्त फायदा देत त्या अराजक नगरांत ते नांदत होते आणि आपल्या वैयक्तिक वजनाचा सावधगिरीनें उपयोग करीत करीत तीनचार तुरुंगाचे तपासणी कामगार म्हणून ला फोर्सच्या तुरुंगात ते स्वतंत्रपणें जाऊ येऊंहि लागले त्याच्याच वजनामुळें एकांत वासांतुन सुटका होऊन चार्लस इतर राजबंदींत आतां मिसळूं लागला होता. दर आठवड्यास त्याची समक्ष भेट घेऊन आपल्या कन्येला त्याची खुशाली ते आता देत त्याची पत्रेंहि आतां मधून मधून कोणाच्या तरी हातीं ल्यूसीच्या हातांत येऊन पडत पण बाहेरील जगाशीं कोणताहि संबंध जोडला जाऊं नये म्हणून ल्यूसीला मात्र चार्लसला उत्तरा दाखल पत्र लिहिण्याची मनाईच होती. कारण न जाणों बाहेरच्या कांही वजनशीर आधारावर त्यानें हातावर तुरी दिल्या — तर ? पिंजऱ्यांतल पाखरू बाहेर निघून जाव अशी खुळी इच्छा कधीं कोणीं मनात बाळगली आहे !

डॉक्टरांचं हें नवीन जीवन पुष्कळच त्रासदायक होत हें जरी खर असल, तरी काहींतरी मूक अभिमानाच्या जोरावरच डॉक्टर तें टोलवून नेत होते, हें

लॉरींना स्पष्ट दिसत होत. पण हा स्वाभिमान अस्सल शंभर नंबरी मात्र खास होता. आतांपर्यंत त्याचा अठरा वर्षांचा दीर्घ बदिवास हा केवळ त्यांच्या वैय्यक्तिक दुर्दैवाचा नि हालअपेष्टांचाच भाग होता, अशी आपल्या कन्येची नि लॉरींची समजूत होती हें डॉक्टरना माहीत होतें पण आतां काळ बदलला होता, आणि त्या वैय्यक्तिक हालअपेष्टांच रूपांतर एका प्रभावी सामर्थ्यांत आतां झाल आहे, याची आतां डॉक्टरना जाणीव झाली होती, आणि याच प्रभावी सामर्थ्याच्या जोरावर आपण चार्लसची मुक्तता करू हीहि गोष्ट सर्वांना समजून चुकली आहे, हें पण डॉक्टरना स्पष्टपणें दिसत होत याच जाणीवेच प्रतिबिंब डॉक्टरांच्या प्रत्येक कृतींतहि उत्कटपणें उमटलेल दिसत होत. परावलंबीपणा नि कमजोरपणा दूर झुगारून देऊन डॉक्टर आता सामर्थ्य संपन्न नि स्वावलंबी बनले होते. कोणाच्याच बाहूचा दुबळेपणें ते आतां आश्रय घेत नव्हते, उलट आपल्याच बळकट बाहूचा आश्रय सर्वांना देत त्यांच प्रत्येक गोष्टींत ते मार्ग दर्शन करीत पुढें होत होते. पितापुत्रींच्या पूर्वीच्या जागांची आतां उलटापालट झाली होती पण त्याच्या मृतदेहात चैतन्य संजीवनी ओतणाऱ्या आपल्या प्रियकन्येच्या प्रेमाची फेड करण्याची आलेली संधी त्यानी मोठ्या उत्साहानें घेऊन, त्यांच्यावर पांखर घातलेल्या त्या कन्येवर, आपल्या प्रेमाची पाखर ते आतां कृतज्ञ भक्तिभावाने घालीत होते

" गमत आहे ह मोठी या जगाची, " त्याच्याकडे अभिमानानें पहात लॉरी पुटपुटत होते, " पण अगदीं सरळ आहे सगळ, ठीक ठीक, दोस्त चालू दे, असच निमेपणानें चालू दे ! "

पण चार्लसला बधमुक्त करण्याची किंवा त्याचा रीतसर इन्साफ करून घेण्याची डॉक्टराची जरी अहर्निश धडपड चालू होती, तरी लोकमताचा जोरदार प्रवाह अजून त्यांना आवरता येत नव्हता लोकसत्तेच्या नवयुगास सुरुवात झाली होती, एकाद्या सामान्य माणसासारखा शृंखला बद्ध होऊन फ्रान्सचा दुर्दैवी सम्राट् न्यायासनात खेंचला जाऊन नि झटपट चौकशी होऊन, त्याचें मुकुटविभूषित मस्तक धडा वेगळें होऊन धुळींत लोळत पडलें होतें, स्वातंत्र्य, समता नि बधुता किंवा मृत्यू, याची घोषणा करीत तें नवीन लोकराज्य मारूं किंवा मरूं ह्या अभिनिवेशानें हत्यारबंद होऊन जगा विरुद्ध खडें झालें होतें; फ्रान्सच्या कोनाकोपऱ्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून, डोंगर माथ्यावरून किंवा सपाट

माळरानांतून, लुसलुशीत द्राक्ष मळ्यांतून किंवा नापीक ओसाडींतून, दर्या किनाऱ्यावरून किंवा प्रसन्न सालिला जलवाहिनींच्या मऊ मळी जमीनींतून बुभुःकार करीत, फ्रान्सचा तो विराट समाज पुरुष, जगांतील साऱ्या जुलमी सत्तांना नामशेष करण्यासाठीं बद्धपरिकर होऊन, रणगर्जना करीत आता उभा होता. मग कोणत्या एकट्या दुकट्या मानवी व्यक्तीची उत्कंठा किंवा तिचं सामर्थ्य, ब्रह्मांडाचा ग्रास करूं निघालेल्या त्या प्रलयकालच्या जलौघासमोर आणि तेंहि परमेश्वरानं आपले डोळे बंद करून घेतल्यानंतर, ताठरपणें उभं राहणं शक्य होतं !

त्या प्रचंड क्षोभावर्तांत काळाची गतीसुद्धा स्थगित झाल्यासारखी दिसत होती दयामाया, शांति विश्रांति या सर्वांचा सारखाच लोप झाला होता. दिवसामागून दिवस येत जात होता, पण सारेच दिवस नि रात्र एकसारखींच. मग कालगणना तरी तिथें कुठली असायची. येईल दिवस तो जसा पहिलाच मानवी जीवाचं तें हत्याकांड मात्र सदा चालूच होतं नि सर्व राष्ट्र जसं एकाच रक्तपिपासेनं आपलं काम चालू ठेवीत होतं. आज सम्राटाचं मस्तक भाल्याच्या टोंकावर नाचवीत लोकमत्ता नाचत होती, तर लगेच जसा कांहीं दुसराच क्षण आल्यासारखा पांच सहा महिन्यांनी, दुःखानें अकालवृद्ध दिसणारं सम्राज्ञीचं सुकुमार सुंदर मस्तक, त्याच भाल्यावर नाचवीत लोकमत्ता पॅरिसभर थयथयत होती.

आणि तरीहि विरोधाच्या सामान्य नियमाप्रमाणें, झपाट्यानें होत असलेली काळाची ती चाल, कंटाळवाणी नि लांबचलांब अशी मात्र लोकांना वाटत होती स्वयंनिर्मित न्यायासनांची संख्या देशभर भराभर वाढत चालली होती, आणि कितीतरी अपराधी नि निरपराधी लोकांची रवानगी तुरुंगांत किंवा परलोका रोज सारखी सुरूच होती. कोणाचंहि कसलंहि म्हणणं किंवा अर्ज विनंति ऐकली जात नव्हती, आणि कोणाचंहि जीवित त्या अराजक राज्यांत एक क्षणभरहि सुरक्षित म्हणून कोणालाच कधीं वाटत नव्हतें. ही अराजक स्थिती नवीन असूनहि, जशी पुरातन कालापासूनच चालत आल्यासारखी लोकांना आता वाटूं लागली होती आणि ला गिलोटिनची ती भीषण आकृती कितीतरी शतकापासून बद्धमूल झाल्यासारखीच लोकांच्या डोळ्यासमोर आतां ठाम उभी होती तिच्या लहान लहान प्रतिकृती लोकांच्या अंगाखांद्यावर मिरवत होत्या. क्रॉसचें पावित्र्य त्या खुनी अपवित्र गिलोटीनला आतां आलं होतं. तिच्यासमोर सर्वांचा

मस्तक विनम्र होत होती नि क्षणार्धांत जीवन्मुक्त होत होतीं. देवाची देवकळाच जणु नाहींशी होऊन, त्याच्या जागीं निर्भेळ क्रौर्याची प्रतिष्ठापना त्या लोक-राज्यांत आतां झाली होती, आणि त्याच्या स्थंडिलावर रक्ताचा सडा रोज शिंपला जात होता.

सभोंवार क्रौर्याचा असा नंगानाच चालू असता, डॉक्टर शांतपणें अनुकूल काळाची वाट पहात आपला व्यवहार उरकीत होते, आणि स्वतःच्या सामर्थ्या-वर विश्वास ठेऊन ध्येयाकडे सावधपणें पण चिकाटीनें पाऊल टाकीत, चार्लसची सुटका करीनच करीन या विश्वासानें ते आपला काळ घालवीत होते. तरीहि त्यांच्या समोरून वहात असलेला तो तुफानी कालौघ, घनगर्जना करीत पुढें जात असतां पधरा महिन्यांचा काळ लोटला तरी डॉक्टरना आपली नौका इच्छित स्थळाला अजून लावतां आली नव्हती उलट क्रांतीचा जोर त्या डिसें-बरच्या दिवसांत तर इतका वाढला कीं, दक्षिण फ्रान्सच्या जलवाहिनींच पाणी, रात्रदिवस त्यांत येऊन पडणाऱ्या असख्य प्रेतांच्या गर्दीनें गुदमरून गेलें, आणि हजारों जीवांच्या रक्तस्नानानें भूमाता गारठून गेली तरीहि पण धीमेपणानें डॉक्टरांचा व्यवहार चालूच होता त्यांना ओळखीत नव्हती अशी एकहि व्यक्ती आतां पॅरिसमध्यें नव्हती पण किती चमत्कारीक परिस्थितींत ! तुरु-गाच्या आवारांत किंवा रुग्णालयांत, सारख्याच तन्मयतेनें नि सदयपणानें आपल्या कौशल्याचा फायदा सर्वांना सारखाच देत हिंडत असलेली त्यांची मूर्ती, आपल्या प्रभावी व्यक्तिमत्वानें त्या अराजक पॅरिसमध्यें नेहमींच उठून दिसे. त्यांच्याविषयीं कोणी कसलीच शंका कधीं प्रदर्शित केली नाहीं कीं त्यांना कोठें कुणी अडवल नाही. सगळीकडेच त्याना जसं मुक्तद्वार होत पण—!

....५....

पधरा महिन्यांच्या या दीर्घ कालावधींत ल्यूसीला आपल्या जीवितेश्वराचं जीवित एक दिवसहि पूर्णपणें सुरक्षित असल्यासारखं कधीं वाटलं नाहीं जीवन मरणाचा नाजुक ताजवा सारखा खाली वर होत तिचं जीवन कष्टमय करून टाकीत होता वधस्थानाकडे जात असलेल्या राजबंदींनीं भरलेल्या गाड्या पॅरिसच्या रस्त्यावरून धडधडत जाऊं लागल्या, कीं तिचा जीव चार्लससाठीं खालवर होऊं लागे सुकुमार मुग्ध बालिका, सुंदर नवयौवना, सुकेशी, सुहास्य-वदना प्रमदा नि पुरंध्री, तरणेबांड उमदे जवान, आणि धीरगंभीर प्रौढ, गलित-गात्र जरठ, उच्च कुलीन, कुलीन नि अकुलीन सारे एकाच दावणीला बांधलेले त्या भीषण ला गिलोटिनचे दुर्दैवी दुबळे बळी, तिच्या समोरून रोज तिच्या हृदयाचा थरकांप उडवीत स्वर्गद्वाराकडे ओढले जात होते या नरबलींचा नैवेद्य त्या क्रूर कालीला रोज अर्पण होत होता तरीहि तिची वकासुरी भूक मात्र अद्याप शांत होत नव्हती

चार्लसच्या बंदीवासाची ती आकाशची कुऱ्हाड तिच्या मस्तकावर आक-स्मिकपणें पडल्यामुळें आरंभीं ल्यूसीचे सर्व मनोव्यापार नि कार्यव्यापार एकदम थिजल्याप्रमाणें कांहीं काळ पूर्ण स्थगित झाले होते. पण कांहीं विलक्षण आत्म-सामर्थ्यानें तिनें मन संयमन करून आपलीं रोजचीं कर्तव्यें निष्ठुरपणें पार पाड-ण्यास मग प्रारंभ केला. आपत्तीच्या कालांत धाकून न जातां दुर्दम्य उत्साहानें कर्तव्याला चिकटून राहण्याची सज्जनांची परंपरा, ल्यूसीहि मोठ्या चिकाटीनें नि मिटल्या ओठानें पार पाडीत होती. पॅरिसमधल्या आपल्या नवीन मकाणांत आल्यापासून, जणुं काय कांहींच घडलं नाहीं अशा आविर्भावानें तिचा गृह-व्यापार सुरू झाला होता आपला पती घरांत असल्यासारखींच प्रसन्न वृत्तीनें ती सर्व व्यवहार उरकीत होती लंडनमध्ये असल्याप्रमाणें तिच्या त्यर्भाचें शिक्षण नियमानें चालू होतें कामावर गेलेल्या पतीची वाट पहात त्याच्या पुस्त-कांची वस्त्रप्रावरणाची वगैरे सर्व व्यवस्था जणुं काय तो आत्ता परत येणार आहे, अशा भावनेनें उरकीत आपल्या मनाचें ती समाधान करण्याचा प्रयत्न करी. बाहेरून अत्यंत शांत दिसणाऱ्या त्या अथांग गंभीर सागराच्या पोटांत सतत जळत असलेल्या वडवाग्नीची कल्पना, तिच्या सर्व व्यापारांकडे पाहून कोणा-

लाच आली नसती. स्वत च्या केशवेशभूषेकडेहि तिनें कधीं दुर्लक्ष केलें नाहीं एक वस्त्रप्रावरणांतील वैभव जाऊन त्यान्च्या जागीं काय साधेपणा आला असेल तेवढाच. पण बाकीचा सारा सहज नि म्हणूनच सुभग असा नीटनेटकेपणा तिला कधींच सोडून गेला नव्हता पण गालावरच्या नाजुक लाल छटा जाऊन तिथें पांडुरता मात्र दिसू लागली होती आणि चेहेऱ्यावरील विचारव्यग्रतेची ती जुनी छाया आता कायम बसल्यासारखी वाटत होती. तिच्या मोहक सौंदर्यांत दुसरा कांहींच बदल झाला नव्हता.

पण रात्रीं कधीं कधीं आपल्या वडिलाचा निरोप घेऊन उठता उठतां, सर्व दिवसभर दृढ निश्चयानें दाबून ठेवलेल्या तिच्या भावना जोरानें वर उफाळून आपल्या पित्याच्या खांद्यावर मान टाकून ती हमसाहमशीं रडू लागे, आणि जगातील आतां तिचा एकमेव आधार नि विश्रामस्थान असलेल्या आपल्या पित्याकडे करुण लोचनाना ती पहात राही आणि तिचा तो धीरोदात्त पिता मोठ्या हळुवारपणें तिला कुरवाळीत आपल्या निश्चयी स्वरांत तिला मग आश्वासुन धीर देई. “ माझ्या कानावर आल्याशिवाय त्याच्या केसालाहि धक्का लागणार नाहा, ल्यूसी. आणि माझं मन मला सागत आहे कीं, अजूनहि मी त्याला वांचवीनच वांचवीन ' '

आणि याला कांहीं दिवस लोटले नाहींत तों डॉक्टर एक दिवस तिला सागत आले कीं, चार्लसची दृष्टि भेट तिला होणं आतां कदाचित सभवनीय आहे. रस्त्याच्या बाजूला असलेल्या भितीच्या एका खिडकींतून त्याला रस्त्याचा कोपरा नीट पहाता येतो. त्या ठिकाणा जर ती जाऊन उभी राहिली तर दोघांची दृष्टि-भेट होणं कधीकाळी शक्य आहे नक्की होईल असं मात्र सांगतां येत नाहीं. मनाची निराशा होऊं न देता तपश्चर्या मात्र केली पाहिजे आणि त्या तपश्चर्येला जरी फळ आलं तरीहि एक सावधगिरी मात्र ठेवण जरूर आहे आणि ती म्हणजे कसल्याच खाणाखुणांनी आपलं अस्तित्व मात्र त्याला तिनें कळवायचं नाहीं यात जर चूक झाली तर परिणाम मात्र भयकर होतील, हें ध्यानात ठेव.

त्या दिवसापासून दुपारचे दोन वाजले कीं, डॉक्टरनीं दाखविलेल्या रस्त्या-वरील नाक्याजवळ ल्यूसी चार वाजेपर्यंत न चकतां हजर राही. हवा बरी असली कीं छोटी ल्युसीहि आपल्या आईचा हात धरून त्या नाक्यावर घुटमळत राही. पण ठराविक वेळीं न चुकतां होत असलेली तिची ही वारी कुणाच्या लक्षात न

येणं अशक्य होतं साधारण अंधारा नि कोपऱ्यावर लहानशी एकच झोंपडी असलेला असा तो एकांत कोपरा होता. तिसऱ्याच दिवशीं त्या झोंपडीच्या मालकाचें तिच्याकडे लक्ष गेलें. हातातील एका लहान करवतीनें लांकडाचे लहान लहान ऑंडके चिरण्याचें त्याचें काम चालू होतें.

" गुड डे सिटिझनेस " तिसऱ्या दिवशीं त्यानें ल्यूसीला हटकलें.

" गुड डे सिटिझन. "

अभिवादनाचा हा नवीन प्रकार कायद्यानें सक्तीनें आतां सर्वत्र जारी केला होता.

" आज परत आलात, सिटिझनेस ? "

" असं खर, सिटिझन. "

तो आरकशी — एके काळचा तो बोन्हेमधील रस्ता कामगार — तिच्याकडे एकदां नीट निरखून पाहून मग समोरील तुरुगाच्या भिंतीकडे पाहू लागला. आणि मग थोड हसत तुरुगाकडे बोट दाखवून आणि आपल्या हाताची दहाही बोटें तोंडासमोर धरून, त्यांतून खिडकींतून पाहिल्यासारखा, तो समोर पाहू लागला.

" पण मला काय करायचय म्हणा ! " अस मोठ्यानें पुटपुटत आपली करवत त्यानें चालू केली

दुसऱ्या दिवशीं तर तो तिची वाटच पहात होता आणि ती दिसल्याबरोबर त्यानें तिला कालच्या सारखीच सलामी दिली.

" ह ह ! आज बरोबर छोकरीहि आणली आहे वाटत, सिटिझनेस ? पण मला काय करायचय ! आपल काम फक्त एवढच ही पहा आमची करवत आमची छोटी गिलोटिन बरका ही ती मोठी नि ही छोटी ! ल–ल,–ल,–ल,–लल्, खर्र खस, खर्र खस ! कीं खलास, गळलच त्याचं मुडक ! " खालीं गळून पडलेला तुकडा टोपलींत फेंकीत तो म्हणाला.

"आमची रोजची हीच कामागिरी, हे असे बळी करायचे तयार त्या छोटीच्या जोरावर हें पहा दुसर ! र–र–र–र–री, र–र–र–र–री, खर्र खस, खर्र खस ! कीं गळलच तिच मुडक ! आणि आतां हें वळ्ड, बर का, खुसु खुसु, घुसु घुसु, र–र–र–र–री; कीं उडालच तें पण ! म्हणजे झालीं तो–ती–तें एकदमच खलास ! वा जी वा ! "

त्याच्या त्या शब्दांबरोबर ल्यूसीच्या आंगावर भयानें कांटा उभा राहिला. पण तो तिथें असताना त्याला न दिसता तस उभ राहणहि अशक्यच होतं. म्हणून रोज आल्याबरोबर दुर्जन प्रथम या न्यायानें त्याची खुष खबर विचारून नि मधून मधून त्याला मुखलेप देण्यास तिनें सुरवात केली. पण त्याच्या चांभार चवकशा तरी चालूच होत्या. आणि कधीं आनदाच्या भरांत त्याच अस्तित्व विसरून तुरुगाच्या भिंतींतील त्या खिडकीकडे ती पहात असतां मध्येंच भानावर येऊन तिनें मागें पाहिलें तर, आपलें काम थांबवून नि समोरील बांकावर ढोपे टेकून तिच्याकडे एकाग्र नजरेनें पहात असतांना तो तिला दिसे. पण तिचें तोंड त्याच्या दिशेनें वळताच आपली करवत पुन्हां चालू करीत, "पण — मला काय करायचय ' " अस तो नेहमीं पुटपुटे.

कोणत्याहि अडीअडचणींना न जुमानता ल्यूसीची ही दैनिक तपश्चर्या चालूच होती तिला त्याचें स्पष्ट मुखदर्शन कधीच झाल नाहीं पण त्यान मात्र तिला पांचसहा वेळां पाहिल्याच डॉक्टरनी तिला सांगितल याच समाधानाच्या जोरावर, केवळ आपल्या पतीला मिळणाऱ्या त्या दृष्टि सुखाच्या समाधानावर, ती न चुकता त्या रस्त्याची वारी करीत होती

त्या दिवशीं ती घराबाहेर पडली त्या वेळीं बर्फाचा बारीक पाऊस पडण्यास सुरुवात झाली होती. डिसेंबरांतील तो कत्तलचा दिवस होता. सर्व रस्ताभर जिकडे तिकडे गुढ्या तोरणें उभारून आनदोत्सव चालू असल्याचें तिला दिसत होतें प्रत्येक दारासमोर, वर लाल टोप्या घातलेले नि तीन रगी फितीनीं गुडाळलेले असे लहान मोठे भाले उभारलेले होते त्यांच्या खालीं फडफडणाऱ्या निशाणावर, तिरगी अक्षरांत एकच घोषवाक्य लिहिलेल होत. अखड नि अविभाज्य लोकराज्य, स्वातत्र्य, समता, बधुभाव, नाहींतर मृत्यू !

कोपऱ्यावरील त्या अरकशाच्या झोपडीवरहि लोकराज्याची ही अभिनव गुढी डौलानें डोलत उभी होती आणि झोपडीच्या खिडकींत त्याची करवत, "छोटी सेंट गिलोटिन" ही लालरगी अक्षरें आंगावर पसरून विराजमान झाली होती. पण त्या दुकानाचें दार बद होतें आणि त्याच्या मालकाची मूर्तिहि आसपास कुठें दिसत नव्हती. ल्यूसीला आज चांगलाच एकांतवास सांपडला होता.

पण तिचा तो एकात फारच थोडावेळ टिकला, कारण तिच्याच दिशेनें कसला तरी भयकर ओरडा घुमत घुमत सारखा पुढें येत होता. आणि एक

दोन क्षणांतच चारपांचशें लोकांचा एक जमाव भुतासारखा नाचत ओरडत नि आंगाभोंवती पिंगा घालीत, तुरुंगाच्या भिंतीला वळसा घालून तिच्याकडे आला. आपले दांतओठ आवळून विक्राळपणें क्रांतिगीत उच्चस्वरात ओरडत, पायांतील बुटांच्या नि हातांच्या कर्कश टाळ्यांच्या ठेक्यावर बेहोषपणें ते सारखे नाचत होते. त्यांच्या आघाडीलाच तो अरकशी नि करालकाली हातांत हात घालून नि डोक्याला डोकें भिडवून उन्मत्तपणें नाचत होतीं. स्त्रीपुरुष, स्त्री स्त्री किंवा पुरुष पुरुषच — जसा जवळ कोणी गांठेल तसे हातांत हात अडकवीत नि गळयांत गळे घालीत भसाड्या आवाजांत ते गात नाचत होते. तांबड्या लाल उसळत्या नाचत्या टोप्यांचा जमा कांहीं एक छोटासा समुद्रच ल्यूसी सभोंवार आतां नाचत होता त्या छोट्या समुद्रावर उठणाऱ्या कितीतरी लाटा मारख्या मागेपुढें उसळत होत्या जोरानें टाळ्या पिटीत, एकमेकांची डोकीं घट्ट पकडून, किंवा आपलेंच डोकें घट्ट पकडून स्वत भोंवतीं पिंगा घालीत ते सारे तिच्या भोंवतीं गिरागिरत होते, मधूनच श्रांत होऊन खालीं कोसळत होते आणि परत वर उठून मागें जात एकदोन क्षण थांबून, आणि परत टाळयाचा गजर करीत, क्रांति गीताचें आक्रदन विक्राळपणें सुरू करून स्वत भोंवतीं गिरगिरत ते बेहोषपणें परत नाचत होते नृत्यगायनाची ती स्वर्गीय कला, आज अशी विकृत भेसूर स्वरूपांत, काहीं अवर्णनीय अशा राक्षसी रूपात, त्या ठिकाणीं आता किती वेळ तरी थयथयाट करीत नाचत ओरडत होती.

त्या आनंद महोत्सवाच्या दिवशींचा तो कारमॅनिओल — क्रांतिगीत नि नृत्य — कांहीं वेळानंतर तसाच पुढें निघून गेला भयानें गर्भगळित झालेली ल्यूसी, दुकानाच्या दारांत जीव मुठींत धरून तो सारा वेळ उभी होती. आणि पांढरे शुभ्र, बारीक मऊमऊ हिमतुषार तिच्या सभोंवार शांतपणें खालीं पडत जमीनीवर मऊ रुजामा पसरीत होते

" बाबा, बाबा ' किती भयंकर, किती क्रूर दृश्य हें ' " तिच्याजवळ येऊन पोंचलेल्या डॉक्टराकडे आपल्या डोळयांवरील हात काढून पहात ती म्हणाली.

" खरच पोरी, भयंकर खरच ' पण अशी भेदरून नको जाऊ त्यानें माझ्या परिचयाच आहे हे सार तुझ्या आंगाला नाहीं कुणी हात लावणार "

" माझी स्वत ची नाहीं मला भीति वाटत. पण चार्लसची आठवण झाली कीं या सैतानांची — "

" लौकरच आपण त्याला या सैतानांपासून सोडवू. तुला सांगण्यासाठींच आलों आहे मी कीं तो त्या खिडकींत आत्तां उभा आहे आणि आसपासहि इथें आतां कुणी नाहीं आहे त्या उंच छपराकडे आपला हात खुशाल हलव तू पण तुला दिसणार मात्र नाहीं, माझे बाई तो ' "

" नगं दे बाबा, पण हेंहि सुख कांहीं थोड नाहीं ' " त्या भिंतीच्या दिशेनें अश्रु गाळीत पहात नि हाताचें चुंबन तिकडे फेकल्यासारखें करीत ती म्हणाली.

कुणाच्या तरी पाऊलाचा आवाज झाला मॅडम डेफार्ज ' " गुड डे, सिटिझनेस, ' डॉक्टर म्हणाले " गुड डे सिटिझन, " जातां जाता उत्तर आलें अधिक कांहींच नाहीं त्या बर्फाच्छादित पांढऱ्या शुभ्र रस्त्यावरून एखाद्या कृष्ण छायेसारखी मॅडम डेफार्ज निघून गेली

" चल आता पोरी, पकड माझा हात त्याच्यासाठीं आतां धीर न सोडतां हसत मनानें चल ह आतां ठीक, उद्यां सुनावणी आहे त्याची "

' उद्यां ! '

" होय, एक क्षणाचीहि आपल्याला आतां फुरसत नाहीं माझी जरी पूर्ण तयारी असली तरी आता सुनावणी जाहीर झाल्याबरोबर कांहीं गोष्टी मला करायला हव्यात. याच्या आधीं त्या करणं शक्य नव्हत चार्लसला अजून समन्स लागायच आहे, पण मला थोडं आधी समजल इतकच घाबरली नाहींस ना पण तू ? '

" तुमच्यावर पूर्णविश्वास आहे माझा, बाबा, " गुदमरल्या आवाजात ती म्हणाली.

" ठीक पोरी, तसाच राहूदे तो तुझ्या जीवाची ही धाकधूक आता संपत आली आहे, बाळ, कांहीं तासांतच तुझा ठेवा तुला परत मिळेल. शक्य तेवढ भक्कम कवच त्याच्या आंगावर मी चढवल आहे पण चला आतां, मला लॉरींना भेटल पाहिजे "

ते थांबले जवळून रस्त्यावरून धडधडत जाणाऱ्या त्या गाडीचा आवाज त्याच्या कानावर आला. त्याचा अर्थ त्या दोघांनाहि पुरा ठाऊक होता एक, दोन, तीन, नरबली भरलेले तीन खटारे त्या भीषण वधस्तंभाकडे धडधडत जात होते

" मला लॉरींना भेटल पाहिजे, " तिला दुसऱ्या बाजूला वळवीत डॉक्टर म्हणाले.

तो कर्तव्यनिष्ठ जीव आपल कर्तव्य करीत आपल्या ऑफिसांत अजून बसलाच होता, आपली जागा सोडून ते कुठेंच गेले नव्हते. त्यांना आणि त्यांच्या जमा-खर्ची चोपड्यांना मात्र लोकराज्याच्या नवीन न्यायालयांत पुष्कळ वेळां हजर रहाव लागत होत त्यांच्या ताब्यांतील कितीतरी ठेवी जप्त होऊन राष्ट्राच्या मालकीच्या होत होत्या. पण त्यांना शक्य होत तेवढ करून जें काय वांचवितां येईल तें तें मि लॉरी आपल्या ठेवीदारांसाठीं वांचवीत होते, आणि त्यांच हें धिमेपणाने चाललेल काम त्या अराजक काळात दुसर कोणी करण केवळ अशक्यहि होत.

वर आकाशात काळसर लाल पिवळा रग आतां पसरत होता आणि सीन नदीच्या पृष्ठभागावरून वर उसळत असलेल दाट धुक रात्रीची सूचना देत सथपणें सभोंवार दाटत होत बॅंकेची ती एकेकाळची भव्य इमारत आतां ओसाड आणि मोडकळलेली दिसत होती. सभोंवार पसरलेल्या काळोख्यांत, चौकात पसरलेल्या मातीच्या ढिगारावर एक पाटी अस्पष्ट अशी दिसत होती. राष्ट्रीय मालकी. लोकराज्य एक जिनसी नि अविभाज्य स्वातत्र्य, समता आणि बधुभाव किंवा मृत्यू '

पण खुर्चीवर कोट काढून ठेवलेले, लॉरींजवळ आतां बोलत असलेले हे गृहस्थ कोण, नि ते असे बाजूला कां सरत आहेत ? नि त्यांच्या जवळून उठून येतांना लॉरी असे गोंधळल्या सारखे नि चकित का दिसत आहेत ? आणि मागें वळून पहात आपला आवाज चढवीत ल्यूसीच्या तोंडून आतां ऐकलेले शब्द कोणाला तरी सांगितल्यासारखे, " उद्यां सुनावणी आहे, " हे शब्द ते परत मोठ्यानें कां उच्चारीत आहेत ! कोण आहे तें तिकडे त्यांच्या खोलींत ?

— — -- ——

.... ६ ....

" चार्लस एव्हरमॉड, ऊर्फ डार्ने ! " कोर्टांत पुकारा झाला, आणि चार्लस कैद्याच्या राखीव जागेंत जाऊन उभा राहिला तो तेथें येऊन उभा राहिला कीं नाहीं हें पहाण्यासाठीं ते गलेलठ्ठ जेलरसाहेब जरा थांबले आणि मग त्यांच्या डोळ्यांची खात्री पटल्यानंतर इतर तेवीस आरोपींची नावें पुकारण्यास त्यांनी सुरुवात केली. यादीचें वाचन संपून ते सर्व दर्दैवी राजबंदी आपल्या सोबत्यांचा घाईघाईनें निरोप घेऊन मृत्यूशीं सामना देण्यासाठीं धीर गभीरपणें न्यायासना-समोर खडे झाले. त्यांच्याकडे परत एकवार दृष्टि टाकून ते गलेलठ्ठ जेलर-साहेब, " चार्लस एव्हरमॉड, ऊर्फ डार्ने, " असा परत एकदां पुकारा करून, त्यांच्या अजस्र देहाला तेवढाहि त्रास सहन न झाल्यानें आंगावर निथळत असलेला घाम कोटाच्या बाहीनें पुशीत खालीं बसले.

चार्लसनें आपल्या सभोंवार दृष्टि टाकली समोर उच्चासनावर न्यायाधीश आणि ज्यूरी पिसाच्या टोप्या परिधान करून गभीरपणें बसले होते. पण आस-मतांत मात्र लाल टोप्याच जिकडे तिकडे पसरलेल्या दिसत होत्या. प्रेक्षकांच्या नि न्यायाधिकाऱ्यांच्या जमावावर दृष्टि टाकतांच, सृष्टिक्रम उलटापालटा होऊन सज्जनांचा न्यायनिवाडा करण्यासाठीं दुर्जनांचा मेळावा त्या ठिकाणीं एकवट-ल्यासारखें दिसत होतें. समाजांतील खालच्या थरांतील गाळीव, निवडक, असा भाग तिथें गोळा झाला होता. न्यायइन्साफाची सर्व सूत्रें त्या क्रूर बदमाष नर-पशूंच्या हातात आतां आलीं होतीं, आणि ही सर्व भूतावली आपल्या समोरील नरबलींच्या रक्त प्राशनासाठीं अधीर होऊन जिभल्या चाटीत, परस्परांजवळ निरर्गल बकवा करीत, टाळ्या पिटीत मधूनच उत्तेजनार्थ किंवा निषेधार्थ ओर-डत बसली होती. त्या प्रत्येकासमोर नानातऱ्हेच्या शस्त्रांची एकच गल्लत उडाली होती. प्रेक्षक समुदायांतील त्यांच्या सहधर्मचारिणीहि हातांत चाकू, सुरे, खंजीर घेऊन खाद्यपेयांचा मनसोक्त समाचार घेत, किंवा हातांतील सुयांनी विणकाम करीत हसत खिदळत बसल्या होत्या त्यांच्याकडे पहातांच असंख्य डाकिनींचा मेळावाच त्या ठिकाणीं जमला आहे असें वाटत होतें. त्या मानवी पिशाचाच्या अग्रभागीं डेफार्ज नि मॅडम डेफार्जच्या मूर्ती विराजमान झाल्या होत्या. मॅड-मच्या हातांतील अपुरें विणकाम अजून चालूच होतें. चार्लस त्यांच्याकडे पहात

असतां तीं दोघमात्र वर त्याच्याकडे मुळींच पहात नव्हतीं, पण डेफार्जच्या कानात मॅडमची कांहींतरी कजबूज मात्र मधून मधून सारखी चालू होती ताठर निश्चयानें कसली तरी वाट पहात नि मधूनच ज्यूरीकडे दृष्टीक्षेप करीत तीं दोघ बसलीं होतीं न्यायाध्यक्षांजवळ डॉक्टर मॅनेट आपल्या रोजच्या पोशाकांत बसले होते त्यांच्याच थोडे बाजूला लॉरींची मूर्तीहि शांतपणें बसलेली दिसत होती.

सरकारी वकील उभे राहिले. "चार्लस एव्हर मॉड, ऊर्फ डार्ने, लोकराज्याच्या नवीन नियमांनुसार तुझ जीवित आतां तुझ्या मालकीच राहिल नाहीं. तू फ्रान्समधें परत आल्यानतर जरी तो कायदा समत केला गेला असला तरीहि त्याचे हात मागें जाऊ शकतात, हें ध्यानांत ठेव. तुला फ्रान्समध्यें कैद केल आहे आणि तुझ्या मस्तकासाठीं लोकमत्ता अधीर झाली आहे."

"उडवा, उडवा त्या राजद्रोह्याच डोक !" लोकसत्तेनें एकदम गर्जना केली.

अध्यक्षांनीं घटानाद करून लोकसत्तेला शात करण्याचा प्रयत्न केला आणि विचारलें, "इग्लडमध्यें तू रहात होतास हें खर आहे ?"

"होय, सत्य आहे तें"

"मग तू परागदा नाहीस काय ?"

"त्या कायद्यानें मी परागंदा ठरतों, अस मला वाटत नाहीं"

"त्याचीं कारण सांगतां येतील काय ?"

"होय आज ज्या अर्थानें परागदा हा शब्द कोर्ट वापरीत आहे, तो अर्थ त्या शब्दाला येण्यापूर्वी कितीतरी वर्षे, मी आपखुशीनें मला अनेक कारणांनीं अप्रिय असलेल्या मार्किसच्या पदवीवर नि स्थानावर पाणी सोडून, फ्रान्सचा किनारा मी सोडला होता आणि करांच्या ओझ्याखालीं वाकलेल्या सामान्य जनतेच्या, घाम गाळून मिळवलेल्या पैशावर खुशाल चैंढूचें जीवन व्यतीत न करता, आजपर्यंत स्वत च्या निढळाच्या घामावरच मी जगत होतों; हें एकच कारण मी सागु इच्छितों."

"याचा पुरावा दाखल करतां येईल ?"

चार्लसनें अलेक्झॅडर मॅनेट नि थिओफिल् गॅबेल अशीं दोन नांवें पुरावा म्हणून दाखल केलीं.

"पण तू इग्लडमध्यें विवाहबद्ध झालास, नाहीं ?" अध्यक्षांनीं विचारलें.

" होय, पण माझी पत्नी फ्रेंच आहे."

" जन्मजात ?"

" होय, जन्मजात "

" तिचं नाव गांव ?"

" ल्यूसी मॅनेट, या आपल्याशेजारींच बसलेल्या डॉक्टरांची एकुलती एक कन्या "

या शब्दांचा श्रोत्यांवर जादूसारखा परिणाम झाला आणि डॉक्टरांच्या जय घोषानं सर्व वातावरण दणाणून गेलें आणि आतापर्यंत चार्लसकडे खाऊ की गिळू अशा वृत्तीनें पहात असलेल्या काहींच्या डोळ्यांतून तर सहानुभूतीचे अश्रु पाझरू लागले

आतापर्यंतची चार्लसची जबानी डॉक्टराच्या सांगीबरहुकूम अगदी तंतोतंत चालली होती एकाद्या कुशल सॉलिसिटरप्रमाणें चार्लसनें टाकावयाचें प्रत्येक पाऊल त्यानीं अतिशय सावधगिरीनें ठरविलें होतें, आणि चार्लसची सर्व वाट बिनधोक केली होती

" मग आतां परत फ्रान्समध्यें कां आलास, आणि याच्या आधीं कां नाहीं ?"

" एकच मुख्य कारण म्हणजे, इस्टेटीवरील हक्क मी स्वखुशीनें सोडला असल्यामुळें उदरनिर्वाहाचें साधन मला येथें काहींच उरलें नव्हतें. इंग्लंडमध्येंहि मी शिकवण्या करून पोट भरीत होतों आणि एका फ्रेंच नागरिकाचें जीवित धोक्यांत असल्यानें त्या नागरिकाच्या लेखी विनतिवरूनच, स्वतःच जीवित धोक्यांत टाकूनहि त्या नागरिकाचा जीव वाचविण्यासाठीं, मी येथें आलों. लोकराज्याच्या दृष्टीनें हाहि गुन्हाच ठरतो काय ?"

" नाहीं, नाहीं !" अशी एकमुखानें गर्जना झाली, आणि अध्यक्ष महाशयांना त्यांना शांत करण्यासाठीं परत एकदां घंटानाद करावा लागला पण त्याचा कांहीं उपयोग न होतां तो " नाहीं नाहीं !"चा ओरडा तसाच चालू राहून काहीं वेळानें आपोआप शांत झाला

त्या नागरिकाचें नांव काय म्हणून अध्यक्षांनीं विचारतांच साक्षीदार नंबर दोनच्या नांवाकडे चार्लसनें बोट दाखविलें आणि आवश्यक असेल तर त्यानें

लेहिलेलें पत्रहि — त्याच्या जवळून चौकीवर काढून घेतलेलें — अध्यक्षां-
समोरील कागदांत कदाचित त्यांना सांपडेल म्हणून त्यानें सांगितलें.

अध्यक्षांना तें तसें सांपडण्याची व्यवस्था डॉक्टरनीं मोठ्या धोरणानें आधीच
केली असल्यानें तें पत्र कोर्टांत वाचलें गेलें नि गॅबेलच्या साक्षीस प्रारंभ झाला.
यानें शपथेवर तें पत्र आपणच लिहिलें असल्याचें कबूल करून एव्हरमॉंड
साठींच आपल्याला आतांपर्यंत तुरुंगवास भोगावा लागला होता आणि गेल्या तीन
दिवसांपूर्वींच एव्हरमॉंड आतां कोर्टाच्या ताब्यांत आला असल्याची खात्री
पटल्यामुळें ज्यूरीनें त्याला मुक्त केला, असेंहि त्यानें कोर्टास निवेदन केलें

डॉक्टरांच्या जबानीस मग सुरुवात झाली. त्यांची प्रभावी लोकप्रियता नि
कोर्टाच्या प्रश्नांना येत असलेलीं त्यांची सुस्पष्ट उत्तरें, यांचा लोकमतावर कांहीं
विलक्षणच परिणाम होत असल्याचें दिसून येत होतें. आपली त्या दीर्घ तुरुंग-
वासानतर सुटका होताच, चार्लसचा हातच प्रथम स्नेहभावानें त्यांच्यापुढें झाला
होता, त्यांच्या इंग्लंडमधील वास्तव्यांत त्यांची नि त्यांच्या कन्येची त्यानेंच
मोठ्या आस्थेनें काळजी घेतली होती नि हरतऱ्हेची मदत त्याना दिली होती,
जुलमी सत्तेचा अभिमान तर त्यानें कधींच दाखविला नाहीं, उलट इंग्लंडमध्यें
इंग्लंडचा शत्रू नि युनायटेड स्टेट्स्चा दोस्त म्हणून त्याच्यावर खटलाहि भरला
गेला होता. ही सर्व हकीगत डॉक्टर अतिशय कुशलतेनें पण नि संदिग्धपणें
लोकांसमोर मांडीत असतां, त्यांच्या सत्यनिष्ठेच्या नि स्पष्टवक्तेपणाच्या प्रभावानें
ज्यूरी नि लोकमताचें जोरदार ऐकमत्य हळूहळू तयार होत होतें आणि अखे-
रीस, कोर्टांत आत्तां हजर असलेले ते इंग्लीश सद्गृहस्थ मि. लॉरी, चार्लस-
वरील त्या खटल्याचे वेळीं प्रत्यक्ष हजर असल्यामुळेंच आपल्या शब्दांची साक्ष
ते देऊ शकतील म्हणून डॉक्टरांनीं सांगतांच, ज्यूरीनें आपल्याला आधिक
कांहींहि ऐकण्याची आतां इच्छा नसून कोर्टाला आपलें मत सांगण्यास आपण
पूर्ण तयार आहों असें निक्षून सांगितलें.

चार्लसच्या निरपराधित्वाचा पुकारा ज्यूरीच्या प्रत्येक मताबरोबर होऊं
लागून लोकमताचा वारा त्याच्या बाजूनें जोरानें घोंघाऊ लागला आणि न्याया-
ध्यक्षानें निरपराधी चार्लसला एकदम बंधमुक्त करण्याची आज्ञा केली.

आणि मग कांहीं विलक्षण गोंधळ त्या न्यायासनांत कांहींवेळ माजून राहिला.
आतांपर्यंत डोळ्यांत खून चढलेले आणि कैद्याच्या रक्तपानासाठीं आतुर झालेले

ते असंख्य जीव, लहरी आनंदाच्या उन्मादांत नाचत नि डोळ्यांतून आनंदाश्रु गाळीत चार्लसला कडकडून भेटण्यासाठीं त्याच्याकडे धांव घेऊ लागले. दैवाचा फासा उलटा पडता तर, जे हात त्याच्या देहाचे राईराई एवढे तुकडे करण्यास मागें सरले नसते, तेच आतां आसुसल्या हातांनीं चार्लसला कवटाळीत होते. त्याच्या त्या आवेगी लहरी प्रेमाविष्काराखालीं गुदमरून जाऊन चार्लस खालीं पडण्याच्या बेतात आला होता पण तीच प्रेमाविष्काराची तुफानी लाट त्याला सुरक्षितपणें आपल्या खांद्यावर नाचवीत बाहेर पडत होती. डॉक्टरांच्या समवेत कोर्टाबाहेर पडतांच चार्लसनें आपल्या सभोंवार पाहिलें कोर्टात त्यांच्याभोंवती पसरलेले तेच ते असंख्य चेहरे त्याच्या भोंवतीं आतांहि विखुरलेले दिसत होते. पण अघाडीवर असलेले ते दोन चेहरे मात्र त्याला कुठेंच दिसत नव्हते त्यानें नीट इकडे तिकडे निरखून पाहिलें पण व्यर्थ त्या दोन्ही व्यक्ती — तीं डेफार्ज पतिपत्नी — तेथून केव्हांच अदृश्य झाल्या होत्या

कोर्टाबाहेरील त्यांच्या मिरवणुकीस आता सुरुवात झाली कोर्टांतीलच एक खुर्ची आणून त्यावर एक लाल निशाण आंथरून नि पाठीशीं एका भाल्यावर लाल टोपी उभी करून त्या खुर्चीतून चार्लस, आणि त्या वेड्यापिशा लोकांच्या खांद्यावर डॉक्टर, अशी त्यांच्या घराकडे मिरवणूक चालू झाली. तांबड्या लाल टोपयाचा एकत्र समुद्र त्या दोघांच्या सभोंवार उच उसळत होता, त्यांच्या नावाचा जयघोष आसमतात दुमदुमत होता आणि त्या लाल समुद्राला भरती येत येत ती मिरवणूक पुढें जात होती वाटेंत येणारा जाणारांना घट्ट आलिंगन देत आणि चार्लसच्या खुर्चीकडे आनदानें बोट दाखवीत ती लाट नाचत नाचत डॉक्टरांच्या निवासस्थानाकडे येऊन पोंचली. चार्लसच्या मुक्ततेची आनदवार्ता सांगण्यासाठीं डॉक्टर पुढें झाले होते आणि मग चार्लस दारांत उभा रहा-तात्र धांवत पुढें आलेली ल्यूसी आनंदातिरेकानें त्याच्या बाहुपाशांत देहभान विसरली —

तिला आपल्या हृदयाजवळ घट्ट धरून नि तिच्या मस्तकावरून हळुवारपणें हात फिरवीत चार्लसचे अश्रुक्लिन्न भुकेले ओठ तिच्यावर अविरत चुंबनांचा वर्षाव करीत होते, आणि तिकडे समोर, त्या आलिंगनबद्ध पतिपत्नींकडे पहात नि क्रांतिगीतांचें उच स्वरांत गायन करीत इमारतीच्या चौकांत तो लाल समुद्र बेहोषपणें नाचत होता जरा वेळानें मग आपल्यांतीलच एका तरुण स्त्रीस त्या

रिकाम्या खुर्चीवर बसवून, त्या स्वातंत्र्य देवतेचा जयजयकार करीत नाचत नाचत तो जनसमुदाय चौकाबाहेर पडून रस्त्यावरून पुढें सरकला आणि मग नदीकाठानें, वाटेंत येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस एकाद्या जोरदार आवर्ताप्रमाणें आंत खेचीत सारखा फुगत फुगत पुलापलीकडे गिरागिरत दिसेनासा झाला

एकाद्या विजयी वीराप्रमाणें आनदानें त्यांच्याकडे पहात उभ्या असलेल्या डॉक्टरांचा हात कृतज्ञपणें घट्ट धरून चार्लस कांहीं वेळ भरल्या हृदयानें काही न बोलतां उभा होता. आणि बाहेरील त्या जनसमुद्राच्या उधानास तोंड देत आतां धांपा टाकीत आंत प्रवेश करीत असलेल्या लॉरींचा हातहि त्यानें आवेगानें घट्ट दाबला मिस प्रॉसचाहि हात मग जोरानें हलवून तिनें पुढें केलेल्या ल्यूसीनें गळयाला मिठी मारतांच तिला वर उचलून त्यानें तिचें प्रेमभरानें चुंबन घेतलें नि आतां आपल्या प्रिय पत्नीला आपल्या बाहूंत घट्ट कवटाळून, आणि एकाद्या सुकुमार फुलासारखी तिला वर उचलून आंतल्या खोलीकडे तो चालला होता.

"ल्यूसी, ल्यूसी, माझ्या प्राणा!" तिच्या कानात तो कुजबुजत होता

"ओ चार्लस, चार्लस, त्या दयाघनाचे किती उपकार आहेत हे!" खालीं गुडघे टेंकून आपली मान तिनें लवविली नि आंत आलेल्या त्या साऱ्यांनाच विनम्र भावानें त्या विश्वपित्याचे आभार मानले.

"आणि आतां आपल्या वडीलांचे उपकार मान ल्यूसी," तिला परत जवळ घेत चार्लस म्हणाला. "त्यांच्याशिवाय या साऱ्या फ्रान्समध्यें कोणी कोणीच माझा जीव वांचवू शकला नसता"

कितीतरी वर्षांपूर्वी तिच्या छातीवर मस्तक विसावलेल्या आपल्या वडीलांच्या छातीवर मान टेंकून ती आतां उभी होती. भरल्या हृदयानें डॉक्टर तिला कुरवाळीत होते. त्याची छाती आनदानें नि अभिमानानें फुलली होती तिच्या दिव्य प्रेमाची परत फेड आज त्यांनी केली होती आणि आपल्या दीर्घ श्रमांचा मोबदला त्यांना मिळाला होता.

"अ, अशी थरथरते आहेस कां पोरी? आतां नाहीं कांहीं घाबरण्याच कारण वेडे, त्याचा जीव मी वाचवला आहे," तिला हळूहळू थोपटीत ते सागत होते.

---

.... ७ ....

"त्याचा जीव मी वांचविला आहे" डॉक्टरांचे हे शब्द ल्यूसीच्या कानांत घुमत होते. पण तरीहि तिच्या हृदयाचा थरकाप मात्र अजून थांबत नव्हता. आपल्या पतीची ती प्रत्यक्ष भेट स्वप्नात अनेकवार घडल्यामारखीच तिला अजून वाटत होती.

आणि होताच तो काळ तसा विलक्षण भीषण सभोंवारच सार वातावरण कस घनदाट मिट्ट काळोखानें दाटलेल होत. तीव्र सूड द्वेषानें भारावलेल्या जनमताच्या चचल लहरी लाटा, तिच्याभोंवती एकसारख्या उसळत होत्या. असख्य निरपराधी जीव, केवळ अधुक शकेखातर किंवा केवळ द्वेषभावनेनें रोज प्राणाला मुकत होते. आणि आपला पती असा आज जर दैवीकृपेनें वाचला नसता तर, त्याच निरपराधी जीवांच्या सगती सोबतीनें तसाच यम-लोकाची वाट तो कधींच चालू लागला असता असल्या त्या जलपृष्टावरील रेपेसारख्या अस्थिर, क्षणजीवि, भीषण जनमनाच्या लहरी सांनिध्यांत, ल्यूसीला आपल्या पतीच जीवित अजूनहि सुरक्षित अस वाटत नव्हतं, नि तिच हृदय पतीच्या पुनर्भेटीमुळें उफाळून नाचत नव्हत. हिवाळ्यांतील सायकाळची अकाल उद्दाम छाया तिच्याभोंवती आतां पसरत होती तरीहि त्या भयंकर गाड्यांची धडधड रस्त्यावरून अजून चालूच होती. तिच मन त्या गाड्याच्या दिशेनें भटकत होत नि मन चक्षु आपल्या पतीची मूर्ती त्या गाड्यांत पहात होते. आणि मग भयानें थरथरत ती आपल्या पतीला अधिकच घट्ट बिलगत होती.

त्या अस्वस्थतेच्या नि अविश्वासाच्या काळात सामान्य लोकांचे दैनदिन व्यवहारसुद्धा आतां पार पालटले होते त्या बदललेल्या परिस्थितीला अनुसरून डॉक्टराच्या घरांतील पद्धतीहि पार पालटून गेल्या होत्या. इतर सामान्य माणसांप्रमाणें त्यांनाहि आपल्या रोजच्या मीठमिरचीची खरेदी रोज सायकाळीं उरकावी लागत होती. आणि ती आपली खरेदी सुद्धा लोकांच्या डोळ्यांत कधीं उठून दिसू नये, म्हणून वेगवेगळया दुकानांत वेगवेगळे जिन्नस खरेदी करीतच आपला बाजारहाट मिस प्रॉस नि जेरी या जोडीला रोज उरकावा लागत होता.

त्या दोन्हीहि प्राण्यांना फ्रेंच भाषेचं एक अक्षरहि बोलतां येत नव्हतं. तरीहि त्यांचे व्यवहार मात्र कधींच कुठें त्यानीं अडूं दिले नाहींत. दुकानांत जाऊन आपल्याला हवा तो जिन्नस हाताने वाणी दादांना दाखवीत नि त्यानीं दाखविलेल्या बोटांत एकबोट कमी करून आपलीं बोटें त्यानां दाखवीत, मिस प्रॉस आपली खरेदी उरकी संभाषण टाळण्याची किंवा भाषेची अडचण दूर करण्याची तिची ही सोपी युक्ति होती. आणि हे गेले बारा पंधरा महिने याच युक्तीच्या जोरावर आपला खरेदीचा व्यवहार ती बिनबोभाट उरकीत होती

"हं, चला जेरी, पडा आतां बाहेर." आपल्या हातातील मनी बॅग हलवीत मिस प्रॉस म्हणाली. "आणि हें बघ, पोरी — तुला सांगत्यें आहें बर का ल्यूसी — मी येईपर्यंत इथून एक पाऊलसुद्धां हलायचं नाहीं, बर का. अशीच घट्ट धरून बस आपल्या नवऱ्याला मी मागें येईपर्यंत ' पण जाण्यापूर्वी एक प्रश्न विचारायचा आहे मला, डॉक्टर, विचारूं ? "

"आपला अधिकारच आहे तो मिस प्रॉस," डॉक्टर हसत म्हणाले.

"जळ्ळा मेला तो अधिकार ' अधिकार नि स्वातंत्र्य, अधिकार नि स्वातंत्र्य — कान किटले माझे तें ऐकून ! " मिस प्रॉस उद्गारली.

"हळू, हळू ! माझे बाई ! कुणी ऐकेलसुद्धां." ल्यूसी तिला थोडी दाबीत म्हणाली.

"बरंग, बर ! पण मला काय करायचय त्यांच्या त्या अधिकाराशीं नि स्वातंत्र्याशीं ? बरं का, पण डॉक्टर, मला सांगा, इथून काढता पाय नाहीं का घेतां येणार आतां आपल्याला ? "

"अंहं ! अजून सुरक्षित नाहीं तसं करणं "

"तेंहि ठीक म्हणा ! " आपल्या लाडक्या ल्यूसीकडे पहात नि आपली निराशा लपवीत मिस प्रॉस म्हणाली. "आतां काय हत्ती गेला नि शेपूटच राहिलं, ठीक हं चला, जेरी ! — पण हलायचं नाहीं हं ल्यूसी ! "

बाजार मास्तरांची ती जोडी बाहेर पडली, आणि डॉक्टर, ल्यूसी चार्लस नि धाकटी ल्यूसी शेगडीभोंवती स्वस्थ बसलीं होतीं आपलं ऑफीस बंद करण्यासाठीं गेलेले लॉरी अजून परत आलेले नव्हते धाकटी ल्यूसी आपल्या आजोबांचा हात धरून बसली होती आणि ते तिला अगदीं हळू आवाजांत, सिंहानें उपकार केलेल्या एका चिमण्या उंदरानें सिंहाला जाळ्यांतून सोडवून

त्या उपकाराची परत फेड कशी केली, तें सांगत होते. सभोंवार सर्व कांहीं आतां शांत प्रशांत दिसत होतें आणि ल्यूसीच्या हृदयाची धडधडहि किंचित कमी झाली होती

"कसला झाला आवाज ?" ती एकदम दचकून ओरडली.

"ल्यूसी — ल्यूसी ! अशी भेदरून नको जाऊ " गोष्ट मधेंच थांबवून नि तिच्या खांद्यावर हात ठेवीत डॉक्टर म्हणाले. "किती अस्वस्थ झाली आहेस तूं ! कशानें एवढी घाबरलीस तू ? तू — तू ल्यूसी, माझी पोरगी ?"

"तस नाहीं बाबा, पण कुणाची तरी नवीन पावल वाजलीशीं वाटलीं मला जिन्यावर —' अडखळत ल्यूसी म्हणाली.

"छेग, पोरी, सुई पडल्याचा सुद्धां आवाज येत नाहीं कुठें."

पण त्यांचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच दारावर कुणीतरी ठोठावलें.

"बाबा, बाबा आता काय आहे नवीन ! वांचवा बाबा, चार्लसला वांचवा!"

"घाबरू नको बेटा," आपल्या जागेवरून उठत आणि तिच्या मस्तकावर हात ठेवीत ते म्हणाले. "मी वांचवलाच आहे त्याला. हा काय भेदरटपणा, पोरी ! मी उघडतों दार '

हातांत दिवा घेऊन आणि पुढील दोन खोल्यांतून पलीकडे जाऊन त्यानीं दार उघडलें. बाहेर पाऊलांचा खाड खाड आवाज झाला आणि लाल टोप्या घातलेले नि नागव्या तलवारी नि पिस्तुलें घेतलेले असे चौघे यमदूत आंत खोलींत शिरले.

"सिटिझन एव्हरमॉड, ऊर्फ डार्ने," पहिल्यानें पुकारा केला.

"कुणाच काम आहे त्याच्याशीं ?" चार्लसनें विचारलें.

"माझ — आम्ही त्याला पहातों आहोंत. मी ओळखतों तुला, एव्हरमॉड, कोर्टात पाहिला आहे तुला मी आज. लोकराज्याचा तू परत बंदीवान आहेस."

त्याची पत्नी नि छोकरी त्याला घट्ट बिलगलीं होतीं आणि ते चौघे यमदूत त्यांच्याभोंवतीं उभे होते.

"मला पुन्हां कैद कां, तें समजेल काय ?"

"आधीं प्रथम सरळ सेशन कोर्टात चल, मग कळेल उद्या — उद्यां फेर सुनावणी आहे तुझी."

आश्चर्यानें अगदीं स्तिमित होऊन, एकाद्या दगडीपुतळ्यासारखे डॉक्टर

हातांत दिवा धरून हा वेळपर्यंत उभे होते. ते आतां पुढे झाले आणि दिवा खालीं ठेऊन त्या बोलणाऱ्या व्यक्तीचा हात धरून ते म्हणाले—

" तुम्ही त्याला ओळखतां अस म्हणतां मला ओळखतां कां तुम्ही ? "

" होय, ओळखतों, सिटिझन डॉक्टर. "

" आम्ही सर्वजण ओळखतों, सिटिझन डॉक्टर. " बाकीचे तिघेहि म्हणाले.

डॉक्टरनी त्यांच्याकडे आळीपाळीनें विमनस्कपणें पाहिलें, आणि जरा वेळ थांबून हळू आवाजांत ते म्हणाले—

" मला द्याल का त्या प्रश्नाचें उत्तर ? हें अस कस झाल ? "

" सिटिझन डॉक्टर, " किंचित नाखुशीच्या स्वरात पहिल्यानें उत्तर केलें, " सेंट अॅटॉईनच्या लोकांनीं त्याच्यावर कांहीं गंभीर आरोप केला आहे. सेंट अॅटॉईनला त्याचा जाब पाहिजे आहे. "

" जाब, कसला जाब, ? " डॉक्टरनीं विचारलें.

" सिटिझन डॉक्टर, अधिक काहीं न विचारण बर. " तशाच नाखुशीच्या स्वरात तो म्हणाला. " लोकसत्ता जर तुमच्यापासून कांहीं त्यागाची अपेक्षा करीत असेल, तर देशभक्त नागरिक या नात्यान, तो त्याग तुम्ही आनदानें केला पाहिजे. आधीं लोकसत्ता, बाकी सर्व मागाहून. जनता हाच सर्व सत्ताधीश जनार्दन — एव्हरमॉड आम्हाला वेळ नाहीं थांबायला. "

" फक्त एकच शब्द," डॉक्टर विनवणीच्या स्वरांत म्हणाले, " यांच्यावर दोषारोप करून जाब विचारणाराच मला नांव समजेल काय ? "

" नियमाविरुद्ध आहे तस करण. पण — पण — " अस्वस्थपणं आग चाळवीत अखेरीस तो म्हणाला, " सिटिझन आणि सिटिझनेस डेफार्ज याचाच अतिशय गंभीर आरोप आहे. आणखीहि पण एकाचा. "

" तो कुणाचा ? "

" तुम्ही – तुम्ही विचारतां हें, सिटिझन डॉक्टर ? "

" होय. "

" बर तर, " कांहीं चमत्कारीक तऱ्हेनें त्यांच्याकडे पहात तो म्हणाला, " उद्यां मिळेल याच उत्तर. बस्स, आतां खलास ! "

#### .... ८ ....

त्यांच्या घरावर आलेल्या या नवीन संकटाची कांहींच कल्पना नसल्यामुळें मिस प्रॉस नि जेरी नेहमींप्रमाणे स्वस्थ मनानें आपलें काम उरकीत वाटेनें चाललीं होतीं. आपल्या आजूबाजूच्या दुकानाकडे दृष्टि टाकीत आणि वाटेंत भेटलेल्या रक्तपिपासु बुभुक्षित टोळ्यांपासून चार हात लांब रहात त्यांची भ्रमती चालू होती. रोजचा किराणा माल खरेदी करून आणि दिव्यासाठीं तेल घेऊन चार्लसच्या बंधमुक्ततेनिमित्त आनंदोत्सव साजरा करण्यासाठीं म्हणून कांहीं ब्रँडी घेण्यासाठीं तीं दारू दुकानाकडे जात होतीं दुकानाजवळ जाऊन पोंचतांच हातांतील पिशवी सरसावीत जेरीची स्वारी दारांतून आंत शिरत असतां, तोंडांतील तंबाखूची नळी पेटवीत बाहेर येत असलेल्या कुणी तरी त्याला धक्का दिला नि स्वत ला सांवरीन, " माफ करा ह '" असं तें कुणी तरी म्हणालें. जेरी नि मिस प्रॉस दोघांनींहि त्या व्यक्तीकडे पाहिलें, आणि त्याच्याकडे नीट दृष्टि जातांच एकदम चमकून मिस प्रॉस अस्पष्टपणें किंचाळली. तिकडे जेरीहि त्या व्यक्तीकडे तसाच आश्चर्यानें पहात कांहींतरी आठवीत डोकें खाजवीत पुढे उभा राहिला

"कां, एवढं किंचाळाला काय झालं ?" ती व्यक्ती हळूच मिस प्रॉसला म्हणाली

" अरे किंचाळू नको तर काय करू, सॉलोमन; किती वर्षांनीं दिसतो आहेस तू हा मला ?" मिस प्रॉस म्हणाली.

"अग बया, पण जरा हळू ! ठार मारायचा आहे का काय मला ? सॉलो-मन नको मला हाक मारू " भयभीतपणें इकडे तिकडे पहात तो म्हणाला.

" दादा, दादा '" डोळ्यांत अश्रू येऊन मिस प्रॉस म्हणाली. "इतका कसा रे तू कठोर ? '

" मग जरा हळू बोलना आणि चल, तिकडे चल थोडी बाजूला. पण हे कोण प्राणी ? भूतबीत वाटलों काय यांना मी ?"

पहात होता खराच जेरी तसा त्याच्याकडे; पण बोलतमात्र नव्हता तो एक अक्षरसुद्धां. त्याचे आपलें शांतपणें डोकें खाजवीत त्याच्याकडे पहाणें चालू

होतें. पण मिस प्रॉसनें त्याच्या हातावर पैसे ठेवतांच आंत दुकानांत जाऊन ब्रँडी खरेदी करून तो बाहेर आला, आणि मग स्वस्थपणें बोलण्यासाठी तीं सर्व पुढच्या काळोख्या वाकणाजवळ जाऊन उभीं राहिलीं

"ह आतां काय पाहिजे तुम्हांला, ताईसाहेब ?"

"इतक्या वर्षांनीं आतां भेटून हा प्रश्न का सॉलोमन ! नि भाऊ–भाऊ बर का हा माझा !" डोळ्यांतून पाणी काढीत मिस प्रॉस म्हणाली

"मग काय तर ! पण मला तू इथ असल्याच माहीत होत, तुला नसल तरी, बर का ताईसाहेब. पण काम काय आहे तुझ, तें बोल झटपट; मला नाहीं आहे वेळ. अधिकारी माणस आम्ही !"

"अहो, अधिकारी माणस, एक प्रश्न विचारू का आपल्याला ?" त्याच्या खांद्याला स्पर्ष करीत जेरीनें विचारलें "आपल खर नांव कायहो, जॉन सॉलोमन कीं सॉलोमन जॉन ? आपली बहीण हांक मारते आहे आपल्याला सॉलोमन म्हणून. पण कायहो, तिकडे त्या खाडीपलीकडे नव्हत आपल हें नांव, नव्हे ?"

"मी नाहीं समजलों."

"म्हणजे अस कीं, हें नांव नव्हत आपल तिकडे. कांही चार अक्षरी नाव होत आपल ओल्ड बेलेच्या आवारांत, नाहीं ?"

"बारसाड !" कोणाचा तरी मागून आवाज आला

"अगदीं बरोबर !" जेरी उद्गारला.

"अशा घाबरू नका मिस प्रॉस," पुढें येत सिडने कार्टन म्हणाला "काल सन्ध्याकाळींच आलों आहें मी लॉरींकडे, आणि सर्व कांहीं सुरळीत होईपर्यंत किंवा माझी गरज लागेपर्यंत, मी प्रकट व्हायच नाहीं अस आमच ठरल होत आपल्या या बधूशी मला आतां चार शब्द बोलायचे आहेत असला हा गळेकापू, हेर काम करणारा भाऊ तुम्हांला नसता तर बर झाल असत"

सिडनेच्या त्या शब्दांनीं तो हेर अगदीं थडा बरफ झाला होता. तरी आपल्या पांढऱ्याफटक चेहेऱ्यावर उसनें अवसान आणण्याचा प्रयत्न करीत त्यानें विचारलें, "आपण कोणाशीं बोलतांहांत ?"

"सागतों ह, मि. बारसाड," सिडने म्हणाला. "एकदोन तासांपूर्वी त्या तुरुगाजवळ फिरत असतां, आंतून बाहेर पडतांना मी आपल्याला पाहिल, आणि मग आपल्याला मी चांगला ओळखीत असल्यामुळें, माझ्या त्या दुर्दैवी स्नेह्याच्या

दुर्दैवात आपला कांहीं हातभार असावा अशी शंका येऊन, मी तेव्हांपासुन आपल्या पाठीशींच होतों. तिकडे त्या दुकानांत आपल्या जवळच बसलों असल्यानें आपलीं तीं घमेंडखोर मुक्ताफळं माझ्या कानांवर आलीं, आणि माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या कांहीं कल्पनांना आतां मूर्तस्वरूप येणारसं मला वाटूं लागलं आहे. "

" कसल्या कल्पना ? "

" इथे सांगणं धोक्याचं आहे तें बारसाड तिकडे टेलसन बॅंकेच्या कचेरींत जरा आलांत तर ? नसलं यायचं तर कांहीं इलाज नाहीं. "

" बघ, म्हटलं नाहीं मी, माझ्या गळ्याला तू फांस लावणार म्हणून ! " सिडनेच्या आवाजांतील अधिकाराची नि गर्भित धमकीची धार सहन न होऊन बारसाड म्हणाला. " चला बाबा "

" प्रथम आपण आपल्या ताईला त्यांच्या घरापर्यंत पोंचवूं या माझा हात पकडा असा मिस प्रॉस या दिवसांत असं एकटं दुकटं फिरणं चांगलं नाहीं, आणि तुमच्या या जवानाला, तो बारसाडला ओळखीत असल्यामुळें थोडा वेळ आमच्या बरोबर येऊं द्या. चला, जायचं ? "

मिस प्रॉसनें वर त्याच्या तोंडाकडे पहात त्याचा हात पकडला त्या हातांत नि त्या डोळ्यांत कांहीं वेगळंच पाणी आज तिला दिसत होतं. नेहमींचा सुस्त कार्टन आज त्या ठिकाणीं दिसत नव्हता, उदात्ततेची उज्ज्वल छटा त्याच्या चेहेऱ्यावर मिरवत असलेली आज तिला दिसत होती, आणि कांहीं तरी ताठर निश्चयानें त्याचें पाऊल पुढे पडत आहे याचीहि तिला जाणीव झाली. सिडने कार्टनचें हं भव्य चित्र, तिच्या चित्तफलकावर आज नव्यानें पण कायमचेंच रंगविलें जात होतें

घराच्या कोपऱ्याजवळ तिला पोंचवून पांच दहा मिनिटांतच त्यांनीं मि. लॉरींच्या खोलींत पाऊल टाकलें आपलें जेवण उरकून शेगडीजवळ खुर्ची ओढून ते स्वस्थ बसले होते, आणि आतां सिडने कार्टनच्या मागोमाग आंत आलेल्या बारसाडकडे त्यांची नजर जातांच त्यांना आश्चर्य वाटल्यासारखें दिसत होतें.

" मिस प्रॉसचे बंधु, मि. बारसाड, " सिडने त्यांना म्हणाला.

" बारसाड ? बारसाड ? परिचित दिसत आहे नांव नि चेहेराहि. "

" ओल्ड बेलेमधील, आपल्या त्या डार्नें खटल्यांतील सरकारी साक्षीदार," खालीं खुर्चीवर बसत सिडने म्हणाला. मि. लॉरी आतां तिरस्कार दर्शक मुद्रेनें बारसाडकडे पहात होते.

" आपला यांचा पूर्व परिचय आहेच. आतां एक अत्यंत वाईट बातमी. डार्नेला परत अटक झाली आहे."

" काय सांगता काय, सिडने!" भीतीनें अगदीं पांचावर धारण बसल्या-सारखे लॉरी उद्गारले "आत्तां दोन तासांपूर्वीच चांगला सुखांत नि मोकळा होता तो, आणि मी हा आत्तां तिकडे जायलाच निघणार होतों!"

" तरीहि त्याला अटक झाली आहे हें सत्य आहे कधीं झाली अटक, मि. बारसाड?"

" झाली असली तर आत्तांच."

" यांचाच शब्द आपण अखेरचा मानला पाहिजे, मि. लॉरी." सिडने म्हणाला. " कारण त्यांच्याच तोंडून ती बातमी मी ऐकली डॉक्टरांच्या घरा-जवळ ते लोक जाईपर्यंत हे त्यांच्या बरोबरच होते. त्याच्या अटकेबद्दल मला तर कांहीं शंका नाहीं."

त्या मुद्यावर अधिक वेळ घालवणं इष्ट नाहीं असं सिडनेकडे पहातांच लॉरींना कळून चुकलं. आणि गोंधळल्यासारखे, पण आपल्या मदतीची कांहीं जरूर लागेल या कल्पनेनें ते नीट लक्ष लाऊन सिडनेचें भाषण ऐकूं लागले.

" अजूनपर्यंत डॉक्टरांच्या नांवाचा नि वजनाचा चार्लसला जसा उपयोग झाला तसा तो उद्यांहि कदाचित होईल पण कदाचित तसा होणारहि नाहीं. खरं सांगायचं मि. लॉरी, तर माझं मन आता डळमळलं आहे, कारण डॉक्टर त्याची ही आत्ताची अटक थाबवू शकले नाहींत."

" त्याना आधीं कळलं नसेल कदाचित," लॉरी म्हणाले.

" नेमकी हीच परिस्थिती मला धोक्याची वाटते कारण डॉक्टर म्हणजे चार्लस, आणि चार्लस म्हणजे डॉक्टर, इतका त्यांचा एकजीव आहे."

" असं खरं," लॉरींनी कबूल केलें. त्यांचा अस्वस्थ हात त्यांच्या हनुवटी-जवळ चुळबुळत होता. आणि अस्वस्थ डोळे कार्टनच्या चेहेऱ्यावर खिळले होते.

" थोडक्यात म्हणजे," सिडने म्हणाला, " वखत तर आतां बांका आला आहे, आणि प्रसंग जितका जिवावरचा नि असाध्य तितका त्याच्या प्रतिकाराचा

उपायहि जालीम नि साहसपूर्ण असाच राहणार कारण छाती फाटण्याची वेळ आली कीं छातीचा कोट करून छातीठोकपणेंच कांहीं गोष्टी कराव्या लागतात, नाहीं का! डॉक्टरनां आपल्या यशस्वी उपायांचा अवलब करू द्या, माझा नेहमींचा अपेशी मार्ग ठरलेलाच आहे कोणाच्याच जीविताला आज इथे खरखुर मोल नाहीं. जनतेच्या अग्रभागीं मिरवत असलेला आजचा लोकप्रिय पुरुष, उद्या त्याच जनतेच्या पायदळी तुडवला जात आहे या परिस्थितींत घडणार जर घडलच, तर मी एक डाव टाकण्याचा विचार केला आहे आणि त्यासाठीं माझ्या हातातील कांहीं हुकमी पत्त्यांच्या जोरावर, तुरुगांत नेहमीं मुक्तद्वार वावरणाऱ्या माझ्या या दोस्ताला, मी आपल्या बाजुला ओढणार आहें ''

" आपला हातातील डाव तसाच हुकमी असेल तरच, मेहेरबान,'' तो हेर म्हणाला.

" अस ? तर पान पुन्हा पाहून सांगतों ह — मि. लॉरी तुम्ही मला ओळखतां, ती बाटली जरा इकडे करा पाहू ''

लॉरींनी पुढें केलेल्या बाटलींतून दोन पेले त्यानें आधीं घशाखाली उतरवले नि मग ती बाटली जरा दूर सारली.

" मि. बारसाड,'' हातांतील डावाकडे पहात बोलत असल्यासारखा तो बोलू लागला " तुरुगांत हेर काम करणारे तुमच्यासारखे गळेकापू, आज कैदी तर उद्या जेलर असा रोज पार्ट वेगळा, पण अतर्यामीं एकच गळेकापू असणारा माणूस, आजच्या नव्या लोकशाहीचा हस्तक किंवा दुसऱ्या कोणत्याहि नावानें जरी वावरत असला तरी, त्याच जीवित कधींच सुरक्षित नसत हे आपल्याला ही माहीत असल्यानें, आपण खोट्या नांवानें या लोकराज्यात नांदत आहांत हें एक माझ हुकमी पान फ्रेंच लोकसत्तेचा आजचा हा गुप्तहस्तक फ्रान्सच्या नि त्याच्या स्वातत्र्याच्या वैऱ्याच्या, राजसत्ताक इग्लडच्या नोकरींत कालपर्यंत होता, हें दुसर. फ्रान्सच्या त्या घातकी वैऱ्याच्या, पिटच्या, हेरखात्यांत काम करणारा हा इग्रज हेर — ज्याच्या दुष्कृत्यांचा लौकिक जिकडेतिकडे पसरला आहे, तो महात्मा या पॅरिसमध्यें, लोकसत्तेच्या या अतर्गृहांत खुशाल वावरतो आहे — निर्धास्तपणें वावरतो आहे, हें तिसर. कां, मि बारसाड, कशी काय आहेत माझ्या हातांतलीं हीं पान ? ''

" तरी अजून आपला डाव नाही समजला मला,'' अस्वस्थपणें तो हेर म्हणाला.

"बरं तर, आतां हुकमाचा एक्का दाखवतो ह, हा पहा. जवळच्या पोलीस चौकीवर आपली ताबडतोबीची वर्दी ! आतां आपल्या हातांतली पानं जरा पहा पाहूं. सावकाश, तशी घाई नाहीं!"

त्यानें ती बाटली परत पुढें घेतली आणि आणखी एक पेला झोकला आणि दारूच्या नशेंत हा काय लागेल तें करील या जाणीवेनें भयभीतपणें बारसाडची दृष्टि त्याच्याकडे लागलेली पाहून सिडनेनेंहि आणखी एक पेला भरून तो रिकामा केला.

"नीट पहा ह आपल्या हातांतील पान. अशी घाई करू नका."

त्याच्याकडे पहात असतां बारसाडच्या डोक्यांत विचारांचें एकच काहूर उसळलें होतें. सिडनेला माहीत नसलेल्या एका हुकमी पानाचाच तो प्रामुख्यानें विचार करीत होता इंग्लडातील आपली हेरगिरी असुरक्षित वाटल्यामुळेंच त्यानें तिथून पलायमान होऊन फ्रान्समधें नोकरी पत्करली होती आरंभी आरंभीं आपल्याच देशबांधवांच्या मानेवर सुरी फिरविण्याचें काम तो करीत होता, आणि मग आस्तेकदम तेंच काम त्यानें त्या देशाच्या लोकांविरुद्ध सुरू करून अनेकांना तुरुंगाची हवा खायला लावलें होतें. त्याच नात्यानें, त्या मागील अमदानींत त्यानें सेंट अँटॉईनवर आपला मोर्चा फिरवला होता आणि डेफार्ज पतिपत्नींच्या हालचालींवर नजर ठेवली होती नि त्यांत अपयश पदरांत घेतलें होतें मॅडम डेफार्जजवळ बोलत असतां ती त्याच्याकडे कशी भयंकरपणें पहात होती नि तिचें विणकाम कसें सारखें चालू होत याची आठवण होऊन, भयानें त्याच्या काळजाचें अनेकवार पाणी झालें होतें. कारण या नवीन रक्तलांछित क्रांति-काळांत, त्या विणकामांत नोंदले गेलेले असंख्य जीव आपल्या प्राणांस विना-चौकशी तडकाफडकी मुकलेले तो रोज पहात आला होता. हेर म्हणून आपल जीवित सुरक्षित नाहीं, याची त्याला जाणीव होती; तिथून निसटून जाणहि अशक्य होत; मृत्यूची भीषण कुठार आपल्या मस्तकावर सारखी टांगलेलीच आहे, आणि त्या लोकराज्यासाठीं तो लागेल तें करण्यास जरी मागें पुढें पहात नव्हता, तरी त्याच्याविरुद्ध उच्चारलेला एक शब्दहि ती कुठार त्याच मस्तक धडावेगळ करण्यास पुरेसा आहे, हें त्याला पक्कें माहीत होतें आणि ती क्रूर बया—मॅडम डेफार्ज, जर एकदां उलटली तर—! आपल्या हातांतील पानं कुचकामाचीं आहेत हें बारसाडला आतां पुरत दिसत होत, आणि तो काळाठिक्कर पडला होता.

"हातांतलीं पान आपल्याला फारशीं आवडलेलीं दिसत नाहींत, मि बारसाड," त्याच्यांतील बदल पहात शांतपणें सिडने म्हणाला. "खेळणार का आपण ?"

"तें हुकमी पान मेहेरबानी करून खेळू नका, अस आपण सांगाल का याना ?" लॉरीकडे वळून अजीजीच्या स्वरात तो म्हणाला. "मी हेर आहे नि हेर काम करू नये हेंहि मला कबूल पण कोणी तरी केलच पाहिजेना तें, आणि हे सुद्धां नाहीं का तीच हेरागिरी करीत ?"

"हें पहा बारसाड," आपल्या घड्याळाकडे पहात सिडने म्हणाला, "मी आपला हुकमी एक्का टाकणार बर का आतां"

"माझ्या बहिणीविषयींचा आपला आदर तरी, —" त्या दोघाना उद्देशून बारसाड म्हणाला.

"ती ब्यॅद जगांतून कायमची नाहींशी करून टाकण, हाच आदर दाखविण्याचा उत्तम मार्ग वाटतो मला," सिडने म्हणाला,

"खरच अस वाटत आपल्याला ?"

"अगदीं काडीचीहि शका नाहीं त्यांत !"

सिडनेची ती गभीर मुद्रा नि आवाज पाहून बारसाडचें उरलेसुरलें अवसानहि आतां गळत होतं. तरीहि अजून त्याचा ठाम निश्चय मात्र होत नव्हता.

"माझ्या हातांतील आणखी एक पान मला आपल्याला दाखवायच आहे, मि बारसाड," हातांतील पानें पहात असल्यासारख्या आवाजांत सिडने परत बोलू लागला. "आणि आपल्या शेजारीं बसलेले मघांचे ते आपले दोस्त कोण ?"

"फ्रेंचमन आहे तो. आपण नाहीं त्याला ओळखीत;" बारसाड घाईघाईनें म्हणाला.

"अस्स, फ्रेंच अ ? असेल — असेल," आपल्याशींच विचार केल्यासारखा सिडने पुटपुटला. "समजा, तेवढ महत्त्व नाहीं त्याच. पण तो चेहेरा परिचित आहे मला."

"मला नाहीं वाटत — शक्यच नाहीं तें."

"नसेल, नसेल पण ते क्लाय महाशय ओल्ड बेलेमधे होते आपल्या जोडीला."

"चूक, साफ चूक. घसरलांत साहेब आपण," हसत हसत त्याच्याकडे पहात

बारसाड म्हणाला "इथे मात केली मी आपल्यावर बर का या माझ्या हातांनं थडग्यांत गाडला आहे मी त्याला, कितीतरी वर्षं झालीं त्याला आज "

"हें पहा मेहेरबान, एवढे फुशारून नका जाऊ " अजूनपर्यंत बाजूला स्वस्थपणें उभा असलेला जेरी एकदम पुढें येऊन म्हणाला. "कोण म्हणतो क्र य मेला म्हणून ? बदमाष, त्या पेटींत नुसते दगड गोटे भरले होतेत तुम्ही मला फसवाला पहातोस होय, म्हणे त्याला मी गाडला ' चार उभे करीन लोक मारू द्यायला, त्या पेटींत तो नव्हता म्हणून चूप, बोलू नको, एक अक्षरहि. त्या पेटींत नुसते दगड होते परत तर बोल, कीं नाहीं नरडी दाबून प्राण घेतला तुझा तर मी जेरीच नव्हे ' अह, आता नका विचारू मला काहीं साहेब, मेहेरबानी करून, मग करीन मी खुलासा केव्हांतरी."

सभाषणास मिळालेल्या या आकास्मिक कलाटणीनें मिडने नि लॉरी चकित होऊन गेले होते पण जेरीला ते ओळखीत असल्यानें त्यानीं लौकरच स्वत ला सांवरलें

"अस्स, अस्स ' आपल्याला काय, आणखी एक हुकमी पान मिळाल, कार्टन म्हणाला "मग काय, खेळणार का आपण ? "

"नाही ' आपली एकदम शरणचिठ्ठी." तो हेर म्हणाला. "तिकडून इग्लडमधून जेमतेम जीव घेऊन पळालों तो आतां इथें काय फुकट मरू होय या राक्षसाना काय, आणखी एक बळी. तर बोला आतां आपल काय म्हणण आहे तें ? माझी कामावर जाण्याची वेळ आतां होत आली मात्र माझ्याजवळून भलती अपेक्षा करून माझा जीव अधिक धोक्यात कांहीं घालू नका त्या स्थितींत मला सरळ नकारच द्यावा लागेल तर बोला, काय आहे म्हणण आपल ? "

"तस कांहीं फार नाहीं तुरुगातले आपण एक अधिकारी आहां, नव्हे ? "

"मी आपल्याला एकदांच सांगतों की तिथून निसटण अशक्य आहे: "

"पण मी विचारल नाही त्याच उत्तर कशाला देतां ? तुरुगातले आपण अधिकारी आहा कीं नाहीं ? "

"असतों मधून मधून."

"म्हणजे वाटेल तेव्हा होतां येईल ? "

"मला आंत बाहेर वाटेल तेव्हा जातां येईल, एव्हढ खर "

सिडनेनें आणखी एक ग्लास भरून तें सावकाशपणें खालीं शेगडीजवळ ओतलें. तें ग्लास पूर्ण रिकामें झाल्यानंतर तो आपल्या जागेवरून उठून म्हणाला —

" आपल्या हातांतील पानांचं बलाबल या दोघांनाहि नीट कळावं म्हणून मी आतांपर्यंतचं भाषण यांच्या साक्षीनं केलं. आतां त्या शेजारच्या खोलींत बसून आपण दोघेच आपलं संभाषण संपवू या, मि. बारसाड. चला — "

.... ९ ....

अर्ध्या पाऊण तासाच्या गुप्तभाषणानंतर कार्टन नि बारसाड खोलीबाहेर पडले. या वेळांत मि. लॉरीनों जेरीची चांगलीच हजेरी घेतली होती. क्राय त्या पुरलेल्या पेटांत नव्हताच असें जेरीनें सांगितल्यापासूनच ते अस्वस्थ झाले होते. स्मशानांत नेऊन पुरलेल्या पेटींत काय होतं तें जेरीला समजलं कसं; त्यानें ती पेटी उघडून तर पाहिली नाहीं, आणि असल्यास कोणत्या हेतूनें. नोकरीव्यतिरिक्त कसल्या उद्योगांत गढलेला असेल हा बेटा? पण प्रश्न जरी अनेक असले तरी लॉरींच्या मनांत त्यांच्या संभाव्य उत्तरानें घृणाच उत्पन्न झाली होती, आणि म्हणूनच ते दोघेच मागें राहिल्यावर त्यांनीं जेरीला छेडला होता, नि त्यानेंहि आपल्या गतकृत्यांचा आपल्याला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे असं सांगून, तो पश्चात्ताप आपण कृतीनेंच सिद्ध करणार असल्याचें त्यानें लॉरींना आश्वासन दिलें आणि सुस्वभावी लॉरी तेवढ्यावर खूष राहिले होते. " शब्द नको, कृति," असेंच ते सिडने बारसाडची जोडी परत खोलींत आली त्या वेळीं जेरीला सांगत होते.

" ॲडयू, मि. बारसाड! आपली ही व्यवस्था आतां अशी पक्की झाल्यानंतर, माझ्यापासून आपल्याला कांहींहि धोका पोंचणार नाही हें ध्यानांत ठेवा," सिडने आत येत म्हणाला.

जेरी नि बारसाड खोलीबाहेर पडून ते दोघेच आंत राहिल्यानंतर काय झालं म्हणून लॉरींनी विचारलें.

" कांहीं विशेष नाहीं. उद्यां जर सारीच आशा संपली तर त्याची एकवार भेट फक्त होईल मला "

लॉरींचा चेहेरा निराशेनें काळवंडला.

" अधिक करण कांहीं शक्य नव्हत मला अधिकाची अपेक्षा करण म्हणजे त्याला मरणच. मग तो म्हणतो तस, अस मरण काय नि तस काय, त्याला दोन्ही सारखीच, आणि आपल्या पदरांत मात्र कांहीच नाहीं. कांहीं इलाज नाहीं पण याला "

" पण कोर्टाचा निकाल जर विरुद्ध झाला तर भेट घेऊन कांही त्याचा जीव नाहीं वांचविता येणार."

" तसं मीहि म्हटल नाहीं "

लॉरी निराशेनें शेगडींतील निखाऱ्यांकडे पहात राहिले. ल्यूसीवरील त्याच्या घनिष्ठप्रेमानें आणि चार्लसच्या या आजच्या परत अटकेनें ते अगदा गळल्या-सारखे दिसू लागले दुर्बल वृद्धत्वाची छाया त्यांच्यावर आतां दिसू लागली आणि त्यांच्या डोळ्यांतून नीरव अश्रुबिंदु खालीं गळू लागले

" आपण एक अतिशय विशाल हृदयाचे उदारधी आहात, मि लॉरी ! " घोगऱ्या आवाजात सिडने म्हणाला. " माझ्या जन्मदात्या पित्याला असे अश्रु ढाळतांना पाहून वाटला नसता इतका गाढ आदर आपल्यावद्दल मला वाटतो आहे. पण माझ्या सारख्याच्या पितृत्वाची जबाबदारी आपल्यावर आली नाहीं, हें आपल भाग्यच ! "

हे शेवटले शब्द जरी त्यानें आपल्या नेहमींच्या निष्काळजीपणानं उच्चारले होते तरी त्याच्या आजच्या आवाजांतील जिव्हाळा नि आदर लॉरींना कांहीं वेगळाच वाटून ते चमकले. सिडने कार्टनच हें उदात्त दर्शन त्यांनाहि अजून-पर्यंत पूर्णपणें अपरिचितच होत. त्यांनीं मोठ्या प्रेमानें त्याचा हात पकडला नि सिडनेनें तो हळुवारपणें दाबला.

" आणि आतां आपला चार्लस. ल्यूसीला मात्र आत्तां घटत्यापेक्षां काहींच सांगूं नका; त्याचा उपयोग तर कांहीच नाहीं, उगाच तिच्या जिवाला मात्र नसता त्रास. आणि मी आलों आहे म्हणून पण सांगू नका ह ! मी आल्या-वेळीं बोलल्याप्रमाणें, मी तिला न भेटण बर. मला काय तिच्यासाठीं बारीक-

सारीक करतां येईल, तें मी करीन, त्यासाठीं त्याची आवश्यकता नाही. आज जाणार आहांना तिकडे ? तिला बस उजाड ओसाड झाल असेल आज."

हा तिकडेच निघतों आतां."

" ठीक ठीक भारी लोभ आहे तुमच्यावर तिचा, नि विश्वास पण कशी काय दिसते हल्ली तिची एकदर प्रकृती ?"

काळजीद् खानीं पिडलेली तर खरीच, पण तरीहि एरव्हीं सुंदर, गोड !"

' हऽऽ ' "

त्याच्या गुदमरलेल्या हृदयांतून अगदीं पिळवटून निघाल्यासारखा तो दीर्घ सुस्कारा लॉरींना वाटला त्यांनीं त्याच्याकडे पाहिलें कार्टन तोंड फिरवून त्या जाळाकडे पहात होता एखाद्या निरभ्र सुंदर दिवशीं एखाद्या डोंगर माथ्यावरून झटकन निघून जावी अशी कांहीं तरी छटा त्याच्या चेहऱ्यावर दिसून नाहींशी झाली ती छटा कसली तें त्यांना सांगतां येत नव्हतें बाहेर पडण्याच्या बेतांत असलेल्या एका रसरशीत छोट्या ओंडक्यावर सिडनेनें आपला पाय दाबून तो आत ढकलला. त्याच्या फिकट चेहऱ्यावर जाळाचा प्रकाश पसरला होता डोक्याचे लांब तांबूस तपकिरी केंस मस्तकावर सैल विखुरले होते, आणि शांतपणे त्यानें आपला उंच बूटाचा पाय त्या ओंडक्यावर दाबून धरला होता त्या ओंडक्याचे चुरून बारीक तुकडे होत होते. आणि त्याच्या त्या बेदरकारपणाबद्दल लॉरी त्याला रागावलेहि.

" माझं लक्ष नव्हतं हं ! " तो उद्गारला.

त्याच्या महजसुंदर चेहऱ्यावर क्षीणपणाची छाया पसरली होती नि तिकडे दृष्टि जातांच तुरुंगातील कैद्यांच्या क्षीण चेहऱ्यांची लॉरींना उत्कटपणे आठवण झाली

" आतां आपलं काम संपत आलं असेल इथलं नाहीं ? " त्यांच्याकडे वळून कार्टन म्हणाला.

' संपलच आहे आतां. मला काय करतां आलं तेवढं कसोशीनं केलं आहे मी आणि आतां सर्व कांहीं सुरक्षित झाल्यानंतर, पॅरिस सोडण्याच्या तयारीतच होतों मी."

ते दोघेहि कांहीं वेळ मग स्तब्ध बसले होते.

' बरेच दिवस काढले आहेत आपण या जगांत, नाही ? " अनुतप्त स्वरांत कार्टन म्हणाला.

" अठ्ठयाहत्तर वर्षांची उमर आहे आज माझी."

" सारं आयुष्य शांतपणें आपलं कर्तव्य करीत आणि लोकांच्या उपयोगी पडत घालवलं आहे आपण, आणि अनेकांनीं आपल्यावर पूर्ण विश्वास टाकून अडचणीच्या वेळीं आपल्याकडे आशेनें पाहिलंहि असेल ? "

" वयाची विशी उलटली नाही तोंच या बँकेच्या धद्यांत पाऊल टाकलं मी मि. कार्टन, किंबहुना त्याच्याहि आधीं म्हटलं तरी चालेल "

" आणि आज ऐशींच्या घरांत आलांत तरीहि केवढी कामगिरी आपण उरकीत आहां, आणि आपल्या अनेक स्नेह्यांना चुकल्या चुकल्या सारखं वाटेल, आपण ही जागा सोडल्यानंतर ! "

" एकटा एक जीव मी; " आपली मान हलवीत लॉरी म्हणाले " कोण आहे रडायला माझ्या मागें ? "

" असं कसं म्हणतां लॉरी ? तिला नाहीं वाईट वाटणार ? त्या छोट्या पोरी-लाहि नाहीं ? "

" होय वाटेल, वाटेल, देवाचे उपकार आहेत मोठे. तसा नव्हता माझ्या बोलण्याचा अर्थ "

" आहेत खरेच देवाचे उपकार, नाहीं ? "

" खात्रीनें, खात्रीनें ! "

" पण समजा, परिस्थिति उलटी असती, आणि तुम्ही कोणाचाहि स्नेह, प्रेम आदर, भक्ति नि विश्वास संपादन केला नसतात, कोणाच्याहि मनांत यत्किंचि-तहि मृदुभावना तुम्ही उत्पन्न केली नसतीत कीं तुमची कोणी कधींकाळीं एखाद-वेळ तरी आठवण काढावी असंहि तुमच्या या दीर्घ आयुष्यांत तुमच्या हातून कांहींच घडलं नसतं, तर आज आतां असं गत आयुष्याचं सिंहावलोकन करीत असतां, ही तुमची अठ्ठयाहत्तरी अठ्ठयाहत्तर शल्यांसारखीच तुम्हांला वाटली नसती काय ? "

" खरं आहे तुमचं म्हणणं, मि. कार्टन; तसं वाटलं असतं खरं. "

सिडनेनें परत आपली दृष्टि शेगडींतील ज्वालेकडे लावली, आणि कांहीं क्षण स्वस्थ बसून तो म्हणाला—

" मला एक विचारायच आहे. तुमच बाल्य तुम्हांला आठवत का ? आपल्या मातेच्या जवळ तिला बिलगून बसण्याचा तो काळ, कितीतरी दूर गेला असं कधीं वाटत का तुम्हांला ? "

" वीस वर्षांपूर्वी तस वाटल असत, पण आतां आज मात्र तस वाटत नाहीं." त्याच्या मृदुभावनांना सवादी सूर काढीत लॉरी म्हणाले " प्रवासाच्या टोंकाला जसा मी आतां येत चाललो आहेना, तसा एकाद्या वर्तुळांत फिरल्यासारखा तो प्रवासाचा प्रारंभ मला निकट वाटतो आहे तें बाल्य म्हणजे जस कांहीं आतां माझ्या उरल्यासुरल्या प्रवासांत गोडवा उत्पन्न करीत आहे. माझ हृदय जसं काहीं वितळत आहे, कितीतरी वर्षे विस्मृतीच्या कोनाकोपऱ्यांत घोरत पडलेल्या स्मृति आता परत जागृत होत आहेत; नि माझ्या प्रिय आईची ती तरुणपणची मूर्ति माझ्या वृद्ध डोळ्यांसमोर आतां उभी रहाते आहे आपल हें व्यवहारी जगहि मला त्या काळांत अपरिचितच होत, आणि माझ्या अंगांतले आजचे गुणदोष तेव्हां बद्धमूल झाले नव्हते "

' समजतात — मलाहि त्या भावना समजतात, मि लॉरी, ' काहींसा ओशाळून सिडने म्हणाला

" पण तुम्हीं अजून तरुण आहांत सिडने. "

होय. मी तरुण आहें पण मी कधींच काहीं शहाणपण शिकणार नाहीं, लॉरी. जाऊ द्या तें. "

' आणि माझहि पुराण आता पुरे बाहेर जाणार आहांत का तुम्ही कुठे ? "

" चला, ल्यूसीच्या घरापर्यंत पोंचवतों तुम्हाला मी, " त्याचा ओव्हरकोट त्याच्या अंगावर चढवीत सिडने म्हणाला, " पण माझ्या निशाचरी भटक्या सवयी माहीतच आहेत तुम्हाला. म्हणून मला जर फार उशीर झाला परत यायला, तर भिण्याच कांहीं कारण नाहीं, सकाळी तरी नक्की उगवणारच मी. उद्यां कोर्टांत जाणारच असाल ना ? "

' आलच आहे नशीबीं तें ' "

' मी पण येणार आहें; पण तिकडे प्रेक्षकांतच बसणार मी, माझे ते दोस्त आहेतच माझी सोय करायला. चला पकडा माझा हात "

जिना उतरून खालीं आल्यापासून चारदोन मिनिटांतच ते आपल्या इच्छित स्थळाजवळ आले. लॉरी दार उघडून आंत शिरले, पण सिडने मात्र कांहीं क्षण

तसाच तिथें घोटाळत होता. आणि मग जरा चार पावलें पुढें जाऊन तो परत मागें आला आणि मोठ्या भक्तिभावानें त्या बंद दाराला त्यानें स्पर्श केला ला फोर्सच्या दिशेनें त्यानें मग पाऊल उचललें त्याची ल्यूसी त्याच रस्त्यानें नेहमी जात होती नाहीं मग त्या रस्त्यालासुद्धा पवित्र स्थानाचें माहात्म्य कां नाही येणार ? आणि म्हणूनच एखाद्या भाविक यात्रेकरूप्रमाणें सिडने त्या रस्त्यानें भरल्या हृदयानें हळू हळू चालला होता.

ला फोर्सच्या तुरुंगाजवळ तो आला तेव्हां रात्रीचे दहा वाजले होते त्याची ल्यूसी कितीतरी वेळा त्या ठिकाणीं उभी राहिली होती. तो आरकशी आपलें दुकान बंद करून विडी फुकीत आतां दारांत उभा होता.

" गुड नाइट सिटीझन, " दुकानाजवळ उभा रहात सिडने म्हणाला. कारण ते सद्गृहस्थ त्याच्याकडे मोठया चोकसपणें पहात होते.

" गुड नाइट सिटिझन.'

" कस काय चालल आहे लोकराज्य ? "

" म्हणजे आमची गिलोटीन कीं नाहीं, छान, ठीक ! त्रेसष्ट आकडा आहे आजचा आतां शभरी काय हां हां म्हणतां आमचे ते कारागीर मात्र दमलों आतां म्हणून म्हणू लागले आहेत. पण मी म्हणतों बेट्यानों, एवढ्यात रे अम दमायला काय झाल ! हा — हा — हा ! "

" रोज जातां का तुम्ही—"

" हॉं हॉं! अहो, हा काय प्रश्न रोज अगदीं न चुकता. तुम्हीं गेला होता का कधीं ? "

" नाहीं बोवा. "

" मग भरदार कार्यक्रम असेल, तेव्हां जरूर जा तर. अहो, काय झटपट काम उरकतात ते आमचे कारागीर ! चार विड्या नाहीं फुकून झाल्या माझ्या तों खलास. अगदीं देवाशपथ ! " दात विचकीत तो म्हणाला. त्याचे ते हात-वारे नि विचकलेले दांत पाहून सिडनेला तर त्याला तिथे तसाच दांत विचकीत आडवा घालावासा वाटला. पण आपला राग आवरून त्यानें पाय उचलला.

" काय हो पण तुमच्या पोशाखावरून तर तुम्ही इंग्रज दिसतां ? "

" होय इंग्रजच, " आपलें पाऊल थांबवून सिडने म्हणाला.

" पण तुम्हीं फ्रेंच तर अगदीं अस्सल बोलतां आहांत. "

" अहो, विद्यार्थीच होतों मी इथे मुळी. "

" आऽहा, अगदीं अस्सल फ्रेंच ! गुड नाइट, इंग्लिशमन. पण जरूर जा बरं का उद्या, ती मौज बघायला आणि विड्या पण नका ह विसरू बरोबर न्यायला !"

काहीं अतर पुढे जाऊन त्याला तो अरकशी दिसेनासा झाल्यावर सिडने एका दिव्याजवळ उभा राहिला आणि एका कागदाच्या तुकड्यावर त्यानें पेन्-सिलीनें कांहींतरी लिहिलें. आणि मग एखाद्या माहितगारासारखीं ताठ पावलें टाकीत, त्या काळोख्या रस्त्यांवर पसरलेल्या गलिच्छ कचराघाणींतून वाट काढीत एका केमिस्टच्या दुकानाजवळ येऊन उभा राहिला. दुकानदाराची विरूप वामन मूर्ति दार बद करण्याच्या विचारांतच दिसत होती ' गुड नाइट सिटिझन ' म्हणून त्याला अभिवादन करून कार्टननें हातांतील कागद त्याच्यापुढें सारला. " शू ! " अशी तोंडानें शीळ घातल्यासारखें करीत तो कागद वाचून तो केमिस्ट एकदा " ही-ही–ही ! " करून हासला.

" कोणा, तमन्यासाठीं, सिटिझन ? " त्यानें विचारलें

" हांय, माझ्याचसाठीं. "

" पण पुड्या नीट वेगवेगळ्या ठेवा बर का, सिटिझन. त्या एक झाल्या तर काय होईल माहित आहे ना ? "

" अगदीं पूर्ण," सिटननें उत्तर केलें आणि मग त्या पुड्या हातांत पडल्या-वर त्या खिशात नीट ठेवून नि त्याचे पैसे मोजून त्यानें भयपणें बाहेर पाऊल टाकलं " आता उद्यापर्यंत तर कांहीं काम नाही," वर प्रकाशत असलेल्या चद्रकोरीकडे पहात तो पुटपुटला " आणि मला झोप तर काहीं येत नाहीं."

सर्व आयुष्यभर विफळ श्रम आणि भटकती करून अगदीं श्रात झालेल्या, पण आता पूर्ण विचाराती ठरवलेल्या मार्गाला येऊन प्रवासाचा अखेरचा टप्पा डोळ्यांसमोर निश्चितपणें दिसत असलेल्या वाटसरूसारखी, त्याच्या आवाजांत आत्मविश्वासाची छटा आज दिसत होती किती तरी वर्षापूर्वी भर तारुण्यात, भविष्यकाळ मोठा मोहक, गुलाबी, सुदर दिसत असतां त्याचीं मातापितरें त्याला सोडून गेलीं होतीं पण आज इतक्या दिवसांनतर, वर आकाशातील अभ्राच्छादित चद्रप्रकाशात त्या अधाऱ्या बोळकडींतून तो जात असतां, आपल्या बापाच्या मृत्युशय्येजवळ उभा राहून वाचल्या गेलेल्या त्या प्रार्थनेतील शब्द त्याच्या हृदयांत आता जागे होत होते.

भगवान् म्हणतात "जगाचं पुनरुत्थान नि जीवन मीच आहें.
माझ्यावर अनन्यभाव ठेवणारा, मरूनहि जगतच असतो, माझा
अनन्यभक्त सदा अमरच आहे — मृत्यूनंतरहि अमरच आहे ''

मृत्यूचं थैमान अहोरात्र चालत असलेल्या त्या शहरांतील रात्रीच्या त्या उदास एकांतांत तो असा एकटाच भटकत असतां, आज बळी पडलेल्या नि उद्या नि उद्यांच्या उद्यां बळी पडणाऱ्या असंख्य दुर्दैवी जीवांचे विचार त्याच्या अंतःकरणांत त्या वेळीं जागे होऊन उसळत असतां, त्याच्या वडिलांच्या मृत्युशय्येजवळ त्याच्या कानावर पडलेलें भगवतांचें तें धीरगंभीर आश्वासन, आज आतां परत त्याच उत्कटत्वानें त्याच्या हृदयांत कां घुमत होतं, हें शोधून काढणं त्याला मुळींच कठीण नव्हतं पण त्याचा विचार न करतां त्या पवित्र आश्वासनाचा पुनरुच्चार करीतच विचारांच्या तंद्रींत तो सावकाशसावकाश वाट चालत होता.

त्याच्या आसमंतात, त्या अराजक अदाबुद नगरींतील सर्व व्यापार आतां बंद होत होते, काय मिळेल ती शांति नि विश्रांति उपभोगण्यासाठीं सर्व घरांचीं दारें खिडक्या बंद होत होत्या, ढोंगी, बदफैली ऐशआरामी धर्मगुरूंच्या आचार-विचारांचा वीट आल्यानें ओसाड पडलेलीं प्रार्थनामंदिरें, उदासवाणीं त्याच्या-कडे पहात होतीं, असंख्य मृत्युशय्यांनीं भरगच्च भरलेली स्मशानवाटिका भेसूर शांततेंत पार बुडून गेली होती; आणि तिकडे त्या भयानक तुरुंगाच्या आवारां-तील ते मृत्युपथाची अटळ वाट चालत असलेले अगणित राजबंदी, अस्वस्थपणें तळमळत अश्रु गाळीत निद्राधीन होत होते. त्या अहोरात्रीच्या अशांततेंतील क्षणजीवि शांतता त्या नगरीवर नीरव पसरत होती. मनात उसळत असलेल्या विचारकल्लोळात मग्न होऊन सिडने कार्टन सीनचा पूल ओलांडून भरपूर उजेड असलेल्या रस्त्यांत आतां प्रवेश करीत होता.

रस्त्यांनें गाड्याघोड्यांची कांहींच गडबड चालू नव्हती. कारण श्रीमंतीच्या त्या प्रकट चिन्हांतून हिंडून आपले प्राण धोक्यांत घालणें इष्ट नसल्यानें, डोक्या-वर एकच लालरंगी टोपी चढवून नि पायांत जड बूट अडकवून सर्व सान-थोर वाट तुडवीत होते पण रस्त्यावर गाड्यांची जरी गर्दी दिसत नसली तरी नृत्य नि नाट्यमंदिरांजवळ मात्र लोकांची गर्दी अजूनहि दिसत होती. नाट्य-प्रयोग संपून लोकांच्या टोळया मोठ्यानें गप्पागोष्टी करीत नाट्यमंदिरांतून बाहेर

पडत होत्या एका प्रवेशद्वाराजवळ उभ्या असलेल्या एका छोकरीकडे नि तिच्या आईकडे त्याचें लक्ष गेलें समोरील चिखलांतून वाट कशी काढावी याचा विचार करीत तीं मायलेकरें उभा असलेलीं दिसत होतीं सिडनेनें झटकन पुढें होऊन त्या छोकरीला वर उचलून पलीकडे नेलें, आणि तिला नीट खालीं ठेवून तिचा भितरा लाजरा हात त्याच्या मानेपासन भेल होण्यापूर्वी त्यानें तिला हळूच विचारलें, " मी तुझा पापा घेऊं बाळ ? "

' जगाचं पुनरुत्थान नि जीवन मीच आहें. माझ्यावर अनन्य-भाव ठेवणारा, मरूनहि जगतच असतो. माझा अनन्यभक्त, सदा अमरच आहे — मृत्यूनंतरहि अमरच आहे "

सर्व रस्ते आता पूर्णपणें शांत झाले होते; रात्र वाढत चालली होती. आणि भगवंताचें तें आश्वासनवचन त्याच्या पावलांच्या प्रतिध्वनीसारखेंच जसें काही आसमंतात मंदपणें घुमत होतें विस्मयेपणानें पुढें पाऊल पडत असतां त्याच्या शांतचित्त, प्रसन्न अंतरंगात त्याचा मधुर झंकार होत होता आणि त्याची वाणी त्या वचनाचा पुनरुच्चार करून धन्य होत होती ......

वाढत्या रात्रीच्या निगूढ शांततेंत, खाली पुलाखालीं — जवळील भिंतीवर लोळण घेणाऱ्या लाटांचा लप् लप् असा होत असलेला आवाज ऐकत, तो शांतपणें उभा होता त्याच्या सभोंवार पसरलेल्या घरांच्या नि देवळांच्या रांगा चंद्राच्या मदधुसर प्रकाशात मोठ्या मजेशीर दिसत होत्या. तो तसाच खालीं पहात तिथें असा नि स्तब्ध उभा असतां, पूर्व दिशा प्रेतासारखी पांढरीफटक पडूं लागली आणि रात्रहि निस्तेज होऊन गतप्राण होत असलेल्या चंद्र नि तारामंडळाच्या जोडीनें दिमेनाशी झाली. आणि काही काळ तरी सभों-वारचें तें अखिल चराचर, मृत्युदेवतेच्या आधिराज्यांत संपूर्ण बुडून गेल्या-सारखे दिसू लागलं

पण थोड्याच वेळात विश्वनंदन दिनराजाचे सुखकर आरक्त किरण चराचरा-वर स्वैरपणें नाचू लागले आणि साऱ्या रात्रभर सिडनेच्या हृदयांत घुमत अस-लेलें तें भगवंताचें आश्वासन तेजाळपणें त्याच्या अंतःकरणात प्रकाशू लागलें. आत्यंतिक समाधानानें डोळ्यांसमोर हात धरून त्यानें पूर्वेकडे पाहिले, नि त्या चमकणाऱ्या जलराशीच्या पलीकडून काहींतरी दीप्तिमान तेजज्योति सूर्य-मंडलांतून त्याच्या अंतरंगांत जणु शिरत असल्यासारखें वाटलें. ...

पुलाखालीं सीनचा तो अथांगजलप्रवाह वेगानें पुढें वहात चालला होता. त्याच्या कांठाकांठानें चालत शहरापासून तो आतां बराच दूर आला होता. सभोंवार सारें कांहीं निर्मनुष्य होतें त्यानें तसेंच त्या एकांत नदीकाठावर आंग टाकलें आणि सूर्यकिरणांनीं आपली ऊबदार शाल त्याच्या आंगावर पसरली. समोर त्याच्याजवळच एक चिमुकला भोंवरा, आपल्या आंगाभोंवतीं निष्फळ गिरागिरत पुढें जाऊन नि जलधारेंत प्रवेश करून सागराच्या उदरांत विलीन होण्यासाठीं आता पुढे जात होता — "माझ्याच सारखा रे तू !" तिकडे पहात तो पुटपुटला.

समोरून एक छोटेखानी मालवाहू गलबत त्याच्या दृष्टिपथात येऊन आस्ते आस्ते दूर जात आतां दिसेनासें होत होतें. त्याच्यामागें उमटलेला पाण्यावरील सपाट पट्टाहि कायमचा पुसून जात होता तिकडे पहात असतां गतायुष्यातील अनेक अपराधसहस्र त्याच्या मनांत परत परत जागे होत होते. पण "जगाचं पुनरुत्थान नि जीवन मीच आहें," हे भगवताचे शब्दहि तितक्याच वेळीं त्याला धीर देत होते.

— तो घरीं येऊन पोंचला त्यावेळीं मि. लॉरी बाहेर पडलेहि होते. हात-तोंड स्वच्छ धुऊन नि थोडा अल्पाहार उरकून सिडनेहि मग बाहेर पडून कोर्टाच्या आवारात दाखल झाला ती सर्व जागा अधार्शी श्रोत्यांनीं आणि प्रेक्षकांनीं कशी फुलून गेली होती बारसाडनें त्याला आत आलेला पहातांच एका कोंपऱ्यात त्याला कशीबशी जागा करून दिली त्याच्यासमोरच लॉरी नि डॉक्टर मॅनेट बसलेले दिसत होते आणि ती पण आपल्या वडिलांच्या जवळ बसलेली त्याला दिसली

तिच्या पतीला आंत आणतांच तिनें त्याच्याकडे निश्चलपणें पाहिलें अंत-रगांत उसळत असलेल्या त्याच्याविषयींच्या अथांग प्रेमानें आणि तळमळीनें तिच्या कुसुमकोमल अंतःकरणाची होत असलेली कालवाकालव मोठ्या धीरानें दाबून, त्याच्याकडे स्थिर दृष्टीनें पहात ती त्याला आश्वासून धीर देत होती. तिच्या त्या डोळ्याशीं डोळा भिडतांच चार्लमच्या फिकट चेहेऱ्यावर लाली पसरली, त्याचे डोळे धैर्यानें तळपूं लागले नि हृदय आत्मविश्वासानें फुलून आलें. आणि चार्लसच्या चेहेऱ्यावरील ल्यूसीच्या आश्वासक दृष्टिक्षेपानें झालेला हा

बदल, अगदीं हुबेहूब त्याच स्वरूपांत तितक्याच उत्कटतेनें तिकडे सिडनेच्य चेहेऱ्यावर नाचताना त्या वेळीं कोणालाहि दिसला असता.

न्यायकोर्टाच्या — अहं ! — अन्याय कोर्टाच्या कामास सुरुवात झाली. पण कोर्टाचा रागरंग आज साराच पार पालटला होता. न्यायमूर्ति व त्यांचे सहकारी नि ज्यूरींतील गृहस्थांचे चेहेरे आज अत्यंत उग्र नि कठोर दिसत होते. निर्णय काय द्यायचा हें अगाऊ ठरवूनच ते तेथें बसल्यासारखे दिसत होते. सरकारी वकीलांचा चेहेराहि आज अतिशय नाठर दिसत होता. त्यांच्या डोळ्यांतहि जसा खून चढून ते सर्भोवार पहात होते आणि त्यांच्यासमोरील ते प्रेक्षकांतील असंख्य डोळेहि तसेच खून भरल्या नजरेनें एकमेकांकडे पहात आपसांत कुज वुजत होते. ज्यूरीमध्यें आज जॅकस तीनची रक्तपिपासु भैरवमूर्ति नव्यानेंच बसलेली दिसून येत होती. सेंट अ‍ॅंटॉईनचा आजचा तोच प्रमुख प्रतिनिधी बनला होता आणि ज्यूरीचें तें एकंदर वातावरण, निष्पाप हरिणबालकाची चीरफाड करण्यासाठींच जमलेल्या क्रूर लांडग्यांच्या संमेलनासारखच भयानक क्रू दिसत होत.

कोर्टांतील कामकाजाचे सर्व नियम आज सुडाच्या वावटळींत उडून पा नाहींसे झाले होते. चार्लसच्या आरोपांचा एकदम पुकारा होऊन खटल्यास प्रारंभ झाला. लोकराज्याचा द्रोही, उच्चकुलीन आणि एका अरेरावी, घमेंडा नंदन, क्रूर, अत्याचारी नि लोकांचे हक्क बेगुमानपणें पायदळीं तुडवून त्यांची पिळवणूक करणाऱ्या कुप्रसिद्ध एव्हरमॉंड घराण्याचा वंशज, म्हणून चार्लस आज कोर्टापुढें उभा केला गेला होता. देहांतशासनाची एकच एक शिक्षा य साऱ्या गंभीर आरोपांसाठीं कायद्यानें ठरविलेली होती. सरकारी वकिलांनीं य आरोपांची यादी वाचून दाखविली नि ते खालीं बसले.

" हे आरोप जाहीर रीतीनें केले आहेत कीं गुप्तपणें ? " न्यायमूर्तीन विचारलें.

" जाहीर रीतीनें. "

" कोणी केले आहेत हे आरोप ? "

" तीन व्यक्तींनीं, अर्नेस्ट डेफार्ज, सेंट अ‍ॅंटॉईनचा दारू दुकानदार.

" ठीक. "

" त्याची पत्नी, थेरेस डेफार्ज. "

" बरं."

" आणि डॉक्टर अलेक्झँडर मॅनेट ! "

डॉक्टरांच्या नावाचा हा असा उच्चार झाल्याबरोबर कोर्टांत एकच गलका नि गोंधळ उसळला. डॉक्टर बसलेल्या जागेवरून उठून उभे राहिले त्याचा देह नखशिखांत थरथरत होता.

" अध्यक्ष महाराज, मला सांगायला वाईट वाटतं, पण हा सर्व बनाव बनावट आहे — साफ खोटा आहे ! आपल्याला माहीतच आहे कीं, आरोपी हा माझ्या कन्येचा विवाहित पति आहे माझी कन्या आणि तिचे सर्व आप्त स्वकीय हे मला प्राणापेक्षांहि प्रिय आहेत मग माझ्या कन्येच्या या प्रियपतीवर मी हे आरोप करतों, असं कोण लफंगा सांगतो आहे ? "

" सिटिझन मॅनेट, शांत व्हा कोर्टाचे अधिकार न जुमानणं म्हणजे तुम्ही स्वतः अराजक बनून सत्ताद्रोह करण्यासारखं आहे आतां तुमच्या त्या प्राणापेक्षांहि प्रिय, असणाऱ्याविषयीं म्हणाल तर, कोणीहि सच्चा सिटिझनला लोकसत्तेहून अधिक कांहीच प्रिय असणं शक्य नाहीं "

" शाबास शाबास, अगदीं बरोबर ! " लोकांचा ओरडा झाला आणि शांतता प्रस्थापित करण्यासाठी अध्यक्षांनीं घंटानाद केला

" आणि ही लोकसत्ता आपल्या प्राणप्रिय कन्येच्याहि त्यागाची जर आपल्याजवळून अपेक्षा करीत असेल, तर तो त्याग हेंच तुमचं एकमेव कर्तव्य आहे. तरी आतां काय चाललं आहे तें शांतपणें पहा नि मध्यंतरीं एक अक्षरहि बोलू नका ! "

लोकांनीं अतिशय खूष होऊन गमनिदर्शक टाळ्यांचा खूप जोरानं कडकडाट केला डॉक्टर मॅनेट ओंठ थरथरत आपल्यासभोंवार पहात खालीं बसले. त्यांच्या कन्येनें त्यांचा हात घट्ट पकडून नी त्यांचे आधिक जवळ सरकली.

कोर्टांतील गोंधळ जरा थांबल्यानंतर डिफार्ज पुढें आला नि त्याच्या जबानीस सुरुवात झाली डॉक्टरांच्या तुरुंगवासाची हकीगत प्रथम सांगून नि आपण त्यांच्या नोकरींत एक लहान छोकरा म्हणून कसे होतो आणि त्यांच्या सुटकेनंतर त्यांची अवस्था वेड्यापीशासारखी नि पूर्णपणें असहाय्य अशी कशी होती नि त्यांची काळजी आपण कशी घेतली हें सर्व त्यानें पाल्हाळ न लावतां झटकन सांगून टाकलें. या त्याच्या जबानीनंतर कोर्टाच्या प्रश्नांस प्रारंभ झाला.

" बॅस्टिल सर करण्याची महत्वाची कामगिरी तुम्हाच पार पाडली नाहीं ?"

" असं थोडं खरं " यान वेळीं कोर्टातून कोणीतरी कर्कश आवाजांत बोलू लागलें " त्या सान्या देशभक्तांच्या आघाडीला तुम्हीच होतां नव्हे? मग तसं स्पष्ट सांगत का नाहीं ' तो सारा दिवस तोफखाना तुम्हाच मोठया शौर्यानें संभाळलात आणि तो किल्ला सर होतांच तुमचेंच पाऊल सान्यांच्या पुढें होतें? बोला, देशभक्त हो, बोला, हें सत्य आहे ना?"

लोकमताच्या जोरदार पाठिंब्याच्या बळावर कराल काली आता कडाडली होती. अध्यक्षांच्या घंटेचा परत आवाज झाला पण तिकडे दुर्लक्ष करून लोकांच्या सहकार्यानं अधिकच उत्तेजित होऊन ती किंचाळली. "वाजवा, वाजवा, खुशाल आणखी जोरानें वाजवा " आणि लोकानीहि तिच्यावर अगदीं निहायत खुप होऊन टाळ्याचा परत कडकडाट केला

' सिटिझन डेफार्ज, तुम्ही आत त्या तुरुंगात काय काय केलत तें सारं कोर्टाला सांगा "

" मला असं माहित होतं, ' त्याच्याकडे टक लाऊन पहात असलेल्या आपल्या पत्नीकडे बघत तो म्हणाला. " मला माहित होतं कीं, मी वर सांगितलेला तो कैदी नॉर्थटॉवरमधील एकशें पाच नंबरच्या कोठडींत ठेवलेला होता. त्याच्याच तोंडून मी तें ऐकलं होतं. स्वतःला तो एकशें पाच, नॉर्थ टॉवर याच नांवानं ओळखीत असे माझ्या घरात तो चांभारकाम करीत असताना मी तें ऐकलं आहे तुरुंग सर होतांच त्या कोठडीचा शोध करायचं मी ठरवलं होतं. तुरुंग सर झाला, आम्ही आंत घुसलों आणि जेलरला आणि आजच्या ज्यूरींतील त्या गृहस्थाना घेऊन मी त्या कोठडात शिरलों आंत बसून तपास करीत असता धुराड्यांतील एका सैल दगडामागे ठेवलेले कांहीं कागद मला सापडले. डॉक्टराचं हस्ताक्षर माझ्या परिचयाचं असल्यामुळे, हे माझ्या हातातील कागद त्यांच्याच हस्ताक्षरांत लिहिले आहेत याविषयीं मला काडीइतकी शंका नाहीं डॉक्टराच्याच हातचा हा पुरावा, आपल्या समोर मी आतां ठेवतों. '

' वाचा, वाचा ते कागद "

त्या कागदांच्या वाचनास सुरुवात झाली. सारं कोर्ट आतां अगदीं शांत बसलं होतं. चार्लसचे डोळे मोठ्या प्रेमानें आपल्या पत्नीवर स्थिरावले होते, त्याची पत्नी तितक्याच उत्कट प्रेमानें त्याच्याकडे पहात मधूनच आपल्या

वडीलांकडे अतिशय काळजीनें पहात होती, डॉक्टराचे विस्फारित नेत्र त्या वाचकाच्या तोंडाकडे लागले होते, मॅडम डेफार्जची नजर चार्लसच्या चेहेऱ्यावरून एक क्षणभरसुद्धा ढळण्यास नाखूप दिसत होती; डेफार्जची दृष्टि आपल्या पत्नीवर सारखी खिळली होती आणि इतर झाडून साऱ्या व्यक्तींचे डोळे डॉक्टरांकडे लागले होते. पण ते मात्र दुसऱ्या कुणाकडेच पहात नव्हते — कागदांचें वाचन चालू झालें

—

## .... १० ....

" मी अलेक्झॅंडर मॅनेट, दुर्दैवी डॉक्टर मॅनेट, बोव्हेचा रहिवाशी पण आता पॅरिसमध्यें स्थायिक बनलेला, ही माझी शोकपूर्ण कहाणी आज १७६७ च्या डिसेंबरांत या माझ्या उदास कोठडींत लिहीत आहें चोरून मारून, वेळ सांपडेल तसच माझ हें सर्व लेखन झाल आहे कोणाला न कळत मोठ्या परिश्रमानें तयार केलेल्या धुराड्यातील त्या कोनाड्यांत मी तीं नीट ठेवून देणार आहें माझी तीन चिमट्या राखाडी होऊन माझी आठवणसुद्धा काळाच्या उदरांत कायमची गडप झाल्यानतर कदाचित् एखाद्या दयाशील महात्म्याच्या हातात ती पडून माझी ही कहाणी जगापुढें येईलहि

" स्वत च्या आंगांतील रक्तांत कोळसा आणि काजळी खलून तयार केलेल्या शाईत, एका गजक्या खिळ्याच्या टोकानें मी हें सर्व लिहीत आहें. माझ्या बंदिवासाला आज दहा वर्षे होऊन गेलीं आहेत आणि सुटकेची आशा मला केव्हाच सोडून गेली आहे असल्या या निराश अवस्थेत आणि दारुण एकांतवासात माझा स्मृतिभ्रंश होऊन मला कदाचित वेड लागेल, अशी मला राहून राहून भीति वाटते आहे पण परमेश्वराची पवित्र शपथ घेऊन सांगतों कीं, हें सर्व लिहीत असतां मी पूर्णपणें शुद्धीवर आहें — माझी स्मृति चांगली शाबूत आहे, आणि माझे हे अखेरचे शब्द कोणा मानवी व्यक्तीच्या वाचनांत कधीं येवोत वा न येवोत — पण परमेश्वरी न्यायासनासमोर जगाच्या त्या अंतकाळीं माझ्या या लिखाणाचा जाब द्यायला मी पूर्ण तयार आहें.

" १७५७चा डिसेंबर महिना होता तो — २२ तारीख असावी मला वाटतं

त्या दिवशीं. रात्र अशी चंद्रप्रकाशी पण आकाश मेघाच्छादित नि उदास. असा जेवण झाल्यानंतर जरा फेरफटका करून देहाला विश्रांति नि उल्हास यावा म्हणून माझ्या घरापासून जवळच सीन नदीच्या धक्क्यावरून मी हळू हळू फिरत होतों तुफान वेगानें पिटाळीत येत असलेल्या एका गाडीच्या चाकांचा आवाज माझ्या कानावर आला नि ती गाडी जाऊ देण्यासाठीं मी जरा बाजूला झालों. नाहींतर माझ्या आंगावरूनच ती गाडी गेली असती माझ्याकडे पहात कोणीं-तरी गाडींतून डोकें बाहेर काढलें नि गाडीवानास गाडी थांबविण्यास सांगि-तलें गेलें

" गाडी काहीं अंतर पुढें जाऊन मगच खडी झाली नि त्याच आवाजांत मला कोणी तरी नावानें हाक मारली मी प्रत्युत्तर देऊन पुढें झालों गाडी बरीच पुढें जाऊन थांबली असल्यानें मी तिथें जाऊन पोंचेपर्यंत गाडीतून दोन गृहस्थ खालीं उतरून गाडीच्या दाराजवळ उभे राहिले होते दोघांचेहि देह पायघोळ झग्यानें आच्छादले होते आणि त्यांनीं आपलीं तोंडं काळोखाकडे केलीं होतीं दोघेहि जवळ जवळ माझ्याच वयाचे किंवा जरा लहानच असे सारख्याच वर्णाचे आणि आवाजांतसुद्धा सारखे, दिसत होते मला दिसत होता तेवढा त्यांच्या चेहऱ्याचा भागसुद्धां अगदीं एकसारखा होता

" डॉक्टर मॅनेट ना आपण ? ' त्यांपैकीं एकानें विचारलें

" होय मीच डॉक्टर मॅनेट '

" मूळचे बोव्हेचे पण आतां पॅरिसचे रहिवाशी झालेले नि गेल्या एकदोन वर्षांत एक नामांकित शस्त्रवैद्य म्हणून गाजलेले, नव्हे ? " दुसरा म्हणाला

" सद्गृहस्थ, इतक्या मोठ्या मानाला मी पात्र नाही," मी म्हणालों.

" आपण घरात नव्हतां, पण आपण बहुधा इथे आम्हाला गांठाल असं आम्हाला आपल्या घरी कळल्यामुळें आम्ही इकडेच आलों वर गाडींत चढाल का आपण ? " तो पहिला म्हणाला.

" त्या दोघांचा एकंदर रागरंग काहीं हुकमी दिसत होता आणि ते दोघेहि आतां माझ्या दोन बाजूला हत्यारबंद असे उभे होते पण मी मात्र पूर्ण नि-शस्त्र होतों.

" सद्गृहस्थ, मला माफ करा, पण कुठंहि जाण्यापूर्वी माझ्या कामाचं स्वरूप आधीं कळून घेण्याची माझी पद्धत आहे, " मी म्हणालों.

" डॉक्टर तुमचे क्लायंट्स् हे सुखवस्तु आहेत," तो दुसरा उत्तरादाखल म्हणाला. " आणि केसच स्वरूप समजून घेण्याची कामगिरी आम्ही आपल्या-वरच सोंपवितों. आपल्या कौशल्यावर आमचा तसा विश्वास आहे बस्स ! वर गाडींत चढाल का आपण ? "

" निमूटपणें गाडींत शिरण्या व्यतिरिक्त दुसरा कांहीं इलाज नसल्यानें मी गुपचूप आंत शिरलों आणि ते दोघेहि आंत उडी मारून बसतांच गाडी परत भरधाव दौडू लागली.

" जस घडल नमच त सार सभापण, अगदी अक्षर नि अक्षर मी लिहिल आहे त्यांत मला तिळमात्रहि शंका नाही. आता याच्यापुढें जिथे जिथे विराम, फुल्या दिसतील, त्या मी आपले कागद मधूनच लपवून ठेवीत असल्यानेंच केल्या-आहेत मजकूरमात्र जसा घडला तसाच अखंड असा लिहिण्याची मी खबर-दारी घेतली आहे

* * *

" गावापासून सुमारें एक मैलभर दूर अशा एका एकांत बाजूला असलेल्या घराच्या बागेजवळ आमची गाडी थांबली. खाली उतरून आम्ही त्या दमट पायरस्त्यानें बागेतून एका घराच्या दाराजवळ येऊन थांबलों. दारावर आवाज केल्याबरोबर कांही दार उघडलें नाहीं. आणि तेवढ्यानें त्या साहेबांना मोठा घुस्सा येऊन तें दार उघडलें जाताच त्या दोघांपैकीं एकानें दार उघडणाऱ्याच्या तोंडावर एक ठोसाहि लगावला

" यांत विशेष असं काहीच नव्हत, कारण माणसं अशीं कुत्र्यासारखीं लाथेच्या ठोकरीनं तुडवलेलीं मी अनेक वेळा पाहिली होतीं पण त्याच्या पाठो-पाठ त्या दुसऱ्या भावानेंहि त्याला गुद्दा लगावून आपलाहि राग व्यक्त केला. आणि त्या वेळची त्या दोघाची कृति नि चेहेरेमोहरे मला इतके सारखे दिसले की, ते दोघे जुळे भाऊ आहेत ही गोष्ट प्रथमच माझ्या लक्षांत आली.

" आम्हांला वाटेंत लागत असलेली दारें कुलूप लावून बंद केलेली होतीं आणि आम्ही तिथे आंत जातांच तीं परत तशींच बंद होत होतीं. वरच्या माडीवरून खालीं कोणाच्या तरी किंकाळ्या सारख्या ऐकू येत होत्या जिन्यानें वर त्या खोलीकडे जात असतां त्यांचा आवाज अधिकच मोठा होत होता. आत पाऊल टाकतांच समोरील पलंगावर कोणी तरी उन्मादवायूनें आगांत ताप फणफणत असं मोठ्यानें विवळत ओरडत होतं.

" वीसबावीस वर्षांची असाधारण सौंदर्यवती अशी ती एक तरुण स्त्री होती तिच्या मस्तकावरील विपुल नाजुक केस अस्ताव्यस्तपणें तिच्या मुखा-भोंवतीं विखुरले होते, नि बरेच दिवसांत त्यांना तेलफणीचा मुळींच स्पर्श झाला नसावा असं दिसत होतं. तिचे हात दोन्ही बाजूला एका शालीनें नि रुमालानें बांधले होते कुणातरी पुरुषाचींच तीं आभरणें होतीं शालीच्या एका फर्दाच्या कोंपऱ्यांत एका उमराव घराण्याची निशाणी नि ई असं अक्षर विणलेलं दिसत होतं

" आत पाऊल ठेवल्यापासून एकदोन मिनिटांतच मी हें सर्व पाहिलें होतें. ती पलंगावरील स्त्री अस्वस्थपणें आपली मान सारखी घुसळीत होती नि या घुसळण्यांतच तें शालीचें टोंक तिच्या तोंडांत शिरून ती धुसमटत होती. मी झटकन तें टोंक प्रथम दूर केलें आणि त्याच वेळीं शालीवरील तीं चिन्हें मी पाहिलीं होतीं.

" तिच्या छातीवर हात ठेवून नि तिच्या चेहेऱ्याकडे पहात तिला शांत करण्याचा मी प्रयत्न करीत होतों. तिच्या डोळयांच्या बाहुल्या फिरल्या होत्या आणि ती कांहीं विलक्षण तऱ्हेनें डोळे गरगरावीत इकडे तिकडे पहात होती. तिच्या हृदयभेदक किंकाळया चालूच होत्या आणि ' माझे पति, माझे बाबा नि माझा भाऊ राया '' हे शब्द परत परत उच्चारीत एक दोन तीन असे बारापर्यंत अंक ती मोजी, आणि मग — 'बस्स खलास '' असें मोठ्यानें उद्गारून जरा थांबे. मग कांहीं वेळ काहींतरी ऐकल्यासारखं करून ती परत किंचाळत, ते शब्द उच्चारीत बारापर्यंत आकडे मोजी नि मग, 'बस खलास !' असं परत ओरडून शांत होई. यात कांहींहि बदल होत नव्हता, तेच शब्द, तोच क्रम आणि तीच म्हणण्याची तऱ्हा — असा सारखा कितीवेळ तरी तिचा कार्यक्रम चालला होता.

" किती वेळ चालल आहे हें असं ? " मी विचारलं.

" गेल्या रात्रींपासून चालल आहे हें, " त्या भावां पैकीं मोठ्यानें उत्तर केलें मोठा नि धाकटा हा मी आपल्या सोईं करतांच फक्त भेद केला आहे.

" यांना कोणी पती, भाऊ नि वडील आहेत वाटत ? "

" एक भाऊ. "

" मी त्याच्याशींच तर बोलत नाहीं ! "

" त्यानें अतिशय तिरस्कारानें ' नाहीं,' असें उत्तर दिलें.

" या बारा आकड्याशी कांहीं कसला संबध पोंचतो का? नाहीं सांगता येत? बरं! पहा पण मग, मला जर याची कांहीं कल्पना असती तर आवश्यक औषधं मला आणतां आली असती. पण आतां कांही वेळ हा मोडणारच, कारण इथे या एकात स्थळीं कांही मिळण शक्य नाही. "

" मोठ्या भावानें धाकट्याकडे एक दृष्टीक्षेप केला, आणि त्यानें 'आहेत की इथे' अस मोठया ताठरपणें मला सांगून औषधाची एक पेटी आणून ती त्यानें माझ्या समोर ठेवली

* * *

" त्या खोक्यांतलि बाटल्याचे बूच काढीत त्यांचा वास घेत आणि कांहींची थोडी चव पहात परीक्षा करून एक मिश्रण मी तयार केलें. नि मोठ्या कष्टानें त्या स्त्रीस तें पाजून औषधाचा परिणाम पाहून परत डोस देण्यासाठी म्हणून मी तसाच तिच्या छातीवर हात ठेऊन बसलों. सभोंवारच्या एकदर स्वरूपावरून घर जुनाट, दमट, जेमतेम आवश्यक सामान असलेलें असें दिसत होतें त्या तरुणीच्या किंकाळया बाहेर जाऊं नयेत म्हणून खिडक्यांना भले जाडजूड पडदे चुका मारून बसवले होते. तिच्या किंचाळ्या, ' माझे पति, वडील, नि भाऊराया!' असे शब्द नि ते बारा अक मोजणें आणि मग तें ' बस खलास!' असें ओरडत स्तब्ध राहणें हें हा सर्व वेळपर्यंत सारखें चालूच होतें. तिचा त्या आंग घुसळीत किंचाळण्याचा आवेग इतका जोरदार होता कीं तिच्या हाताची तीं बधनें तशींच राहू देणे मला इष्ट वाटलें. पण तीं त्रासदायक होणार नाहींत एवढी मात्र मी काळजी घेतली. माझा हात छातिवर असल्यानें तिची चळवळ आतां थोडी कमी होत होती. पण किंचाळया नि तें बडबडणें मात्र घड्याळाच्या लंबकाप्रमाणें नियमितपणें सारखें चालूच होतें. मी तसा बसलों असतां ते दोघे भाऊ माझ्याकडे पहात तसेच उभे होते. सुमारें अर्ध्या तासानतर मग मोठा मला म्हणाला, ' आणखीं एक रोगी आहे डॉक्टर. '

" मी एकदम दचकून विचारलें. ' अगदीं निकडीनेंच पहायला हवा? '

" तुम्हींच बघा तें, " तो तुसडेपणानें म्हणाला नि त्यानें दिवा वर उचलला.

* * *

" मागील एका खोलीचा पोटमाळा होता तो वर तक्तपोशी दिसत नव्हती आणि आंत एका बाजूला गवत पेंढा आणि लाकडाच्या कांहीं मोळ्या रचल्या होत्या यां मधूनच वाट काढीत आम्ही पुढें गेलों, असं मला अगदीं स्पष्ट-पणें आठवत आहे त्या रात्रीं जें जे कांहीं मी पाहिलं तें सार, बारीक सारीक तपशील सुद्धां, मी आत्तां हा असा माझ्या या एकांत कोठडींत दहा वर्षें काढल्यावर नीट आठवून आठवून लिहीत आहें.

" खालीं पसरलेल्या पेंढ्यावरच टाकलेल्या एका उशीवर मान ठेऊन सतरा अठराच्या उमरीचा एक मोठा गोड छोकरा पडला होता. आपले दांत घट्ट मिटून, उजवा हात छातीवर दाबून तारवटल्या सारखा वर सरळ कौलाकडे पहात तो उताणा पडला होता. खालीं गुडघे टेकून त्याला झालेली जखम मी शोधीत होतों. कारण कांहीं तरी तीक्ष्ण शस्त्राच्या खोल जखमेंतून झालेल्या रक्तस्रावामुळें तो परलोकाच्या मार्गाला लागलेला मला स्पष्ट दिसत होतें.

" डॉक्टर आहें मी बाळ,' मी म्हणालों 'मला पाहू दे ती नीट.'

" मला नाहीं जरूर वाटत, राहू द्या ती तशीच, " तो म्हणाला.

" पण मी हळूच त्याचा हात दूर करून त्या खालील ती जखम नीट पाहिली. तरवारीच पात आत घुसून ती जखम झाली होती. वीस बावीस तास तरी त्याला झाले असावेत आणि आतां प्रयत्नांची पराकाष्ठा करूनहि त्याला वाचविण केवळ अशक्य होत त्याची जीवनसरिता कालसागराच्या उदरात झपाट्यानें रिती होत होती मी मागें वळून त्या मोठ्या भावाकडे पाहिलें. खालीं पडलेल्या आणि मरणाची वाट वेगानें चालत असलेल्या त्या गोड छोकऱ्याकडे, शिकारींत जखमी होऊन तडफडत पडलेल्या एखाद्या पांखराकडे किंवा एखाद्या भेकराकडे पहावें तशाच भावशून्य, निष्ठुर डोळ्यानीं पहात, तो उभा होता. मानव्याची छटा तिथें तिळमात्रहि दिसून येत नव्हती.

" कशी झाली ही जखम, मसिअर ? " मी विचारलें.

" एक पिसाट कुत्रं तें ! एक नांगऱ्या ! त्याच काय विचारतां. माझ्या बधूंच्या आंगावरच धांवला तो कुत्रा. माझ्या बधूंच्या तरवारीची आहे जखम ती — मोठा नशीबवान बेटा. "

" त्याच्या उत्तरांत माणुसकी, दया माया, पश्चात्ताप कांहीं कांहींच एक रातिभरहि दिसुत नव्हतीं. त्या मरणाऱ्या अभागी प्राण्याविषयीं त्याला कांहींच

वाटत नव्हत. असले अनेक जीव कीडा मुगीसारखे रोजच त्यांच्या पायांखालीं चिरडले जात होते. उलट हा तर मानानें मरत होता

" त्या छोकऱ्याचे डोळे आतां हळूहळू त्याच्याकडे वळले होते आणि त्याच बोलण सपल्यावर ते तसेच हळूहळू माझ्याकडे वळले

" बघा, डॉक्टर हा रक्ताचा अभिमान. पण आम्हां कुत्र्यांना सुद्धा इतका अभिमान नि ताठा कधीं कधीं दाखवता येतोच आमची मारपीट, नि पिळणूक करीत आपल्या अत्याचारानीं आमचे बळीही घेतात हे पण तरी थोडा फार अभिमान आमच्यांतूनहि एखादेवेळी वर उसळतोच तिला — तिला पाहिलीत तुम्ही डॉक्टर ? "

" त्या तिथेंसुद्धां तिच्या किंचाळ्या नि धडपड अस्पष्टपणें ऐकू येत होतीं त्याला उद्देशून ती आमच्या जवळच तिथें अमऱ्यासारखा तो बोलत होता

" होय पाहिली आहे वर, " मी म्हणालों

" माझी बहीण ती डॉक्टर आज किती तरी वर्षे या श्रीमंतांच्या जुलुम जबरदस्तीला आमच्या आया बहिणींचा बळी पडतो आहे पण आमच्यांतही कांहीं पाणीदार पोरी असतातच. माझी ताई आहे तशी ' आपल्या बरोबरीच्या एका तरुणाबरोबर ती वचनबद्ध झाली होती. आम्ही सर्वच या गृहस्थाचे खडकरी आहोंत तो दुसरा याचाच भाऊ. या असल्या अवलादीचा अगदीं गाळीव नमुना आहे तो "

"आगांतील सारी शक्ती एकवटून तो मोठ्या कष्टानें बोलत होता, पण त्याचा तो चिमुकला अतरात्मा मात्र कांहीं विलक्षण आत्मसामर्थ्यानें बोलत होता

" कांहीं विलक्षण पिळणूक या लोकांनी चालवली आहे आमची. माणसांत तर आमची गणनाच नाहीं, पण त्यांच्या दारचे ते मुके प्राणी सुद्धा सुखी आहेत आमच्यापेक्षा. डोक्यावर जबरदस्त करांचा ओझी, बिगर मेहेनतान्याची वेठीचीं मरमर काम, आमच्या शेतांच्या जीवावर–आमच्या निढळाच्या घामा-वर फुलवलेल्या मोत्याची भरघोस कणस, म्हणजे यांच्या राखीव पाळीव पाख-रांची जशी हक्काची. पण आम्ही मात्र एकहि पाखरू नाहीं ह घरात पाळायचं. कारण यांच्या तोंडचा घास तुटतो ना त्यान ? आणि आमच्या घरांत तर इतक दैन्य नि दुर्भिक्ष याना फैलावलेल कीं, कधीं सठीसहामाशी कांहीं चागल चुगल खायला मिळाल तर तें सुद्धां अगदीं चोरून मारून, दार बद करून खायच

आम्ही, आणि जर का आम्हाला कोणी तसं पाहिलं तर आमच्या तोंडचा घास हिसकला गेलाच अशी आमची रोज नाडणूक, गांजणूक पिळणूक या लोकांनी चालवलेली आहे एखादं नवीन बालक या आमच्या घरांत जन्माला यायचं म्हटलं तर आमच्या पोटांत धोंडच उभी राही माझे बाबा तर म्हणत की, परमेश्वरानं आमच्यावर कृपा करावी आणि आमच्या सर्व आया बहिणी वांझ होऊन आमची ही दुर्दैवी जातच जगांतून कायमची नाहीशी करून टाकावी ! —"

'कितीतरी दिवस या दुर्दैवी पिळून काढलेल्या लोकांच्या मनांतील दाबून ठेवलेला तीव्र असंतोष त्या वेळी जसा कांही त्या मरणाच्या दारीं पडलेल्या छोकऱ्याच्या मुखावाटे आता बाहेर पडत होता त्याच्या पोटातून त्वेषाचे जसे कढावर कढ वर उसळून त्या क्षीण देहातून आता आमच्यासमोर असे बाहेर येत होते स्तब्ध उभा राहून मी ते त्याचे उद्गार ऐकत होतो

"—हें इतकं होत तरीसुद्धा माझी ताई विवाहबद्ध झाली प्रकृतीनें कांहींसा अशक्त होता तिचा नवरा पण आपल्या प्रेमाच्या परिचर्येनें आपण त्याला आपल्या या दरिद्री घुराड्यांत — हे लोक नेहमीं म्हणतात त्या या आमच्या उकीरड्यांत, सुखी करूं अशी तिला वेडी आशा होती पण लग्नानतर थोडेच दिवसांनीं याच्या त्या भावाची बदफैली नजर तिच्यावर गेली आणि त्यानें तिला आपल्या दिमतीस पाठविण्याचा तिच्या नवऱ्याला हुकूम केला कारण नवरा असला म्हणून काय झालं ' पातिव्रत्याची थोरवी काय ती याच्या बायकांजवळ, आणि आमची अई बहीण म्हणजे केवळ एक गांडरू ' पण माझी बहीण अशा कच्चा दिलाची नव्हती त्यांनेंच ठोकरली तिनें त्याची मागणी. आणि मग या पठ्ठ्यांनीं काय केलं ? — '

"त्यानं आपले डोळे आतां त्या दोघां भावांवर ताठरपणें लावले. त्या दोघाचोहि तोंड जशी कांहीं आपल्या कृत्याचा कबुलीजबाब देत होतीं. मला आत्ता या एकांत कोठडीतसुद्धा त्या सर्वांचे चेहरे माझ्यासमोर उभे असल्यासारखे दिसत आहेत — त्याच्या चेहऱ्यांवर माणुसकीशून्य तिरस्कार नि बेपर्वाई आणि त्याच्या चेहऱ्यावर, पायदळीं तुडवल्या गेलेल्या अभिमानाचा जळता सूड '

"— तुम्हांला माहीतच आहे डॉक्टर कीं या लक्ष्मीपुत्रांना आम्हां नागऱ्यांना जनावरासारख नांगरालाहि जुपता येतें त्यांनी माझ्या मेहुण्याला तसा नांग-

राला जुपला. दिवसभर ती नांगर ओढ नि मग सारी रात्र थंडीपावसांत कुड-कुडत यांची मिजासखोर झोंप मोडू नये म्हणून बेटूक वगैरेनां शांत ठेवण्याची कामगिरी दिवस उगवला कीं परत मानेवर जू पण तरीहि तो दाद देईना, यांच्या नीच इच्छेला मान तुकवीना ' आणि मग एक दिवस या सर्व छाती फुटणाऱ्या श्रमांनीं हतबल होऊन, नांगर खुंटापासून सुटून चार शिळेपाके तुकडे तो घाटीखालीं कसेबसे लोटीत असता, घड्याळाच्या प्रत्येक ठोक्याला उचकी देत बाराच्या ठोक्याला त्यानें तिच्या बाहुपाशांत प्राण सोडला. — "

" आपल्या निष्ठुर जुलमाची करुण कहाणी सांगण्याची तीव्र इच्छाच फक्त त्याला अजून जगवीत होती डोळ्यासमोर दाटत असलेली मृत्यूची काळोखी, विलक्षण सामर्थ्यानें तो मागें परतवीत होता आणि आपला उजवा हात तित-क्याच जोरानें त्यानें आपल्या जखमेवर घट्ट दाबून धरला होता.

" — तिचा पति तिला तसा सोडून गेल्यानंतर, आपल्या भावाच्या संमतीनें, या ब्राह्मणमार्ने तिला आपली भोगदासी करण्यासाठीं जबरदस्तीनें ओढून नेलें. स्वच्छंदी फुलपांखराची चार क्षणांची नुमती माज ' तिनें काय अकांड तांडव केल असेल त्यावेळीं नि त्याला ती काय काय बोलली असेल, याची तुम्हाला कल्पना येईलच तिला अशी घराबाहेर काढल्याची वातमी माझ्या बाबांच्या कानांवर मी घातली मात्र नि त्या दुबळ्या म्हाताऱ्याची छाती दुभंग झाली, पण त्यांच्या अंतःकरणात उमळलेले ते अनंत शब्द, आतां मुकेच राहिले . माझ्या धाकट्या बहिणीला घेऊन मग मी तिथून निसटलों आणि याचे हात पोंचणार नाहींत अशा ठिकाणीं तिला ठेऊन मी परत फिरलों. याचा माग काढीत काढीत मी कालच इथें आलों, आणि असा रात्रीं — एक भिकारडं कुत्रंच, पण आतां सूडाच्या भावनेनं दात चांगले शिवशिवत असलेलं — हातांत तरवार घेऊन त्या खिडकीवाटे आंत शिरलों. — इथेंच आसपास आहे नाहीं ती खिडकी ? कुठे बर ? —"

"त्याच्या डोळ्यापुढील काळोख दाटत चालला होता आणि सभोंवारच जग झपाट्यानं आकुंचित होत होत मी आपल्या सभोंवतीं पाहिलं, तो पेंढा पायदळीं तुडवल्यासारखा, विस्कटल्यासारखा दिसत होता.

" — तिनें माझी चाहूल ऐकली नि ती धांवत आंत आली. त्याचा मुडदा खालीं लोळल्याशिवाय माझ्याजवळ येऊ नको म्हणून मी तिला सांगितलं. तिच्या

पाठोपाठ ते राजेश्रीहि आंत आले आणि कांहीं पैसे त्यानीं माझ्यापुढें फेंकले. आणि मग माझ्या आंगावर चाबकाचा फटकारा उडवला. मी त्याच्यावर हल्ला चढवला, आपला जीव बचावण्यासाठीं त्यानें माझ्यासारख्या कुत्र्याच्या रक्तांत आपली तरवार बुडवली —"

"माझ्या जरा पलीकडेच दोन तरवारी पडल्या होत्या; एक जुनीपुराणी नि गजकी आणि दुसरी लखलखीत अगदी नवी कोरी पोलादी चारदोन क्षणापूर्वीच माझी दृष्टी त्याच्याकडे गेली होती

"आतां जरा वर उचला मला डॉक्टर, अगा वर उचला आहे कुठें तो?"

"इथें नाहींत ते," त्याला वर उचलीत मी म्हणालों त्या दुसऱ्या भावा-विषयीं बहुधा तो मला विचारीत होता

"अस्स ! छाती नाहीं होत वाटत माझ्याकडे बघायची ? आणि ते — दुसरे कुठे आहेत ? माझ तोंड जरा तिकडे करा पाहू"

"त्याच्या मानेखालीं गुडगा देऊन मी त्याच तोंड फिरवल पण त्याच्या आगात कुठून बळ सचरल कोण जाणे, तो नीट ताठ बसला राहिला. मलाहि मग जरा उठुन त्याला नीट धराव लागल.

"मार्क्विस," आपले डोळे ताठ उघडून त्याच्याकडे पहात नि आपला उजवा हात वर करीत तो म्हणाला, "जग प्रलयाच्या त्या अखेरच्या दिवशीं — साऱ्या मानवजातीच्या त्या न्यायनिवाड्याच्या दिवशीं, तुम्हाला नि तुमच्या पुढल्या पिढीला त्या सर्वन्यायी परमेश्वरी सिंहासनासमोर — या अपकृत्याचा जाब मी आपल्याला विचारीन हें लक्षांत ठेवा ! माझ्या या निरपराध रक्ताच्या क्रासची ही खूण, निशाणी म्हणून मी तुमच्यावर करतों तुम्हाला आणि तुमच्या त्या बदअवलाद बच्चूंना या कृत्याचा जाब द्यावाच लागेल, माझ्या या रक्ताचीच शपथ !"

"आपल्या जखमेंत हात बुडवून त्यानें दोनदां आपल्या बोटानें हवेंत क्रॉसची खूण केली. एक क्षणभर तसाच तो आपल ते रक्ताळलेल बोट उच धरून बसला होता आणि मग तो हात एकदम खालीं पडला आणि त्याचा देहहि त्याचबरोबर खालीं गळला नि त्याच तें निष्प्राण कलेवर मी खालीं ठेवल.

* * *

" मी त्या तरुण स्त्रीच्या बिछान्याजवळ परत आलों, त्या वेळी तिच्या त्या किंकाळया नि तें ओरडणं त्याच क्रमानं अजून सारखं चालूच होतं तिच्या अखेरच्या निद्रेबरोबरच त्याचाहि शेवट होईल हें मला आतां स्पष्टपणें दिसत होतं.

"बाहेर रात्र वाढत चालली होती औषधाचा घोट तिला परत एकदां पाजून मी तसाच तिथें बसून राहिलों. तिच्या किंचाळयातील धार अजून तिळमात्राहि कमी झाली नव्हती कीं त्या बडबडण्याच्या नियमित पुनरावृत्तींत एक क्षणाचाहि फरक पडत नव्हता. तिचं तें, ' माझे पति, माझे बाबा, नि माझा भाऊ राया ' एक–दोन–तीन-चार — बारा — वस्स खलास " असं सारखं चालूच होतं

' जवळ जवळ सव्वीस तास असा हा कार्यक्रम मी तिथें गेल्यापासून सारखा चालू होता. मी दोनतीन वेळा घरीं जाऊन परत आलों होतों, आणि आतां परत तिच्या बिछान्याजवळ मी बसलों असतां तिचं बोलणं थोडं अडखळत अडखळत असं होऊं लागलं त्याचा फायदा घेऊन तिला अधिक शांत करण्याचा प्रयत्न मी सुरु केला, आणि आस्ते आस्ते तिच्यावर गुंगी चढू लागून जरा वेळानें ती अगदीं मेल्यासारखी शांत पडून राहिली. जसा कांहीं आतांपर्यंत सुसाटपणें घोंघावत असणारा भीषण तुफानी वाराच शांत झाला होता तिचे हात मी आतां सोडले आणि घरांतील बाईच्या मदतीनें तिचा पोशाकहि जरा नीट नेटका केला आणि त्यावेळीं तिला कांहीं दिवस गेल्याचीं चिन्हें माझ्या दृष्टीस पडलीं, नि तिच्या जीविताविषयींची माझी उरली सुरली आशाहि मग पार मावळली

" गेला का प्राण तिचा ? " मार्क्विसनें आंत येत विचारलें.

" अजून नाहीं, पण थोड्या क्षणाचीच सोबतीण आहे ती "

" काय चिवट असतात लेकाचे हे लोक ! " तिच्याकडे चौकसपणें पहात तो म्हणाला

' दुःख नि निराशा यांत कांहीं विलक्षण सामर्थ्य असतं," मी उत्तर दिलें

" माझे ते शब्द आधीं त्यानें हसण्यावारी नेले, पण मग कपाळाला मत्राशें आंठ्या घातल्या. आमच्या जवळील त्या मोलकरणीला त्यानें खालीं रवाना केलें आणि जवळची एक खुर्ची पायानेंच माझ्याकडे ढकलून नि तींत खालीं बसून खालच्या आवाजांत तो म्हणाला.

— " डॉक्टर, माझे ते बंधु या जनावरांच्यामुळें असे अडकल्यामुळें तुमचं नांव मीच त्यांना सुचवलं तुमचा लौकिक चांगला आहे, तुम्ही हितकरूहि आहात नि म्हणूनच तुमचं हितानहित तुम्हाला समजावं इथे तुम्ही पाहिलेल्या या गोष्टी डोळ्यांनीं नसत्या बघायच्या असतात, आणि त्याचा उच्चार कुठं करायचा नसतो "

" मी आपलं लक्ष माझ्या समोरील त्या स्त्रीच्या श्वासोच्छ्वासाकडे लावलं नि उत्तर कांहींच दिलं नाहीं।

" आपण लक्ष द्यालं का डॉक्टर, मी काय म्हणतों आहे तिकडे ? "

" आमच्या धंद्यात, रोग्याच्या तोंडचे शब्द हे नेहमीच गुपित म्हणून राखले जातात, " मी सावधगिरीनें म्हणालों कारण मी पाहिलेल्या नि ऐकलेल्या साऱ्या गोष्टींनीं माझं मन अस्वस्थ झालं होतं.

" त्या स्त्रीचा श्वास आता अतिशय क्षीणपणें चालला होता म्हणून तिची नाडी नि छाती मी नीट पाहिली तिच्या देहांत आतां फक्त धुगधुगीच काय ती दिसत होती, अधिक कांही नाहीं आपल्या जागेवर बसत मी बाजूला पाहिलें ते दोघेहि भाऊ माझ्याकडे अगदीं एक चित्तानें पहात असलेले दिसले.

* * *

"हें सारं लिहिणं मला अतिशय कठीण होत आहे, यडीहि मी म्हणते आहे आणि जर असा हा लिहिता लिहिता पकडला गेलों तर खालीं खोल खोल तळघरांतील मिट्ट काळोखी अशा त्या खोलींत ढोचला जाण्याची भीति क्षणोक्षणीं डोळ्यांसमोर उभी राहून, माझी ही कहाणी संक्षिप्तपणें सांगणं मला भाग पाडीत आहे पण माझ्या डोक्यांत मात्र कांहीच गोंधळ नाहीं, सर्व स्मृति चांगल्या ताज्या — अगदीं स्वच्छ आहेत, इतक्या कीं त्यावेळचे बारीक सारीक सगळे तपशील नि आमच्या बोलण्यातील अक्षर नि अक्षर मला अगदीं बरोबर आठवत आहेत

" जवळ जवळ एक आठवडा गेला असा अगदीं अखेरी अखेरीस तिच्या ओठाजवळ कान नेऊन कांहीं अक्षरं मला जेमतेम ऐकता आलीं. आपण कुठे आहों आणि मी कोण म्हणून मला तिनें विचारलें मी तिला तें सांगून तिचं नांवगांव तिला विचारलं, पण आपल्या भावासारखंच त्या बाबतांत तिनें मौन स्वीकारलं आणि आपली मान क्षीणपणें हलवली

"ती आता एक दिवसाचीच सोबतीण आहे अस मी त्यांना सांगेपर्यंत ते कोणी तरी आळीपाळीनें तिच्या डोक्यामागील पडद्याआड बसून रहात होते. त्यामुळें तिच्या शुद्धीवर येण्याचाहि मला कांहीं फायदा घेतां येत नव्हता पण एकदां तें कळल्यानंतर मलाहि तिच्याच सारखा मृतप्राय समजून त्यांनीं आमच्याकडे दुर्लक्ष करण्यास सुरुवात केली.

" एका सामान्य कुत्र्याच्या रक्तान आपल शस्त्र विटाळल्याची त्या दोघांहि घमडानदनांना मोठी खत वाटत होती. पण त्याहिपेक्षां त्या चमत्कारिक घटनेमुळें त्यांच नाव बद्द होण्याचा सभव त्यांना अधिक तापदायक वाटत होता. जेव्हां जेव्हां माझी नजर त्या धाकट्या भावाकडे जाई तेव्हां तेव्हा मला कळलेल्या गोष्टीमुळें माझ्यावर तो अगदीं धुमसत असल्यासारखा मला वाटे. माझ्याशी वागतांना तो मोठ्यापेक्षा जरी अधिक सौजन्य दाखवी तरी तें वरवरचच होत याविषयीं मला तर शकाच नव्हती आणि मोठ्यालाहि माझी तितकीच अडगळ वाटत होती हेंहि मला स्पष्ट दिसत होत.

"त्या दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास, मी तिला प्रथम पाहिली त्याच नेमक्या घटकेला, तिचा प्राण तिची कुडी सोडून गेला मी एकटाच तिच्याजवळ बसलों होतों. तिच निष्प्राण मस्तक हळूच एका बाजुला कलल नि तिच्या साऱ्या यातनांचा शेवट झाला ..

" ते दोघेहि भाऊ जामानिमा करून, बुटांवर चाबकाची दांडी आपटीत अधीरपणे फेऱ्या घालीत खालीं थाबले होते मी खालीं जातांच मोठ्यानें प्रश्न केला, ' झाल, गेला प्राण एकदांचा ? '

" होय."

" तुझ अभिनदन करतों मी, भाऊ," आपल्या भावाकडे वळून तो म्हणाला.

" याच्या आधींच त्यानीं मला पैसे देऊ केले होते पण त्यांचा स्वीकार मी अजून केला नव्हता. त्यानें आतां सोन्याच्या मोहोरांनीं भरलेली एक थैली माझ्या हातांत दिली, पण ती घेऊन मी तशीच ती खाली टेवलावर ठेवली. त्या गोष्टीचा नीट विचार करून त्यांच्या जवळून कांहीच न स्वीकारण्याच मी ठरविल होत.

" माफ करा मला, पण या परिस्थितींत नाही, " मी म्हणालों

" त्या दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें, आम्ही एकमेकांना मान लववून अभिवादन केले आणि कोणींच एक अक्षरहि न बोलतां आम्ही बाहेर पडलों.

* * *

" मी आतां अगदीं गळून गेलों आहे — पार, पार दमून गेलों आहें माझ्या या दुःखानें नि हालअपेष्टांनीं पार थकून गेलों आहें मी माझ्या या क्षीण हातानी काय लिहिल आहे, हें माझ मलाच वाचतां येत नाहीं.

' दुसरे दिवशीं सकाळीं, तीच मोहोरांची पिशवी एका लहान खोक्यांत घालून नि वर माझ नांव लिहून माझ्या दारांत ठेवलेली मला आढळली काय करायच याचा मी प्रथमपासूनच नीट काळजीपूर्वक विचार केला होता. म्हणून त्या दिवशीं त्या गेल्या आठ दिवसात घडलेल्या सर्व घटनांची तपशीलवार हकीकत प्रधानमंत्र्यांच्या कानांवर घालण्याच मी ठरवल दरबारी वशीला ही काय चीज असते याची मला कल्पना होती, या उमरावांचे सुलतानी अधिकार नि त्यांना असलेली सर्वव्यापी सूटहि मला अपरिचित नव्हती, माझ म्हणण कोणींहि मनावर घेणार नाहीं याविषयींहि मला खात्री होती, आणि तरीहि केवळ मनाच्या समाधानासाठीं मी त करणार होतों घडलेल्या सर्व गोष्टी मी आत्तांपर्यंत पूर्णपणें गुप्त राखल्या होत्या स्वत च्या जिवलग पत्नीजवळहि एका अवाक्षराचा उच्चार मी केला नव्हता. याहि गोष्टीचा उल्लेख मी आपल्या पत्रात केला माझ्या स्वत च्या जीवाला धोका असा मला मुळीच वाटत नव्हता पण हें गुपीत जर बाहेर फुटल तर इतरांच्या मागें मात्र नसता भोग लागेल अस मला वाटे.

"तो सर्व दिवस मी मोकळा नव्हतों, आणि त्या रात्रींहि माझ लेखन संपल नाहीं, म्हणून खूप पहांटे उठून माझ पत्रलेखन मी संपवल. वर्षाचा शेवटचा दिवस होता तो तें पुर झालेल पत्र अस माझ्या समोरच पडल होत, तोंच कुणीतरी एक कुलस्त्री मला भेटण्यासाठीं खाली आली आहे, असा मला निरोप आला.

* : *

"हातांत घेतलेल माझ हें काम मला आतां दर दिवशीं जास्त जास्तच बिकट होत असल्यासारख वाटत आहे. थंडी तर खूप पडली आहे, सभोंवार काळोखहि वाढला आहे, सारी गात्र कशीं सुन्द बनत आहेत आणि मनांतील निराशा झपाट्यानें माझा ग्रास करू पहात आहे —

"माझ्यासमोर उभी असलेली ती खानदानी स्त्री तरुण, सुंदर नि मोठी डौलदार, पण अगदीं पार थकल्यासारखीच दिसत होती अतिशय अस्वस्थ नि कावरीबावरी अशीच माझ्यासमोर ती उभी होती मार्किस सेंट एव्हर-मॉडची पत्नी म्हणून तिनें आपली ओळख मला करून दिली त्या मोठ्या भावाला उद्देशून त्या छोकऱ्यानें केलेला मार्किस हा उल्लेख, आणि त्य तरुण स्त्रीच्या तोंडाजवळील शालीवरील ई हें अक्षर मला आठवलें आणि या बाईचे ते यजमान आपल्याला पूर्ण परिचित आहेत, हें माझ्या तेव्हांच लक्षात आलें

" माझी स्मृती चांगली शाबूत आहे, पण आमचं सारं संभाषण मात्र मी आतां लिहीत नाहीं कारण माझी कुणाला तरी शंका आली आहे नि मी केव्हां असा हा लिहितांना सापडेन तें काही सांगता येत नाहीं. त्या भीषण घटनेचा कांहींतरी भाग त्या बाईना बहुधा कळला होता कांहीं त्यांनीं तर्कानें ताडला होता आणि मला सर्व माहीत आहे असं कळल्यावरून त्या माझ्याकडे त्या दिवशीं आल्या होत्या त्या दुर्दैवी जीवाबद्दल वाटत असलेली सहानुभूति गुप्त-पणें व्यक्त करण्यासाठीं ती तशी माझ्याकडे आली होती एक स्त्रीहृदय दुसऱ्या स्त्रीसाठीं हळहळत होतं तिच्या पतिगृहाकडून घडत असलेल्या असंख्य पात-कासाठीं होणारा परमेश्वरी कोप थोडा तरी शांत करण्याच्या तीव्र इच्छेनें ती माझ्याकडे आली होती त्या मृत स्त्रीची एक बहीण कुठेंतरी असल्याचं तिला माहीत होतं तिच्यासाठीं कांहीतरी करून आपल्या पतीच्या पातकाचं अंशतं तरी परिमार्जन करण्याचा तिचा पवित्र हेतु तिनें माझ्या कानांवर घातला पण तशी एक बहीण कुठें तरी आहे या व्यतिरिक्त मला तरी काय ठाऊक होतें. माझ्याकडे मोठ्या आशेनें नि विश्वासानें ती आली होती पण माझा तरी काय इलाज होता आज या घटकेलासुद्धां त्या छोट्या बहिणीचा ठावठिकाण, नाव गांव मला कांहींच माहीत नाहीं '

* * *

" हे कागद माझ्या हातांतून आता गळत आहेत. एक तुकडा तर कालच माझ्या जवळून नेला गेला होता नि मला ताकीदहि मिळाली होती. आज मला माझं हें लेखन संपवलंच पाहिजे

" मोठ्या विशाल अंतःकरणाची नि हळुवार मनाची अशी ती दिसत होती. तिचं वैवाहिक जीवन सुखी नव्हतं. कसं असेल ! तो धाकटा भाऊ तिचा अति-

शय राग करी नि त्याच तिच कधींच कशांत जमल नाही तिला त्याची नि आपल्या नवऱ्याची सुद्धां अतिशय भीति वाटे मी तिला निरोप देत खालीं दाराजवळ आलों तेव्हां एक दोन तीन वर्षांचा मोठा गोड छोकरा तिच्या गाडींत बसलेला मला दिसला

"यान्यासाठीं वर डॉक्टर," डोळ्यांत पाणी येऊन त्याच्याकडे बोट करून ती म्हणाली, "काय वारीक सारीक मला करतां येईल तें मी करीन. नाहीं तर त्या इस्टेटीपासून त्याला कांहीं सुख नाही लागायच मला तर अशी भीति वाटते आहे का, मी जर अस काहीतरीहि बारीकसारीक त्यासाठीं केल नाही, तर एक दिवस त्याला त्याचा जाव गावा लागेल ' माझ — खास माझ, अस या जगांत थोडच आहे कांही थोडे फार दागदागिने आहेत माझ्याजवळ, यान्या स्वाधीन करीन मी ते सारे मरताना ते सर्व विकून टाकून — माझ्या अनतर नि हळव्या हृदयाच प्रतीक म्हणून ती सर्व रक्कम त्यानं माझी अखेरची इच्छा अस समजून, त्या गरीब बहिणीचा कांहीं पत्ता लागला तर तिच्या हवाली करायची "

' तिनें मोठ्या प्रेमानें आपल्या त्या छोकऱ्याचे चुंबन घेतल नि त्याला कुरवाळीत ती म्हणाली, ' तुझ्यासाठीं वर हें बाळ करशीलना माझी ही एवढी इच्छा पुरी, चार्लस ? " त्या छोकऱ्यानं मोठ्या धीटपणें ' होय ' असें उत्तर दिलें. तिच्या हातानें मी चुंबन घेतलें आणि तीहि त्या आपल्या छोकऱ्याला माडीवर घेऊन करवाळीत कुरवाळीत निघून नाहीशी झाली आणि त्यानतर परत कधींच ती माझ्या दृष्टीस पडली नाही

"माझ लिहून पुरं झालेल ते पत्र मग दुसऱ्या कोणाच्या हातात न सोंपवितां मी तें स्वत च सीलबद्द करून नेऊन दिल त्याच रात्रीं — त्या वर्षाच्या अखेरच्या रात्रीं, असा नवाच्या सुमारास आपादमस्तक काळा पोशाक केलेला असा एक माणूस माझ्या दाराजवळ आला, आणि त्यानें मला भेटण्याची इच्छा दर्शविल्यामुळें माझा नोकर उफार्न मला सांगण्यासाठीं वर माडीवर आला. वर मी व माझी लाडकी इग्रज पत्नी अशीं दोघच त्या वेळीं विश्रब्धपणे गप्पागोष्टी करीत बसलों होतों अरेरे — गरीब बिचारी ' आपल्यापुढे कसल भयकर ताट वाढून ठेवल आहे याची तेव्हां त्या बिचारीला कल्पना तरी असेल काय ? कशी असणार पण, कारण मला तरी कुठे होती ती ? — त्याच्या पाठोपाठच तो माणूस गुपचूप आंत आला.

" न्यू सेट ऑनोरमध्यें अगदीं तांतडीनें जायला हव आहे, डॉक्टर — गाडी खडी आहे खालीं; आपली मुळींच खोटी होणार नाहीं," तो माणूस म्हणाला.

" — पण कुठें नेल मला त्या गाडीन ? इथें — माझ्या या थडग्यांत ! ... मी दाराबाहेर पडतांच मागून कोणीतरी माझ्या तोंडावर स्कार्फ घट्ट दाबून बांधून टाकला नि माझे हातहि तसेच मागें जखडले गेले. त्या समोरील अंधाऱ्या कोपऱ्याकडून ते दोघेहि भाऊ पुढे झाले आणि त्यांनी मला माझ पत्र दाखवलं आणि मग त्यांनी त्याची जाळून राख केली हा वेळपर्यंत तोंडांतून एक अक्षरहि त्यांनीं काढल नाहीं गाडी इथें बॅस्टीलजवळ आली, आणि या जिवत थडग्यांत मी कायमचा फेंकला गेलों ...

"या साऱ्या वर्षांत त्यांच्या कोणाच्या कठोर हृदयात कांहीं थोडीतरी दया माया परमेश्वरानें उत्पन्न केली असती, आणि माझ्या लाडकीची कांही तरी वेडी वांकडी बातमी जरी माझ्या कानांवर आली असती, तरीसुद्धां परमेश्वरानें त्यांच्याकडे पाठ फिरवली आहे अस मला वाटल नसत, आणि त्याच्या दयेची त्यांना थोडीतरी आशा होती पण आता मात्र कणत्याच दयेला ते पात्र नाहींत. ती रक्त क्रॉसची खूण त्याना भाजून काढल्याशिवाय राहणार नाहीं. माझे — या अलेक्झँडर मॅनेटचे — बॅस्टीलच्या या जीवत नरकांत कुजत पडलेल्या या निरपराध जीवाचे शाप, त्या नर पिशाचांना नि त्यांच्या पुत्रपौत्रांना बाधल्या शिवाय कधींहि राहणार नाहींत ' गर्वाचा नियता तो काल, या पापांचा बदला जरूर घेईलच घेईल, असा मला दृढविश्वास आहे ' "

क्रोधाचा कांहीं विलक्षण अकाळविकाळ असा गदारोळ त्या प्रेक्षकसमूहात, आतां तो कागद वाचून संपल्यावर उसळला होता रक्ताची एकच एक तहान त्या सर्वांना लागून राहिलेली दिसत होती त्या रक्तपिपासेच्या एकच इच्छेनें तो सतप्त लोकसमुदाय किंचाळत होता. जगातील होत नव्हत तेवढ क्रौर्य असं कांहीं आतां त्या ठिकाणीं एकवटून भयानकपणें उसळत उफाळत होत क्रोधाच्या त्या भैरव अवतारासमोर कोणाचाहि मस्तक सुरक्षित राहण आतां शक्य दिसत नव्हतं. इतक्या प्रचड लोकक्षोभाला पुरून उरण्या इतकी पुण्याई कोणाऱ्याच पदरीं असण अशक्य होत !

प्रत्यक्ष स्वतःच्या पत्नीच्या पित्यानें आज त्या आपल्या जांवयावर हा भीषण हल्ला चढविला होता. बस्स; मग अधीक काय तर ? दयेची आशा आतां कुणी नि

कशासाठीं करायची चार्लसच्या अभागी मस्तकावर झालेला हा अखेरचाच घाव होता. या घावापुढे त्याच मस्तक कालत्रयींहि सुरक्षित राहण शक्य नव्हतं. आणि याच भेसूर विजयानदांत सार कोर्ट आतां नाचत होत. स्वत च्या कर्तव्यनिष्ठेचे नि शहाणपणाचे मोजके बोल डॉक्टरांना ऐकविण्याचा हा सुदर मोका आतां न्यायाधीश साहेबांना आला होता. आपल्या कठोर कर्तव्यनिष्ठेची थोडीशी चुणक त्यानीं डॉक्टरनां आज प्रारभींच दाखवली होती. न्यायदेवतेचा तो भाविक भगत डॉक्टरांना आतां आपले बोल सुनवीत होता

"सिटिझन डॉक्टर ' आपण आज धन्य झाला आहात एका विषारी कुटुबाची पार पाळमुळ खणून आपण लोकराज्याची अलौकिक सेवा आज केली आहे. आपल्या या कर्तव्यनिष्ठेच लोकराज्याला आतिशय कौतुक वाटत आहे आपल्या स्वत च्या एकुलत्या एक कन्येच्या कपाळाचें कुकू पुसून आणि आपल्या लाडक्या नातीला पितृशून्य करून देशभक्तीच्या अथाग पवित्र आनदात आपण आज सानद डुबत आहांत ' धन्य ' धन्य ! सिटिझन डॉक्टर, आपण त्रिवार धन्य आहांत ! ' "

न्यायाधीश महाशयांच्या या धन्योद्गारानीं त्या पिसाट जनसमूहाच्या उत्साहाला नि आनदाला उधान भरती चढली. तो सर्व लोकसमुदाय त्यांच्या आसपास बेहोषपणें नाचत होता आणि मानवी सहानुभूतीचा तेथें पूर्णांशानें लोप झाला होता

"वजन आहे म्हणे गुप्प डॉक्टरांच, नाही का ? करा म्हणाव कीं आतां त्याचा उपयोग ! " अत्यानदानें कराल कालीच्या हातावर हात मारीत मॅडम डेफार्ज उद्गारली "वाचवा त्याला आता डॉक्टर, वांचवा की आपल्या जांवयाला ! "

ज्यूरीच्या प्रत्येक मतागणिक आनदाची एकच गर्जना उठत होती एकामागून एक एकच मत मोठ्यानें उच्चारल जात होत आणि लोकांची गर्जना तशीच वर उठत काहीं वेळ सारखी उसळत होती

ज्यूरीच ऐकमत्य झाल होत चार्लस जन्मानेंच नव्हे तर अत करणानेंसुद्धां जुलमी ठरला होता, लोकराज्याचा तो शत्रू ठरला होता, आणि लोकांच्या पिळवणुकीत आनद मानणारा हैवान म्हणून आतां जाहीर झाला होता ' चोवीस तासाच्या आंत शिरच्छेद ! ' न्याय देवतेनें जाहीर केलें होतें.

---

.... ११ ....

देहांताची शिक्षा झालेल्या त्या निरपराध राजबंद्याच्या दुर्दैवी स्त्रीवर तर आकाशची कुऱ्हाडच कोसळली होती त्या प्रचंड कठोर आघातामुळें संज्ञाशून्य होऊन कांहीं काळ ती अगदीं स्तब्ध बसली होती. आपण कुठें आहोत हेंहि तिला जसें मुळींच समजत नव्हतें. एकाद्या दगडी पुतळीसारखी एक अक्षरहि न बोलता ती स्तब्ध बसली होती पण तिचं अंतरंग मात्र तिला स्वकर्तव्याची जाणीव सारखं करून देत होतं आणि तिनेंहि मग विलक्षण आत्मसंयमानें आणि स्वतःच्या पतीचा आपणच असा धीर खचू न देतां त्यालाच उलट धीर दिला पाहिजे या जाणीवेनें, ती कुऱ्हाड मस्तकावर झेलीत, स्वतःला झटकन सांवरलें

ज्यूरी नि न्यायाधीशसुद्धा कोर्टांतील सारे लोक कसल्या तरी दैनंदिन मिरवणुकीत भाग घेण्यासाठीं घाईघाईनें बाहेर पडत कोर्टाचें आवार मोकळें होत होतें आणि बाहेर जाणाऱ्यांच्या पावलांचा आवाज थांबण्यापूर्वीच आपल्या जागेवरून उठून आपले हात अधीरपणें पसरून आपल्या पतीसमोर ल्यूसी उभी राहिली आणि आपल्या डोळ्यांनींच त्याला धीर देत मूकपणें ती कांहीं वेळ तशीच उभी होती

"एकदा तरी त्याला मला हृदयाशी धरता येईल ' येईल का त्याच्या छातीवर माझं मस्तक मला टेकतां ' एवढी नाहीं का तुम्हीं आमच्यावर कोणी दया करणार ? चार्लस, चार्लस — माझा चार्लस ' ' तिनें दीनवाणीनें विचारलें.

त्याला परत अटक करून नेणारे दोन नागरिक, जेलर आणि बारसाड एवढेच त्या कैद्याजवळ आतां उभे होते बाकी सर्व लोक रोजचा क्रूर तमाशा पाहण्यासाठीं बाहेर लोटले होते "त्या दोघां पतिपत्नींना एकदा शेवटचीं एकमेकांना भेटू द्या," म्हणून बारसाडनें इतरांना सूचना केली त्यानींहि आपली मूकसंमती त्याला दिली आणि तिला वर त्या कैद्याच्या कठड्याजवळ नेलें आणि तीं दोघहि पतिपत्नी एका अखेरच्या गाढालिंगनांत अत्यंत आवेगानें बद्ध झालीं.

" फेअरवेल, माझ्या प्राणा — आतां फेअरवेल ' देव तुझं भलं करील ल्यूसी. आतां आपली परत भेट त्या दीनानाथाच्याच पायाशीं ' "

" माझी नको काळजी करू चार्लस, माझ्यासाठीं आपल्याला असा नको उगाच त्रास करून घेऊस तो दयाघनच मला आता सामर्थ्य देईल. आपल्या बाळीला अखेरचा आशीर्वाद दे आता, चार्लस "

' तुच माझा निरोप तिला दे त्युसी, आणि म त्यासाठा तिच आता तूच चबन घ्यायच आहेस "

" चार्लस, चार्लस ' थांब थाब असर्वी एक क्षणभर तरी थाब ! " तिच्या-पासून दूर होत असलेल्या चार्लसला घट्ट धरून ती म्हणाली " फार दिवस नाही आपला वियोग होणार चार्लस मी जगायची नाहीं आता यापुढें फार दिवस — पण इथे आहे तोंपर्यंत आपल्या कर्तव्यांत मात्र मी मुळींच कसूर करणार नाहीं आणि मी उठून गेलें का, परमेश्वर कोणाच्या तरी पोटांत तिची माया खास उत्पन्न करील आणि माझ्यासारख्याच निर्वाह तो रक्षण करील !

डॉक्टर तिच्या मागोमाग पुढे आले होते आणि चार्लसनें जर त्याना हात धरून वर उठवले नसतें तर त्याच्यापुढें त्यानीं गुडघे टेकून त्याची क्षमा मागी-तली असती

" नाहीं, नाही ' तुमचा काय अपराध बाबा, तुम्ही का स्वत ला इतकी खत वाटून घेता ! तुम्ही आमच्यासाठीं सोसलेल्या मनस्तापाची आम्हाला आज पूर्ण कल्पना आली आहे माझ्या नांवाच गपात तुम्हाला कळल्यानतर, तुमच्या मनात कसल काहूर उमळल असेल याची मला कल्पना आहे आणि आपल्या या लाडक्या कन्येसाठीं, तुमच्या मनात क्रोध नि सूड भावना थैमान घालीत असता, त्याना तशाच दाबून ठेवण्यात तुम्हाला काय यातना झाल्या असतील, हें आम्हाला आता समजत आहे आम्हीच आपली क्षमा याचना करून स्वत.ला धन्य मानल पाहिजे तुमच्या त्या अलौकिक त्यागाच्या ऋणातून आम्ही कधीहि मुक्त होण शक्य नाही परमेश्वर तुमचा पाठीराखा आहे '

डॉक्टरांच्या मुखातून कसलाच उच्चार झाला नाही, अतिशय तीव्र आवेगानें त्यांनीं आपल्या मस्तकावर हात आपटून आपले केस तडातड उपटले नि एक अत्यत करुण किंकाळी फोडली

" अस न होण अपरिहार्य होत माझ्या देवाचे फांसेच असे कांहीं चम-त्कारीक पडले होते, आणि साऱ्या गोष्टी कशा पूर्व नियोजित अशाच आत्ता-पर्यंत घडत आल्या आहेत. माझ्या आईनें माझ्यावर सोंपविलेली जबाबदारी

पार पाडण्याचा विफल प्रयत्न मी करीत असतांच आपली व माझी दुर्दैवानें प्रथम भेट झाली. अशुभांतून शुभाची उत्पत्ती कशी होते नाहीं? मग आपल्या प्रथम भेटीच्या त्या दुर्दैवी घटनेतून गुरुदेवांची नि माझी भेट कशी व्हायची? पण तुमचा कांहीच दोष नाहीं [illegible] तुम्हां आपल्याला उगाच वाईट वाटूं देऊ नका, आणि मला [illegible] परमेश्वर तुम्हांला सुखी ठेवो.'

ते यमदूत त्या [illegible] धक्का [illegible] लागताच त्यानें त्यांच्या आंगाभोंवताली आपली मिठी सोडली आणि परमेश्वराला हात जोडून आळवीत कांही विलक्षण धैर्यानें त्यांच्या दिशेनें पहात ती निश्चयानें उभी होती. तिच्या मुखावर पसरलेल्या उज्ज्वल प्रकाशांत त्यांना [illegible] समाधान [illegible] प्रत्यक्षपणें दिसत होतें. पण दाराबाहेर तो दिसेनासा [illegible] ती मागें वळली नि तिनें आपलें मस्तक आपल्या पित्याच्या [illegible] असहाय्यपणें टेकलें. कांहीतरी बोलण्यासाठीं तिचे ओठ किंचित हालले पण [illegible] तिनें आणलेलं उसनं अवसान पार गळून [illegible] मूर्च्छित होऊन त्यांच्या पायाशी खालीं कोसळली.

इतका वेळ कोपऱ्यांत त्या [illegible] पर्यात [illegible] न करता उभा असलेला [illegible] कार्टन [illegible] पुढें झाला आणि त्यानें [illegible] तो लज्जाशून्य देह आपल्या बाहूंत कवळून वर उचलला. डॉक्टर [illegible] या व्यतिरिक्त कोठेंतरी [illegible] कोणाच्या [illegible] वर उचलतांना [illegible] हात थरथरत होता आणि त्याच्या मुखावर अभिमान [illegible] विराजमान झाली होती.

"गाडींत ठेऊं या नेऊन? मला तें ओझं नाहीं वाटायचं."

एकाद्या लहान [illegible] तिला घट्ट धरून तो बाहेर पडला नि मग मोठ्या हळुवारपणें त्यानें तिला आंतील बैठकीवर निजविलें. तिच्या वडिलांना आणि त्यांच्या वृद्ध [illegible] आंत प्रवेश करतांच तो वर चढून गाडीवाना जवळ जाऊन बसला आणि जरा वेळानें गाडी त्यांच्या राहत्या घराजवळ येऊन पोंचतांच त्यानें तिला तशीच परत फुलासारखी वर उचलून घरांतील कोचावर नेऊन हळूच निजविलें. बाकीची [illegible] नि मिस प्रॉस दीनवाण्या तिच्या त्या मूर्च्छित देहाजवळ अश्रु गाळीत निमूटपणें उभ्या होत्या.

"यांना सावध करण्याचे प्रयत्न करण्याचं कांहीं कारण नाहीं, मिस प्रॉस

आता आहे हीन स्थिती चागली आहे भाषी मूर्च्छा आहे ही, अधिक काहीं नाहीं " मिस मॉनेटकडे वळून तो हळूच म्हणाला

कार्टन, कार्टन ' तुम्ही तरी काहीं करा हो माझ्या आईसाठीं' त्याच्या मानेला दोन्ही विळखा घालीन रडत रडत छोटी ल्यूसी म्हणाली " माझ्या बाबांना पण वाचवा हो कार्टन तुम्ही ' तो पहा — तो पहा — माझी आई कशी पडली आहे ती ' हे असे स्वस्थ उभे राहून तुम्हांला पाहवत का हो हें कार्टन, आणि तुम्हांला तर ना किती किती आवडतेना हो कार्टन '"

त्याने खालीं वाकून मोठ्या प्रेमाने ते गुबगुबीत उमलते गुलाब आपल्या मुखाजवळ धरले आणि मग हळूच तिला दूर करून त्याने आपले डोळे तिच्या त्या मूर्छित मातेकडे स्थिरपणे लावले

' आता आपल्याला इकडून घेऊन निघावे अवेरन —

आपले ओठ अत्यंत आवेगाने पण अतिशय हळुवारपणे तिच्या मस्तकावर त्याने टेकले आणि तो दूर झाला त्याने ओठ काहीतरी अस्पष्टपणे पुटपुटत होते ' तुझ्या नि तुझ्या प्रेमाच्या माणसासाठी ' वाकड्या ल्यूसीच्या यानांतून तर तिच्या काना पडलेले ते शब्द, ते तिने गतजन्मीच्या कानीवर घातल्यानंतरहि, कधीच पडले गेले नाहींत

तिच्यापासून दूर होऊन बाहेरच्या खोलीत तो गेल्यानंतर आत येत असलेल्या डॉक्टरना तो म्हणाला—

" कालपर्यंत या लोकांवर तुमचे चांगले वजन होते डॉक्टर मॅनेट, तरी परत एकदा तुम्ही प्रयत्न करून पहावा असे वाटते मला कोर्टातील बहुतेक अधिकारी तुमच्या चांगले परिचयाचे आहेत, आणि तुमची आतापर्यंतची कामगिरी पण त्यांच्या डोळ्यापुढे आहे नाही ?"

' चार्लससंबंधीं कोठलीहि गोष्ट माझ्या जवळून आतापर्यंत गुप्त राखली गेली नव्हती त्याच्या सुरक्षिततेचं आश्वासनहि मला मिळाले होते. आणि तो सुटलाहि होता," मोठ्या कष्टाने एकेक शब्द सावकाश उच्चारीत डॉक्टरनी उत्तर दिले

" त्याचाच परत उपयोग करून पहा आपल्याजवळ वेळ फार उरला नाहीं, हें खरं आहे, पण प्रयत्न जरूर करा "

" करणार आहे, तेच करणार आहें मी. आतां एक क्षणाचीहि नाही मी विश्रांति घेणार '

" ठीक तर. आपल्या सारख्याच्या प्रयत्नाना यश आलेलं मी पाहिलं आहे. पण असल्या प्रसंगांत नाहीं कांहीं नियम सांगतां येत म्हणा !" खिन्नपणें थोडा हंसत तो म्हणाला. " पण प्रयत्न हा केलाच पाहिजे ! प्रयत्नावांचून आपलं हें जीवन विफल आहे, आणि प्रयत्न करण्यांतच त्याचा व्यय झाला पाहिजे. नाहीं तर काय, उपजले नि मेले !"

" हा आतां असाच तडक निघालोंच मी, शक्य तितक्या लोकांची मी भेट घेईन; कोणीच वगळणार नाहीं मी त्यातून आज. एक दोन चार पत्रहि पहातों लिहून, आणि — पण थांबा ! कसली तरी उत्सव मिरवणूक दिसते आहे निघालेली, म्हणजे आतां रात्रींशिवाय नाहीं कुणी गाठणार."

" असं खरं. पण कांहीं हरकत नाहीं ! बोलून चालून काडीचा आधारच आपण पहातों आहों, कांहीं दोन चार अधिक मिनिटांनीं बिघडत नाहीं, तुमची हालचाल मात्र मला कळायला हवी म्हणजे त्यावर कांहीं अवलंबून नाहीं मी ! पण — कधीं घेणार आहांत या भेटी आपण डॉक्टर ?"

" काळोख पडल्यानंतरच बहुधा, आतां एकदोन तासांतच."

" म्हणजे चार नंतर काळोख पडेल असं धरून त्यावर आणखी दोन तास सोडू आपण म्हणजे नवाच्या सुमारास मला मि. लॉरींकडे कांहींतरी निश्चित समजायला हरकत नाहीं, नाहीं ?"

" होय, कांहीं नाहीं."

" परमेश्वर तुम्हांला यश देवो !"

तो खोलीबाहेर पडत असतां लॉरी त्याच्या मागोमाग बाहेर आले नि त्याचें पाऊल रस्त्यांत पडत असतां त्यांनीं त्याच्या खांद्यावर हात ठेवला. तो मागें वळला.

" मला कांहीं आशा दिसत नाहीं मि. सिडने;" दु:खपूर्ण स्वरांत लॉरी हळूच म्हणाले.

" मलाहि नाहीं दिसत मि. लॉरी"

" त्या कुणा लोकांच्या मनांत जरी मदत करायचं असलं — भलतीच अपेक्षा करणं आहे म्हणा हें कारण चार्लसच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या जीवाची त्यांना काय तमा !— तरीहि आतां कोर्टांत तें प्रक्षुब्ध लोकमत आज असं

भीषण रीतीनें प्रकट झाल्यानतर, तस कांहीं करण्याची त्यांची छाती होईल, अस मला वाटत नाही."

"आणि मला सुद्धां. आजचा लोकमताचा तो एकमुखी आवाज म्हणजे कुऱ्हाडीचा घावच वाटला मला ! "

मि. लॉरीनीं दाराला धरलेल्या हातावर सुदपणें आपलें मस्तक टेकलें.

"असे दुःखी कष्टी नि निराश नका होऊ, मि लॉरी," त्यांचे सांत्वन करीत सिडने म्हणाला. "ल्यूसीला केवळ बर वाटाव, आपल्या नवऱ्याला असा नुसता वाऱ्यावर कुणींच कांहीं हातपाय न हालवतां सोडला अस कधींहि वाटूं नये, म्हणूनच डॉक्टरनां ही गोष्ट करण्यासाठीं मी उत्तेजन दिल. तेवढं तरी समाधानाच सूख तिला लाभू दे. बाकी होण जाण परमेश्वराधीन ! "

"खरं आहे, खरं आहे, अगदीं बरोबर आहे तुमच म्हणणं," आपले डोळे कोरडे करीत लॉरी म्हणाले "पण त्याची आशा आतां सुटली पूर्णपणेंच सुटली !"

"होय, तो तर आता जाणार, त्याची नाहीं आशा ! " सिडने उद्गारला. आणि त्यानें धिमेपणें खालीं पाऊल टाकलें.

.... १२ ..

मिडने खाली रस्त्यावर आला खरा, पण कुठे जायचं याचा त्याच्या मनाशीं अजून निश्चय झाला नव्हता "कदोन क्षण तो तसाच स्वत शी विचार करीत जरा थांबला ' नवाल्ला ज यच आहे नाहीं बकेन परत," आपल्याशींच तो पुटपुटत होता "मग व्यर्थंत भटकाव का बाहेर मोकळेपणीं ? कांहीं हरकत नाहीं मला वाटत माझ्यासारखा कोणीतरी या शहरांत आहे अस काहींना तरी नीट दिसल पाहिजे आवश्यक आहे मला वाटत ही खबरद री घेण किंबहुना आवश्यक पूर्वतयारीच आहे एका अर्थी तीं. पण नीट, चागल्या, सावधगिरीनें, सावधगिरीनें ' अशी घाई नाही उपय गाची. नीट विचार करू दे मला त्याचा. '

आपली दिशा बदलून जाता काळांख पडत असलेले एकदोन रस्ते त्यानें ओलांडले, आणि मनात आलेल्या त्या विचाराची नीट बारीशीनें छाननी करण्यास त्यानें सुरुवात केली थोडा वेळानें मनाचें समाधान आल्यासारखी त्यानें आपली मान एकदां हलवली, नि अखेरीस त्याच्या मनाचा ठाम निश्चयहि ठरला "हेच योग्य माझ्या चेहेऱ्या मोहऱ्याचा कोणीतरी दुसरा प्राणी याच शहरात आज आहे, हें कळलच पाहिजे या लोकांना बस, ठरलच ' आणि त्यानें आपलें पाऊल सेंट अँटॉईनकडे वळविलें

पॅरिसचा तो पुरा माहीतगार होता, आणि आपण सेंट अँटॉईनमधें दारू दुकानदार आहों असें डेफार्जने आपलें केलेलें वर्णन त्यानें कोर्टांत ऐकलें होतें त्यामुळें तें दुकान शोधून काढण त्याला मुळींच कठीण नव्हत त्या दुकानची जागा एकदां नीट लक्षात घेऊन वाटेतील एका उपहारगृहांत आपली पोटपूजा उरकून तो थोडा तसाच आडवा झाला; नि त्याला गाढ झोंप लागली. कितीतरी वर्षांनीं त्यानें आजच प्रथम दारूला मुळींच स्पर्श केला नव्हता. कालरात्रीं त्यानें लॉरीच्या शेगडीजवळ आपल्या हातांतील शेवटच ग्लास ओतून रिकाम केल्यापासून त्यानें ब्रँडीस स्पर्श केला नव्हता इतर कांहीं कमी उत्तेजक पेयांवरच त्यानें आपली तहान भागविली होती, आणि लॉरीच्या खोलींतील त्याच मद्यपान त्याच्या आयुष्यांतील अखेरच म्हणूनच त्यानें काल केल होत

त्यानें ताजा तवाना होऊन आपले डोळे उघडले तेव्हां सात वाजले होते. सेंट अँटॉईनच्या दिशेनें त्यानें आतां आपलें पाऊल उचललें. वाटेनें जातांना एका

दुकानांतील आरशाजवळ जरा उभें राहून आपल्या केंसांची नि गळया भोंवतालची कोट कॉलरची त्यानें थोडी साफसफी केली, आणि मग डेफार्जच्या दुकानचा तडक रस्ता धरून एक दोन मिनिटांतच त्यानें त्या दुकानांत प्रवेश केला.

दुकानांत गिऱ्हाइकाची नेहमींची वर्दळ आता दिसत नव्हती. फक्त एक जॅकस तीन मात्र तिथें आंत दिसत होता नेहमींप्रमाणें त्याच्या हातांपायांचा चाळा चालूच होता सिडनेनें कोर्टांत आज पाहिलेले हे ज्यूरीमन हातातील पेल्यातील दारूचा आस्वाद घेत डेफार्जे पतिपत्नींशीं गप्पा मारीत उभे होते कराल कालीची स्वारीहि आतां तिच्याचा एक सभासद या नात्यानें त्या सभाषणांत भाग घेत होती

दुकानांतील एका बैठकीवर आसन ठोकीत मोडक्या तोडक्या फ्रेंचमधें त्यानें वाईनची आर्डर दिली मॅडम डेफार्जनें त्याच्याकडे एक उडता दृष्टिक्षेप केला आणि मग परत एकदा त्याच्याकडे नीट दृष्टि टाकली परत एकवार त्याला नीट न्याहाळलें नि मग स्वतःच उठून त्याच्याजवळ जाऊन काय पाहिजे म्हणून त्याला विचारलें.

त्यानें परत एकदां तीच आर्डर दिली

' इंग्लिश ?'' आपल्या काळ्याभोर भुवया कुतूहलानें उचावून तिनें विचारलें.

आपल्या अर्धकच्या ज्ञानामुळें ती काय म्हणते आहे हें जणू काहीं आपल्याला नीटसें कळत नाहीं असा आविर्भाव करीत, तिच्याकडे पहात नि आपले उच्चार पूर्वीप्रमाणेच चुकीचे करीत तो म्हणाला " होय, मॅडम इंग्लिश आहे मी ' "

मॅडम डेफार्ज वाईन आणण्यासाठीं मागें काउंटरकडे वळली सिडनेनें जवळच पडलेलें एक वर्तमान पत्र उचललें आणि त्यातील एकेक अक्षर जसं कांहीं कष्टानें तो वाचीत असतां, '' अगदीं हुबेहूब एव्हरमाँड '' हे मॅडम डेफार्जचे शब्द त्यानें नीट ऐकले

डेफार्ज वाईनचा पेला घेऊन पुढें आला नि त्यानें त्याला अभिवादन केलें.

" काय म्हटलत ? "

" गुड ईव्हिनिंग "

" ओ ! गुड ईव्हिनिंग, सिटिझन आ ! सुंदर आहे ह वाईन. मी लोकराज्याच्या यश चिंतितों "

डेफार्ज परत मागें काउंटरकडे गेला आणि म्हणाला "आहे खरा कांहींसा."

" कांहींसा, मी म्हणतें अगदीं हुबेहूब !" मॅडम ताठरपणें उद्गारली

" तुमच्या डोळ्यासमोर सारखा नाचतो आहे तो जसा कांहीं, " तिला जरा खुलवीत जॅकस तीन म्हणाला.

" तर काय रे ! नि उद्यां त्याला नभा बघाला जशी कांही अर्धीर आली आहे ती अगदी !" कालीनें त्याला पुस्ती जोडली

आपल्यापुढील कागदावरील ओळींवरून बोटें फिरवीत सिडने जसा वाचनांत अगदीं गढून गेला होता तीं तिघही मागें काउंटरला टेंकून आपसांत हळूहळू कुजबुजत होतीं. सर्वेच एक दोन क्षण स्तब्ध राहून कांहीं वेळ मग त्या तिघांनींहि त्याच्याकडे निश्चलपणें टक लावली. त्याचें वाचन सर्वथा कुठेंहि न पाहतां चालू होतें. त्यांचही संभाषण मग परत चालू झाल.

" मॅडमच म्हणण खर आहे मला वाटत. काय म्हणून थांबायच ? " जॅकस तीन म्हणाला.

" खर आहे, पण कुठे तरी थांबल हें पाहिजेच ना ? मग कुठे, इतकाच आता प्रश्न. " डेफार्ज म्हणाला

" समूळ उच्छेदानतरच थाबायच आतां, " मॅडम म्हणाली

" सुदर, सुदर !" जॅकस तीन पाघळला, आणि कालीनें जोरसे टाळी पिटीत दांत विचकले

' समूळ उच्छेद हा सामान्यपणें ठीक आहे त्याबद्दल माझ कांहीं म्हणण नाही." सत्रस्तपणें डेफार्ज म्हणाला. " पण डॉक्टरनीं किती बर यातना सहन केल्या आहेत, तुम्ही पाहिलेच आहेत त्यांना आज, किती खचल्यासारखे दिसत होते बिचारे !"

" हो, पाहिले आहेत बर !" रागानें नि चिडून मॅडम उद्गारली " पाहिले आहेत त्यांना लोकराज्याचे खरे खरे स्नेही नाहीं दिसत मला ते. सांभाळा म्हणावं त्यांना !"

" आणि त्यांच्या त्या मुलीचीहि दशा पाहिली आहेत तुम्ही, " अनुनयाच्या स्वरांत डेफार्ज म्हणाला. " तिची ती दशा त्यांना कशी भाजून काढीत असेल अगदीं !"

" तिलाहि चांगली पाहिली आहे बरं मी !" मॅडमनें उत्तर दिलें. " हो,

अगदीं नीट पाहिली आहे म्हटल ' आजच नाहीं एकदां, दुसऱ्याहि पुष्कळवेळां चागली पाहिली आहे. कोटांत पाहिली आहे नि तिकडे रस्त्यांत तुरुगाकडे पहात असताहि नीट पाहिली आहे बर. मी नुसत बोट वर करायची खोटी–!"

इकडे सिडनेचे डोळे कागदावर पण कान मात्र तिकडे त्या सभाषणाकडेच होते. तिचा हात एकदां वर होऊन दाणकरून खालीं एका लठ्ठ लेजरवर आदळला; कुऱ्हाडीचा घावच जणु काहो.

"आमच्या सिटिझनेसनां तोड नाहीं!" जॅकसची अभद्र वाणी पाघळली.

"प्रत्यक्ष देवी भगवती आहे ती!" तिला घट्ट मिठी मारीत काली म्हणाली.

"आणि तुम्ही!" डेफाजेकडे पहात ती दीर्घद्वेषी बया परत बोलू लागली. "तुमच्यावरच जर सार सोंपवल असत — परमेश्वराचीच खैर आहे, तस नाहीं ही — तर अजूनसुद्धां त्याला सोडून द्यायला कमी नाहीं करणार तुम्ही"

"शक्य नाहीं, अगदीं किनीहि तें सुलभ — हें ग्लास नुसत वर करण्याइतक जरी सुलभ असल, तरीहि मी तें करण शक्य नाहीं! पण तेवढ्यावरच थांबेन मी. एवढ मात्र मी म्हणतों"

"बरं तर, हें बघ जॅकस," सतापानें मॅडम बोलत होती, "नि तू पण बघ ग काली; नीट ऐका दोघाहि ' ऐका, नीट ऐका ' सुलतानी जुलमी अरेराव म्हणून ही सारी अवलाद माझ्या नोंदबुकांत, सर्वनाश, समूळ उच्छेदांना योग्य, सर्वस्वीं योग्य म्हणून, कधींच नोंदली गेली आहे. हें खर आहे कीं नाहीं, विचारा त्यांना"

"खरं आहे हें," प्रश्नाची वाट न पाहतां डेफार्ज म्हणाला.

"आणि त्या मगल दिवशा, बॅस्टीलच्या पाडावाच्या दिवशीं, यांना ते कागद सापडले आणि घरीं आल्यावर दारबिर पार बद करून रात्रीं आम्ही दोघांनीं ते वाचले कीं नाहीं, हे पण त्याना विचारा पाहू"

"तेंहि खर आहे"

"आणि मग तो कागद वाचून पुरा झाल्यावर, रात्र अशी सरतां सरतां नि समोरच्या त्या शटर्समधून नि गजांमधून दिवसाचा प्रकाश आंत घुसत असतां, माझ एक गुपित आहे तुम्हांला सांगायच, अस त्यांना मी सांगितल होत की नाहीं!"

"होय, सांगितल होत," डेफार्जनें कबूली दिली.

"मग त्याना मी तें सारं सांगितल ही अशी, छातीवर हे अस्से दोन्ही हात जोरानें आपटीत मी म्हणालें, 'त्या एव्हरमॉंड भावांनीं पायदळीं तुडवून चेंदामेंदा केलेल्या त्या कुटुंबांतील उरलीसुरली वेल ती मीच ! एका कोळयाच्या घरांत वाढलें मी त्या भयंकर जखमेन मरणदारीं पडलेल्या त्या बच्चाची बहीण, ती माझीच बहीण, तिचा तो नवरा, तिच तें पोटांतल्या पोटांतच मेलेल मूल त्यांचच तो भाऊहि माझाच नि तो म्हातारा दुबळा बाप पण माझाच ! तीं सारीं मरणाघरीं गेलेलीं माणसं माझ्याच रक्तामांसाचीं, आणि त्यांच्या त्या रक्ताचा सूड घेण्याची कामगिरीहि आतां माझ्यावरच येऊन पडली आहे ! विचारा, खर आहे कीं नाहीं "

"खरं आहे, खर आहे," फिरून एकदा डेफार्जनें उत्तर दिलं.

"मग कुणाला असे सांगताहात आता, थांबा, थांबा म्हणून ? पण आतां सूर्य इकडचा तिकडे उगवला, तरी मी नाहीं थांबणार ' मॅडम आवेशानें म्हणाली

तिच्या त्या संतापाचं तें विलक्षण आवेगी स्वरूप पाहून त्या दोघांनाहि आनंदाच्या उकळया फुटत होत्या आणि तिच्याकडे प्रत्यक्ष न पहातांहि सिडनेला तिच्या संतापाचा चढलेला पारा चांगला स्पष्ट दिसत होता डेफार्जनं मध्यें हळूच एकदा मार्किसच्या त्या गुणवंती, दयाळू पत्नीचा मोन मोन उल्लेख केला, पण त्याची पत्नी कांहीं ऐकायला म्हणून तयार नव्हती. तिचा आपला एकच शब्द "आकाश कोसळल तरी आता मागें पाय नाहीं. समूळ विध्वंस ' बस्स ! ' समूळ विध्वंस ' ! "

पण आतां नेहमींचे इतर गिऱ्हाइक आंत प्रवेश करू लागल्यानें ती सभा विसर्जन पावली. सिडनेहि आपल्या जागेवरून उठला, चुकतमाकत पैसे मोजीत त्यानें आपलें बिल दिलें आणि नॅशनल पॅलेसचा त्यानें रस्ता विचारला. मॅडम डेफार्ज जातीने त्याच्याबरोबर दारापर्यंत बाहेर आली आणि त्याच्या खांद्यावर हात ठेऊन तिनें त्याला वाट दाखवली तिचा हात त्याच्या खांद्यावर असतो, त्या खालीं तिच्या कुशींत आपला खंजीर खोल खुपसण्यासाठीं सिडनेचा हात सारखा चुळबुळत होता. पण —

पण आपला हात तसाच खाली दाबून बाहेरील काळोखांत तो दिसेनासा

झाला आणि ठरलेल्या वेळीं त्यानें लॉरीच्या ऑफिसांत पाऊल ठेवलें त्याचें विषण्णपणें खोलींत फेऱ्या मारण्याचें काम चालू होतें. काहीं मिनिटांपूर्वीच ते तेथें परत आले होते आणि इतका सारा वेळ ते ल्यूसीजवळच बसून होते. डॉक्टर घरीं अजूनहि आले नव्हते त्यांच्या रदबदलीमुळें चार्लसची मुक्तता कदाचित होईल अशी तिला आशा वाटत होती पण फारशी कांही नाहीं; आपली आशा होती इतकच . बाहेर पडल्याला डॉक्टरनां आतां पांच सहा तास झाले होते, तरीहि अजून ते परत आलेले नाहींत कुठे गेले असतील तरी कुठे हे इतका वेळ ?

दहा वाजले, तरी अजून डॉक्टरांचा कांहीं पत्ता नाहीं असं पाहून लॉरी परत ल्यूसीकडे गेले आणि बारा वाजेपर्यंत माझी येथें वाट पहा म्हणून त्यांनीं जातांना मिडनेला सांगितलं डॉक्टरांच्या गैरहजेरींत आपण ल्यूसीजवळ असणं अगत्याच आहे, असं त्यांना वाटत असल्यामुळेंच त्यांनी त्याला तसें तेथें थांबण्यास सांगितलें होतें. तोहि स्वस्थपणें आपल्याच विचारांत गुंग होऊन घड्याळाकडे पहात स्वस्थ बसला होता. बाराचे ठोके पडले तरीहि डॉक्टर घरी आले नाहीत. मि लॉरींनाहि त्याचा कांहींच पत्ता सांगता येत नव्हता मग कुठे असतील ते?

याचाच विचार करीत, आणि त्यांना परत यायला लागलेल्या वेळावर विफल आशेचे इमले उभारीत, ते दोघे बसले होते तोंच जिन्यावर त्यांच्या पाऊलाचा परिचित आवाज झाला पण दार उघडून त्यांनीं आंत पाऊल ठेवताच, सर्व कांहीं संपलं असं दोघांनाहि स्पष्टपणें दिसलं.

या दरम्यानच्या काळांत डॉक्टर कुणाकुणाकडे गेले होते, कां कुणाकडेच न जाता तो सारा वेळ तसेच रस्त्यांत नुसते भ्रमिष्टासारखे भटकत होते, हें समजण्यास आतां कांहींच साधन उरलं नव्हतं ते त्या दोघांकडे टक लाऊन पहात असतां त्यांनीं त्यांना कांहींच विचारलं नाहीं, त्यांचा चेहेरा त्यांना सर्व कांहीं न बोलताच सांगत होता

"सांपडत नाहीं मला तें," डॉक्टर म्हणाले, "पण मला तर हवच आहे तें आत्ता. कुठे आहे हो तें ?"

त्यांच मस्तक अनावृत होतं, गळा मोकळा दिसत होता, चेहेऱ्यावर असहाय-पणा दिसत होता नि डोळे कुठे तरी अस्वस्थपणें भिरभिरत होते जरा वेळानें आंगांतील कोट काढून त्यांनीं तो खालीं टाकला आणि ते परत बोलू लागले.

" कुठे आहे माझं बांक ? सारखा सगळीकडे शोधतों आहे मी, पण सांपडतच नाहीं आहे तें. आणि माझं तें सामान पण कुठे आहे ? वेळ तर आतां संपत आला आहे. आज शिवून पुरे केलेच पाहिजेत मला ते."

त्या दोघांनींहि एकमेकांकडे पाहिलें आणि दोघांचीहि अंतःकरण भीतीन पार थिजून गेलीं

" असे पहातां काय ? जाऊं द्या मला आता तिकडे, कुठे आहे माझं तें सामान, कुठे आहेत ते बूट ? सांगा, बाबानों सांगा ! "

कांहींच उत्तर न मिळाल्याने त्यानीं अतिशय आवेगानें आपले केस उपटले नि एकाद्या रागीट, तामसी, वेड्यापिशा मुलासारखे आपले पाय आपटण्यास त्यांनी सुरुवात केली.

" कां छळतां बाबा, माझ्यासारख्या अनाथ हतभाग्याला ! " मोठ्यानें किंचाळत ते त्यांना विनवीत होते, " द्या, द्या माझं तें काम मला ! आज नाहीं झालं ते पुरं, तर काय बरं करूं मग मी ? "

अनिष्ट — अगदीं पूर्ण अनिष्ट ! आशेचा अंधुक किरणहि चुकून कुठें दिसत नव्हता. त्यांना भानावर आणण किंवा त्यांच्याशीं कांहीं बोलणहि आतां शक्य दिसत नव्हतं. दोघांनीहि जसा कांहीं एक मतानें आपला हात त्यांच्या खांद्यावर ठेवला नि त्यांचीं हत्यार आणून देण्याच कबूल करून त्यांना त्यानीं कसं बसं खालीं खुर्चीत बसवल. समोरील जाळाकडे पहात नि डोळ्यांतून अश्रू गाळीत ते खुर्चीत कसेबसे पडले होते डेफार्जच्या पोटमाळ्यावरील डॉक्टरांची ती हतबल, क्षीण, जराजीर्ण मूर्ती आज इतके वर्षांनतर, मध्यतरींचा सर्व काळ एका क्षणांत गुप्त झाल्याप्रमाणें, लॉरींच्या समोर तशीच सर्वनाश झाल्यासारखा त्यांना आतां दिसत होती.

ते दोघेहि त्या विचित्र, भीतिदायक घटनेनें अगदीं सुद होऊन आपल्या समोरील त्या जीवत प्रेताकडे पहात स्वस्थ बसले होते. पण ती वेळ निराशेच्या किंवा भावनेच्या आहारीं जाऊन स्वस्थ बसण्याची नव्हती. त्यांच्या एकुलत्या एक कन्येची दुःखदग्ध असहाय मूर्ती त्या दोघांच्याकडे आधारासाठीं मोठ्या आशेनें पहात होती. सहसवेदनांनीं जागे झाल्यासारखे त्या दोघानींहि एकमेकांकडे पाहिलें. दोघांच्याहि चेहेऱ्यावर एकच भाव दिसत होता. कार्टननें प्रथम तोंड उघडलें — ,

" आपली अखेरची आशाहि आतां खुटली आहे तशी जोराची नव्हतीच म्हणा. हं ! — यांना आतां तिकडे नेण बर पण तिकडे जाण्यापूर्वी एक क्षणभर मी काय म्हणतों इकडे नीट लक्ष द्या मी काय सांगेन त्याला कां, कस, कांहीं विचारू नका, मी मागतों तें वचन कांहींहि न विचारतां द्या, आणि माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवा. माझीं कारण तशीच अतीशय महत्त्वाची आहेत "

" मला तिळमात्र शका नाहीं त्याची, बोला मि कार्टन ' "

त्या दोघामधील खुर्चीतील ती वृद्ध मूता तशीच ससकारे टाकीत नि आपल्याशींच कण्हत खुर्चीत मागेंपुढें सारखी डोलत होती ते दोघेहि एकाद्या आजाऱ्याजवळ बसल्यासारखे खालच्या आवाजांत कांहींतरी बोलत होते. त्यांच्या पायात गुतन असलेला डॉक्टरांचा तो खालीं पडलेला कोट कार्टननें वर उचलला तो वर उचलीत असतां त्यांतील खिशांतून डॉक्टरांचें कागद ठेवण्याचें पाकीट खालीं पडलें कार्टननें तें वर उचलून उघडीत विचारलें, आपण बघायचेना हे कागद ? " लॉरीनी मान हलविल्यानतर त्यानें तो कागद उघडला. " पण हें काय ' " तो आश्चर्यानें उद्गारला

" काय आहे हो ? " लॉरीनीं उत्सुकतेनें विचारलें.

" थोडा दम धरा ' सांगेन योग्यवेळी आधी हें, ' आपल्या खिशांतून एक कागद बाहेर काढून तो म्हणाला " पहा: हा माझा शहराबाहेर जाण्याचा परवाना. नीट पहा तो आहे ना — सिडने कार्टन, इंग्लिशमन ? "

तो कागद तसाच हातांत घेऊन लॉरी त्याच्या त्या मच्चा, दिलखुलास, जिव्हाळयानें भरलेल्या चेहेऱ्याकडे पहात होते

" उद्यांपर्यंत तुमच्याजवळ असू द्या तो उद्या मी तुरुगांत त्याची भेट घेणार आहें. तुम्हाला माहीतच आहे तें तिथे तुरुगात माझ्याजवळ नसलेला बरा तो. "

" कां बर ? "

" मला नाहीं सांगतां येणार. पण नसलेला बरा. आतां हा डॉक्टरांचा कागद. त्यांना, त्यांच्या मुलीला, नातीला शहर सोडून केव्हांहि बाहेर जाऊन देशपार होण्याचा परवाना आहे तो ! पाहिलात ? '

" हं ! "

" मला वाटत अखेरची सावधागिरी म्हणून कालच पैदा केला असावा त्यांनी

तो. कधींची आहे वर तारीख? जाऊ दे पण; त्याचं नाहीं महत्त्व. तुमचा, माझा आणि हा असे हे तिन्ही नीट तुमच्याजवळ ठेवा आणि आतां नीट लक्ष द्या ! हा असला कागद त्याच्या जवळ असेल अशी माझी कल्पना होतीच तो रद्द झाला नाहीं तर ठीकच आहे. पण मला अशी भीति वाटते आहे कीं तो परवाना कदाचित रद्द केला जाईल, नव्हे, जवळजवळ खात्री झाली आहे तशी माझी "

"म्हणजे, त्यांच्या जीवाला धोका तर नाहीं ?"

"आहे, अतिशय मोठा धोका आहे. मॅडम डेफार्जकडूनच त्यांना तसा धोका आहे तिचे प्रयत्न उद्गारच मी आत्ता ऐकले आहेत, आणि माझी तर पूर्ण खात्रीच पटली आहे त्यानंतर मी एक मिनिटहि व्यर्थ दवडलं नाहीं, आणि त्या बारसाडर्नाहि मग भेट घेतली त्याचहि म्हणणं तसंच आहे एक आरकशी — तुरुंगाजवळच दुकान आहे त्याचं — मॅडम डेफार्जच्या अगदीं मुठींतला आहे. त्यानें तिला रस्त्यावर खुणा करताना ल्यूसीला पाहिल्याचं सांगि-तलंहि आहे. आतां यांच्यामुळें लोकराज्याविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून तिला, तिच्या मुलीला, तिच्या वडीलांना — कारण त्यानाहि त्यानें तिच्या-बरोबर पाहिलं आहे — यांना, माफ करणं अगदीं सोपं आहे. असे घाबरून नको जाऊ पण मि. लॉरी, अजूनहि तुम्ही त्या सर्व्यांना वाचवाल "

"परमेश्वर करो नि तसंच होवो, मि कार्टन ' पण कसं ?"

"आतां सांगणार न आहें कसं तें तुमच्यावर अवलंबून आहे सर्व दुसरं कोणीहि तें करू शकणारहि नाहीं. उद्यांच काहीं हा आरोप बहुतेक केला जाणार नाहीं, कदाचित दोन तीन दिवसांहि लांबेल तें; कदाचित त्याहूनहि अधिक तुम्हाला माहीतच आहे कीं शिरच्छेद झालेल्या माणसाबद्दल शोक व्यक्त करणं हाहि एक भयंकर गुन्हा आहे. आणि शिरच्छेद हीच त्यालाहि एकमेव शिक्षा आहे. आता चार्लसबद्दल यांना कोणीहि शोक व्यक्त न करणं, केवळ अशक्य आहे ' आणि ती दीर्घद्वेषी बया -- ती मूर्तिमंत राक्षसीण — त्याचा फायदा घेऊन नि त्या दोन घोर अपराधाची सांगड घालून, आपली बाजू अगदीं पूर्ण बळकट केल्यावांचून कधींहि राहणार नाहीं आलं लक्षांत ?"

"इतकं लक्षपूर्वक आणि तुमच्या शब्दांवर इतका विश्वास ठेऊन हें सारं

ऐकतों आहे मी, की एक क्षणभर हें दुःखहि मी विसरून गेलों होतों " डॉक्टरांच्या मुठीला बोट लावीत लॉरी म्हणाले

" तुमच्याजवळ पैसा आहेच, त्याच्या जोरावर हा सारा प्रवास विद्युत् वेगानं आटपून कॅलेच बंदर शक्य त्या तातडीनं गाठणं तुम्हांला कठीण नाहीं. तुम्ही स्वतः लंडनला जाण्याची पूर्ण तयारी केलेलीच आहे. उद्यां लौकर सकाळपासूनच आपले घोडे तयार करून दुपारीं दोनला तुम्हांला निघता येईल, इतकी तयारी ठेवा सगळी "

" करतों, सर्व अगदीं तसेंच करतों "

सिडनेच्या नेटावरील नि आवाजांतील तळमळ इतकी सक्रम नि जोरदार होती कीं त्यानें त्या म्हाताऱ्याच्या हाडांच्या आंगीतहि तारुण्याचें वारें आतां संचारत होतें

" अतिशय थोर नि उदार हृदयी आहांत तुम्ही. तुमच्याहून अधिक लायक कोणी मला भेटणार नाहीं, असंच म्हटलं होतं नाहीं मी? तर आतां तिच्या, तिच्या मुलीच्या नि तिच्या वडिलांच्या जीविताला असलेल्या या धोक्याची तिला पूर्ण जाणीव द्या. या कोपमन्त्रात तिच्या वडिलांची नि मुलीचीहि आहुती पडेल या गोष्टीवरच विशेष भर तुम्हांला दिला पाहिजे, नीट ध्यानात ठेवा. कारण ती काय आपल्या जीवितेश्वरासाठीं आपल्या सुकुमार देहाची कुरवंडी करायला निरतिशय आनंदानें तयारच आहे "—एक क्षणभरच तो थोडा अडखळला; मग परत त्यानें सुरुवात केली " तुम्ही मागाल त्या घटकेला आपल्या पित्यासाठीं नि त्या पोरीसाठीं तुमच्या बरोबर तिनें आलंच पाहिजे. तिच्या पतीचीच तशी अखेरची इच्छा आहे म्हणून. तिला कल्पना नाहीं इतक्या गोष्टी यावर आतां अवलंबून आहेत. हें पुन पुन्हां तिला आर्जवून बजावा. त्या अशा या स्थितींत सुद्धां डॉक्टर तिचं ऐकतील, असं वाटतं ना तुम्हांला? "

" हो, माझी पूर्ण खात्री आहे तशी ! "

" माझी तशी कल्पना होतीच. ह्. आतां ही सगळी तयारी अगदीं न चुकतां गुपचूपपणें नि धीरानं चालू दे इथें. तुम्ही सुद्धां गाडींत अगदीं तयार होऊन बसून रहा; आणि मी आलों की मला आंत घेऊन गाडी एकदम पिटाळा. "

" कांहीं झालं तरी तुमची वाट ही बघायचीच ना आम्ही ? "

" माझा परवाना तर तुमच्याच जवळ आहे, माझी जागा मात्र राखून ठेवा,

बस. मी आंत पाऊल ठेवलं की अगदीं कसलीहि वाट न पाहतां एकदम गाडी जाऊं दे, कीं थेट इग्लंड ! "

" म्हणजे माझ्यासारख्या एकट्या बुढ्यावरच नाहीं कांहीं सार अवलबून, एक कळकळीचा जवान पठ्ठा आहे कीं माझ्या मदतीला ! "

" परमेश्वर करो नि तसच होवो ! आतां परमेश्वराची शपथ घेऊन सांगा मि लॉरी कां, आत्ता आपल्या ठरलेल्या या गोष्टींत, अगदीं डोक्यावर आकाश कोसळल तरी बदल करणार नाहीं म्हणून. "

" अगदी प्राण गेला तरी नाहीं बदल करणार, कार्टन "

" या शब्दांची नीट आटवण ठेवा उद्यां आणि यांत जर काडीचाहि बदल केलात किंवा चालढकल केलीत — मग ती कोणत्याहि कारणानें असो — यांतला एक जीवहि जिवत तर नाहींच सुटणार, पण आणखीहि काहीतरी जीवांचा बळी मात्र गेल्यावांचून खास रहाणार नाहीं, हें घ्यानात ठेवा ! "

" कसलीहि कुचराई न करतां माझं कर्तव्य मी पार पाडीन, कार्टन "

" ठीक. आतां माझ्ञ कर्तव्य मला पार पाडू दे. आणि आता, गुडबाय !'

इतक्या गभीरपणें त्यानें जरी त्याचा निरोप घेतला नि लॉरींचा हात त्याने आवेगानें दाबला तरी त्यानें तिथून लगेच बाहेर पाय न घेतां, प्रथम त्याच्या मदतीनें डॉक्टरांना खुर्चीतून'उठवून नि त्यांचा कोट त्यांच्या आंगावर चढवून त्यांना हळुहळू चुचकारीत बाहेर आणलें. आणि मग डॉक्टरनां हात धरून तसेच चालवीत त्यांना आणि लॉरींना ल्यूसीच्या दाराजवळ त्यानें आणून सोडलें. आणि मग एकदोन क्षण तसाच खालीं आगणांत ल्यूसीच्या खोलीकडे वर भावाकुल दृष्टीनें पहात तो स्वस्थ उभा होता. एकेकाळची त्याची ती सदा हसतमुख सदाफुली, आपल्या पतीसाठीं दीनपणे अश्रु गाळीत आतां तिथें उदासवाणी बसली होती. एकेकाळच्या त्याच सुकुमार दयापूर्ण हृदयाजवळ त्यानें आपल हृदय मोकळ केल होत आणि आतां त्याच अकालीं कोमेजत असलेल्या नाजुक जाईसाठीं तो आतां —

एक दीर्घ सुसकारा टाकून, तिला सदा सुखी ठेवण्यासाठीं त्या अनाथनाथाची प्रार्थना करून नि तिचा मूक निरोप घेऊन तो तिथून प्रशांत चित्तानें बाहेर पडला.

---

.... १३ ....

तुरुगाच्या त्या भयानक अजस्र भितीच्या आत आपल्या उरल्यासुरल्या आयुष्याचीं घटकापळें मोजीत, मृत्यूचे त्या दिवसाचे बळी आपआपल्या विचारांत गुग होऊन बसले होते बावन्न लोकांचा बळी त्या दिवशीं मृत्यूच्या स्थंडीलावर अर्पण केला जायचा होता. कालोदधीच्या मागे पुढें उसळणाऱ्या कराल लाटाच्या उदरांत कांहीं थोड्या तासानींच ते कायमचे गडप व्हायचे होते. भयभीत अत करणानें ते मेलेले जीव मृत्युच्या पैलथडीवर उभे राहून आपल्या समोरील त्या सहारक लाटाची प्रतीक्षा करीत आतां बसले होते. त्या कराल लाटाची गर्जना त्याच्या कानांवर आदळू लागून त्यांच्या हृदयाला बधिरता आणीत होती आणि त्यांच्यापूर्वी स्थडीलावर सांडलेल्या त्या रक्तांत त्यांचेंहि रक्त आतां एकजीव होऊन जायच होत. पण त्यांच्या त्या भयाण कोठड्या त्यातून ते बाहेर पडण्यापूर्वीच परत भरतच होत्या. जणु काय सुपातले सगळे भरडले जाण्यापूर्वीच, त्या भीषण अटळ घरटाच्या घासासाठीं नवीन लहानमोठे दाणे सुपांत येऊन पडतच होते, नि पुढचा घास आधीच तयार होऊन रहात होता

ते बावन बळी तयार होते सत्तरीच्या घरातले सपन्न मानकरी नि विशीच्या घरातल्या दीनदुबळया बायाबापड्या तिथें उभ्या असलेल्या दिमत होत्या. वृद्धाचें वृद्धत्व नि तरुणाचें तारुण्य, सपन्नांची सपत्ति नि दरिद्र्याच दारिद्र्य, थोरांची प्रसिद्धी नि अज्ञाताचं अज्ञातत्व काहीं कांहीच त्या कुणाच्या मदतीस न येता, ते सारे बळी आपआपल्या वेळेची वाट पहात आतां शून्यपणें उभे होते. असख्य दुर्गुणांच्या खातेऱ्यांत लोळल्यामुळें उत्पन्न झालेल्या शारीरिक व्यथा, आपला बळी जसा काहींहि दया माया न दाखवतां अत्यत निर्घृणपणें घेत असतात, त्याचप्रमाणें त्या अराजक अदाधुद काळातील बेगुमानपणा, दयाशून्यता, असहनीय पिळणूक नि अनिर्वचनीय अनत अत्याचार यातून अत्यत प्रक्षोभानें उत्पन्न झालेली मानसिक विकृती, आतां तितक्याच निर्घृणपणें, कुठेंच कसलाच भेदभाव न करतां मुक्तहस्तानें सर्वांचा सारखाच बळी घेत होतीं.

काल तुरुगांत परत पाऊल टाकल्यापासुन चार्लसला कसलीच खोटी आशा

आतां एक क्षणभरहि फसवू शकत नव्हती काल त्या कागदांचें वाचन चालू असतां त्यांतील ओळ न ओळ जशी कांहीं आपला निषेध करीत सूडाची गर्जना ठोकीत आहे, असें त्याला वाटत होतें. आतां यापुढें कोणाचाहि केवढहि प्रभावी व्यक्तिमत्व आपली मुक्तता करू शकणार नाहीं, याविषयीं त्याची पूर्ण खात्री पटली होती पॅरिसच्या विराट राष्ट्रपुरुषानेंच जणु काय त्याला देहांताची शिक्षा सुनावली होती मग एकटीदुकटी दुर्बल व्यक्ती या स्थितीत काय करूं शकणार !

तरीहि, मृत्यूची ही अटळता मनाला स्पष्ट दिसत असूनहि, आपल्या लाडक्या पत्नीचें ते सुकुमार मोहक मुखमंडल डोळयांसमोर उभं राहिलं कीं चार्लसचं मन त्याला धीर द्यायला समर्थ होत नव्हतं या ऐन तारुण्यात, आसमंतांतलं सारं विश्व सुखदायक यौवनानें भारावलं असतां, तिकडे कायमची पाठ फिरवून मृत्यूला आनंदानें कवटाळण्यास त्याचं मन अजून तयार झालं नव्हतं. त्याच्या आंगाभोंवती लपेटलेले जगाचे नाजुक पण जिवट बंध प्रयत्न करूनहि त्याला तोडतां येत नव्हते. खूप प्रयत्न करून त्यांची पकड कुठे जरा सैल झाल्यासारखी त्याला वाटावी, तोंच दुसरीकडे त्याचं बळ वाढत असल्याचं त्याला दिसून येई. मनात विचारांची एकच गडबड घाई नि गोंधळ माजून राहिला होता. हृदयांतील प्रेम भावना उत्कटपणें वर उफाळून त्याला हतबल करीत होत्या एकक्षण दोन क्षण कुठे मोठ्या धीरानें नि शांतपणें मरणाला तयार व्हावें तोंच त्याच्या लाडकीचं नि त्या चिमुरड्या ल्यूसींचं चित्र डोळयांपुढे उभं राहून त्या स्वार्थी वृत्तीचा तें निषेध करू लागे 'तू चाललास, पण आमची काय रे वाट ?' असंच जणु काय तें त्याला विचारीत राही

पण विचाराची ही प्राथमिक अवस्था आता मागें पडू पहात होती असंख्य लोकांनीं त्याच्या पूर्वी याच्या आधीं आपल्या निरपराध देहाचा हसत मुखानें बळी दिला होता. असंख्यांनीं मोठ्या धैर्यानें त्या मानाच्या मरणास मानोद्धत वृत्तीनें तोंड दिलें होतें कोणा एकाचेंहि पाऊल मृत्यूच्या त्या राजरस्त्यानें जात असतां एक क्षणभरहि कचरलं नव्हतं. धैर्याची ही सारीं उदात्त उदाहरणें त्याच्यासमोर आतां उभीं राहून त्याच्या अस्वस्थ बावरल्या मनाला स्थैर्य आणीत होतीं. आणि त्याच्या अचल धैर्यावरच त्या मागें राहणारांचं मन स्वास्थ्य अवलंबून नव्हतं का ? विचाराच्या या दिशेनें त्याच्या हृदयाला शांति मिळू लागली, विचार उदात्त झाले आणि मुखावर समाधान प्रसन्नपणें विहरूं लागलं.

विचारांच्या प्रगत प्रवासाचा इतका टप्पा त्यानें आतां गांठला होता. रात्रीच्या त्या प्रशांत शांततेंत आणि मनाच्या या प्रसन्नावस्थेंत आपल्या प्रिय जनांचा पत्रद्वारें निरोप घेण्याचा विचार त्याच्या मनांत उत्पन्न झाला. लेखन साधनांची त्याला अनुकूलता होती आणि कोठडींतील दिवे जायलाहि अजून अवधी होता. हातात लेखणी घेऊन त्यानें कागद पुढें घेतले.

" .. काल कोर्टांत तो कागद वाचला जाईपर्यंत, तुझ्या वडीलांच्या बंदीवासाला माझेच वडील कारणभूत असल्याची तुझ्याप्रमाणेच मलाहि पुसटसुद्धां कल्पना नव्हती आणि त्यांच्या बंदीवासाची हकीगत तुझ्या तोंडूनच मी काय ऐकली होती ती. माझं नांव तुझ्यापासून सुद्धां गुप्त ठेवण्याचं कारण याच्या आधींच मी तुला सांगितलं होतं. तुझ्या वडीलानीं तसं वचनच मुळीं आपल्या विवाहापूर्वी माझ्या जवळून घेतलं होतं आणि आपल्या त्या विवाहदिनींसुद्धां त्या वचनाचा पुनरुच्चार त्यांनीं माझ्याजवळून कसोशीनें करून घेतला होता. आता समजलं मला त्याचं कारण. पण —' त्यांनीं लिहिलेल्या या कागदाची स्मृति तुझ्या वडीलांना होती कीं काय तें समजण्यास आता कांहीं मार्ग नाहीं, नि तें समजून घेण्याचा ल्यूसी, तू प्रयत्नहि करूं नये हें बरं. मागे एकदां मी लंडन टॉवरमधील कोठडींतल्या कागदाची हकीगत सांगत असतां त्यांना त्याची आठवण झालीहि असेल, नाहीं कुणी म्हणावं. आणि असलीच जरी आठवण तरी, बॅस्टीलच्या पाडावानंतर त्यातील सर्व कागदपत्राचा जो नाश केला गेला त्यांतच त्याचाहि झाला असेल, असंहि त्यांना वाटलं नसेल कशावरून? तें कांहींहि असलं तरी ल्यूसी, आतां त्या म्हाताऱ्याचं समाधान करणं तुझ्यावरच सर्वस्वीं अवलंबून आहे. त्यांचा यांत कांडीचाहि दोष नाहीं हें पुन पुन्हां त्यांच्या मनावर सारखं ठसवलं पाहिजे. त्यांच्या मनाचं हें समाधान तुझ्याशिवाय आतां कोण बरं करूं शकणार आहे? मी कशाला हवं तुला हें सांगायला, पण राहवलं नाहीं...माझ्या प्राणा, आपल्या मनाचा धीर खचूं देऊं नको नि आपल्या वडीलांची नि ल्यूसीची नीट काळजी घे — प्रणाम, त्यांना अनेकवार प्रणाम... आपली भेट...आतां देवा घरीं, ल्यूसी. "

" तुमच्यावरच आतां बाबा, माझ्या लाडकीचा नि छोट्या ल्यूसीचा भार आहे. झाल्या गोष्टीबद्दल स्वतःला दोष लाऊन खंत करीत उगीच बसू नका. आपल्या लेकीचं नि नातीचं सर्व जीवन आतां तुमच्यावरच अवलंबून आहे.

जगांतील त्यांचा एकमेव आधार आतां तुम्हींच आहां तुम्हींच आहां ... तुम्हींच आहां ! ”

लॉरींनाहि मग एक पत्र लिहून त्यांचा मोठ्या प्रेमानें त्यानें निरोप घेतला. त्याच्या व्यवहाराची त्याना सर्व माहिती होतीच. डॉक्टरसुद्धां साऱ्यांची जबाबदारीहि आतां त्यांच्यावरच होती. त्यानीं दाखविलेल्या अकारण स्नेहानें तो त्यांचा कायमचा ऋणी आहे, वगैरे गोष्टी त्यानें पत्रांत लिहिल्या होत्या. झालं, आतां कांहीं शिल्लक उरल नाहीं. पण कार्टनची मात्र त्याला आठवण झाली नाहीं. इतर सर्व गोष्टींनीं त्याचं मन इतकं भारावून गेल होत कीं त्याला त्याची एकदांहि आठवण झाली नाहीं

कोठडींतील दिवे जाण्यापूर्वीच त्याच पत्रलेखन संपल आणि मग दिवे जाऊन त्यानें खालील गवती बिछान्यावर आंग टाकतांच या जगांतल आपल कार्य संपलं अस त्याला वाटल.

पण नाहीं. तेंच जग त्याच्या डोळ्यांसमोर किती तरी मोहक मूर्ती अजूनहि नाचवीतच होत, नि तें मोहक दृश्य त्याला मागे ओढीत होत. आपण बंधमुक्त होऊन आपल्या घरांत ल्यूसीच्या संगतींत आपण परत बसलों असून या बंदीवासाची — या विरलेल्या भीषण स्वप्नाची हकीगत आपण तिला सांगत आहोंत. भोगलेल्या क्लेशाची विस्मृति आपल्याला पडली आहे आणि परत तसेच अनिर्बंध त्या जगात आपण वावरत आहोंत, अस त्याला वाटत होत मध्येंच परत विस्मृतीचा पडदा पडे नि त्या लाडिक मूर्ती डोळ्यासमोरून अदृश्य होत परत आपण जणू काय हें जग सोडून गेलों आहोंत पण परत मध्येंच एकदां घरीं येऊन सर्व कांहीं जसच्या तस पहात आहोंत, असा त्याला भास होई. परत झोंपेचा गडद अंधार भोंवती पसरे नि सर्व कांहीं अदृश्य होई सकाळीं कांहीं तासाच्या शांत झोंपेनंतर त्यानें डोळे उघडून सभोंवार पाहिलें आपण कुठें आहोंत नि काय झाल आहे याचा त्याला कांहीं वेळ बोध होईना. पण दोघ्याच क्षणांत वीज चमकल्यासारखी वस्तुस्थितीची त्याला स्पष्ट जाणीव झाली, आणि त्याचं मन उद्गारल. ‘ माझा मृत्यु दिन ! ’

कांहीं वेळानें शांतपणें त्यानें खोलींत फेऱ्या मारण्यास सुरवात केली. जगाचा अखेरचा निरोप घेण्याची त्याच्या मनाची तयारी झाली होती सभोंवार डोळ्यांना दिसणार तेंच तें दृश्य अवीट नजरेनें तो पहात होता. पण आतां हे

नवीनच विचार त्याच्या मनांत कसले उठत आहेत? आणि त्याच्या प्रयत्नांना न जुमानतांहि ते फिरून त्याला कां भेडसावीत आहेत!

त्याच्या आयुष्याची एकाक्षणांत इतिश्री करणार क्रांतिदेवीच तें भीषण नूतन अपत्य, त्याला अजून अज्ञातच होतं. किती उंचावर उभारलं असेल तें, किती पायऱ्या असतील त्याला, कुठें उभा करतील आपल्याला, आपल्याला स्पर्श करणारे ते हात रक्ताळलेले असतील का, आपली पाळी प्रथमच येईल कीं सर्वांच्या शेवटीं? असले अनंत विचार त्याच्या मनांत पुन पुन्हा सारखे उमळत होते. पण त्याला भीति मात्र तिळमात्रहि वाटत नव्हती. अगदीं निर्भयपणें त्या अनंत प्रश्नांकडे तो पहात होता.

तास मागून तास पुढें जात होते. तरी त्याच्या फेऱ्या चालूच होत्या. परत कधींहि ऐकाला न येणारे ते ठोके त्याच्या कानावरून जात होते. नऊ गेले — दहा गेले — अकरा — आतां हे बारा — परत कधींच हे सर्व आकडे आपल्याला आतां ऐकूं येणार नाहींत. काळाच्या अथांग उदरांत ते त्याच्यापुरते आतां कायमचेच विलीन होत होते. त्याच्या फेऱ्या चालूच होत्या. त्या सर्वांची नांवें त्याची जीभ अत्यंत हळुवारपणें परत परत उच्चारीत होती. आणि मग मनांतलि विचारांची धडपड शांत झाली, आणि असाच शांतपणें परमेश्वराची स्वत साठीं नि त्या सर्वांसाठीं प्रार्थना करीत मनाला विमनस्कता मुळीच शिवूं न देतां त्याचें फेऱ्या मारणें चालू झालें.

बाराच्या ठोक्यांचा आवाज होऊन कायमचा शांत झाला.

देहांताची वेळ जरी तिहींची ठरली होती तरी आपल्याला दोनच्या सुमारास तयार व्हावं लागेल याची त्याला कल्पना आली होती. कारण सर्व बंदी घेऊन त्या अज्ञात जागेवर जाऊन पोंचायला कांहीं वेळ हा लागणारच. दोहों-लाच आपण तयार झालं पाहिजे, म्हणजे दुसऱ्याना धीर देण्याची कामगिरी आपल्याला करतां येईल, न हा तर नाहीं, तो आपल्या मनाला सांगत होता.

छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून त्याचें शांतपणें फेऱ्या मारण्याचें काम चालू होतें. ला फोर्सच्या तुरुंगांत प्रथम पाऊल टाकलेला चार्लस आतां तिथें खोलींत फेऱ्या मारीत नव्हता. स्वस्थ मनानं मरणाला तोंड द्यायला तयार झालेला चार्लस आज असा परत फेऱ्या मारीत होता. नि म्हणून एकाचा टोला पडलेला ऐकून तो दचकला नाहीं कीं अस्वस्थ झाला नाहीं. परमेश्वरानें

त्याच्या मनांत धैर्याची ज्योत आतां पेटविली होती. त्या धैर्य ज्योतीच्या उज्ज्वल प्रकाशांत औदासिन्याचे दुबळे विचार दूर पळून गेले होते नि त्याचें आत्मसामर्थ्य स्वस्थानीं विराजमान झालें होतें. 'फक्त एकच तास आतां,' तो आपल्याशींच पुटपुटला नि परत फेऱ्या मारू लागला.

बाहेर, दाराबाहेर त्या दगडी जमिनीवर कुणाची तरी पाउलें वाजलीं तो थांबला दाराचं कुलूप कुणी तरी उघडल आणि दार उघडत असतां हळूच कोणी तरी इंग्लिशमध्ये बोलल "मला त्यांनीं इथें कधींच पाहिल नाहीं, अजूनपर्यंत मी दूर दूरच आहे. तुम्ही एकटेच आंत जा; मी इथे बाहेर जवळच थांबतों. वेळ मात्र मोडू नका!"

दार झटकन उघडून एकदम बद झाल; आणि त्याच्याकडे निश्चलपणें टक लाऊन पहात, शांत, किंचित हसतमुख, पण ओठावर मावधगिरीसाठीं बोट धरून सिडने कार्टन त्याच्यासमोर उभा राहिला.

त्याच्या चेहेऱ्यावर खेळत असलेल काहीं निराळच पाणी पाहून आपण स्वप्नांत तर नाहींना अस प्रथम एक क्षणभर चार्लसला वाटल पण सिडने आतां बोलू लागला होय, तोच तो आवाज. "सगळीं सोडून मीच आलेला पाहून अगदीं चकीत झालास नाहीं?" तो म्हणाला. "मी येईन अशी तुझी कालत्रयींहि कल्पना नसेल!"

"अस काहींस खर माझी खरीच कल्पना नव्हती. पण तुम्ही—" मनांत एकदम आलेल्या शकेनें तो घाबरून गेला—"कैदी तर नाहीं?"

"अह! एका पहारेकऱ्यावर असलेल्या माझ्या वजनाचा फायदा घेऊन मी आलों आहें इथे. मी तिच्याकडून — तुझ्या पत्नीकडून आलों आहे, डार्ने."

डार्नेनें त्याचा हात धरून घट्ट दाबला

' तिची एक विनति आहे तुला.''

"बोल काय ती."

"अगदीं तळमळून जीव तोडून सांगितल आहे तिन, तुला अत्यंत प्रिय असलेल्या तिच्या प्राणाचीच शपथ घालून सांगितल आहे तिन, विसरू नको, तिच्याच प्राणांची शपथ आहे तुला"

चार्लसनें आपलें तोंड जरा बाजूला वळविलें.

" मला कां म्हणून विचारू नकोस, काय म्हणून पण विचारूं नको — मला वेळ तर मुळींच नाहीं. काय सांगेन तें निमूटपणे कर, वेळ मोडू नको — तिची शपथ आहे तुला — काढ, तुझ्या पायांतले ते बूट काढ आणि हे माझे चढव ताबडतोब."

या वेळांत चार्लसच्या मागें भिंतीजवळ असलेल्या खुर्चीत त्यानें त्याला चपळाईनें खालीं बसवून आपले बूट त्याच्यापुढे टाकलेहि होते. " चल चढव ते माझे बूट हं उचल, उचल, लाव त्यांना हात — अगदीं विचार न करतां लाव चल आटप लौकर ! "

" कार्टन, शक्य नाहीं इथून निसटून जाण, कधींच शक्य नाहीं उगीच तूं मात्र माझ्या बरोबर प्राणास मुकशील छट, वेडेपणा आहे हा ! "

" मी तुला निसटून जा म्हणून सांगितल तर वेडेपणा, पण तस सांगतों आहे का मी ? त्या दारांतून बाहेर पड म्हणून सांगितल तर मग मला हा वेडेपणा म्हणून सांग, आणि रहा इथेच तो गळ्याभोंवतीचा स्कार्फ काढ नि हा माझा घे, आणि तसाच तो कोटहि काढून बदल आणि तुझ तें चालल असतां तुझ्या केसांतली ही रिबन मी काढतों आणि तुझे केस असे माझ्यासारखे जरा पसरतो हं ! "

काही विलक्षण चपळाईनें आणि शारीरिक नि मानसिक सामर्थ्यानें — अंगांत दैवी संचार झाल्यासारख्या — त्याच्या त्या सर्व क्रिया चालल्या होत्या. एकाद्या लहान पोरासारखाच तो आतां चार्लसला वागवीत होता

" कार्टन ! प्रिय कार्टन ! अगदी वेडेपणा आहे हा. शक्य नाहीं हें साधण, कधींच शक्य नाहीं तें, अजूनपर्यंत कधींच यश नाहीं आल असल्या प्रयत्नांना — माझ ऐक, तुझ्या मृत्यूची भर घालून माझं हें जिण अधिक दु खी कष्टी करू नको कार्टन. ऐक, माझी एवढी विनंति ऐक ! "

" पण डार्ने, मी तुला दाराबाहेर पडायला सांगतों आहे का तरी ? तें मी सांगेन तर मग खुशाल नाकार. हें इथे लेखन साहित्य दिसत आहे. लिहितां येईल ना तुला, हात नाहीं ना कांपणार तुझा ? "

" आत्तां तू आंत येईपर्यंत कांपत नव्हता "

" तसाच तर तो परत कांपू देऊ नको आणि मी काय सांगतों तें लिही. हं चल, झटपट दोस्त, झटपट ! "

कांहींशा श्रमिष्टपणें आपल्या कपाळावर हात दाबून डार्ने टेबलाजवळ बसला; आणि कार्टनची स्वारी आपला उजवा हात छातीजवळील खिशांत धरून त्याच्या-जवळ उभी राहिली.

"मी सांगेन तस्सच अगदीं लिही "

"नांव कुणाच घालू वर ?'

"कुणाचहि नाहीं," आपला हात अजून तसाच खिशांत ठेऊन कार्टन म्हणाला.

' तारीख घालू का ?"

"नको."

प्रत्येक प्रश्न करताना चार्लस वर पहात होता आणि कार्टन तसाच छाती-जवळ हात ठेऊन त्याच्या डोक्यावरून खालीं पहात होता.

"'काहीं दिवसापूर्वी आपल दोघाच झालेल संभाषण,'" कार्टन सांगत होता, "' जर तुझ्या स्मरणात असेल तर याचा तुला चांगला स्पष्ट बोध होईल. मला माहीत आहे, तुला चांगल स्मरत आहे तें. तस तें सहज विसरण हा तुझा स्वभाव नाहीं.'"

आपला हात तो खिशांतून बाहेर काढीत होता, पण चार्लसनें आकस्मिक-पणें मधेंच वर पाहिल्यामुळें, हातात काहींतरी धरलेला कार्टनचा तो हात, तसाच थांबला.

"झाल लिहून, 'विसरण हा तुझा स्वभाव नाहीं'?" कार्टननें विचारलें.

"झाल. पण तुझ्या हातात तें काहीं हत्यार आहे काय रे ?"

"अ हं, नि:शस्त्र आहें मी."

"मग हातात काय आहे तर तें ?"

"कळेल तें तुला लौकरच. ह, लिही पुढे; काहीं फार नाहीं उरल आता." त्यानें मजकूर सांगण्यास परत सुरुवात केली "'ते शब्द खरे करण्याची आतां वेळ आली आहे म्हणून मला आनद वाटतो आहे. तसं मी केल्याबद्दल कोणा-लाहि वाईट वाटण्याच कारण नाही '" हे शब्द तो सांगत असतां त्याचे डोळे सारखे कुर्चीवर लागले होते नि त्याचा हात सावकाश नि हळूच खाली चार्ल-सच्या अगदीं तोंडाजवळ येत होता

चार्लसच्या हातांतील टांक खालीं पडला आणि त्यानें शून्यपणें आपल्या सभोंवार पाहिलें.

" कसला भपकारा आला आतां ? " त्यानें विचारलें.

" भपकारा ? "

" हं ! कांहीतरी असं वाफेसारखं माझ्या जवळून गेलं "

" मला तर कांहीं दिसलं नाहीं; इथे कुठची वाफबीफ येईल ? चल तो टांक उचल नि टांक सपवून. हं, चल आटप, लौकर लौकर ! "

स्मृतिभ्रंश झाल्यासारखा किंवा मस्तकांत कांहीं गोंधळ उडाल्यासारखा चार्लस मोठ्या कष्टानें आपलं लक्ष एकवटीत होता डोळ्यांवर झांपड आल्यासारखें त्यानें वर कार्टनकडे पाहिलें, त्याचा श्वास जरा जड येत होता कार्टननें निश्चलपणें त्याच्याकडे दृष्टि लावली, पण त्याचा हात मात्र अजून तसाच खिशांत होता.

" आटप, आटप लौकर ! "

चार्लसनें परत आपली मान खालीं कागदावर वळवली.

" ' पण तसं जर झालं नसतं, ' " — कार्टनचा हात परत मोठ्या सावधगिरीनें हळूहळू खालीं येत होता — " ' तर मी कांहींच करूं शकलों नसतों. तसं जर नसतं ' " — त्याचा हात आतां चार्लसच्या तोंडाजवळ आला — " ' तर माझ्यावरील जबाबदारी मात्र वाढली असती आणि तसं जर झालं नसतं — ' " कार्टननें खालीं टांकाकडे पाहिलें, तो टांक कांहींतरी अस्पष्टपणें खरडीत कागदावर फिरत होता

त्याचा हात आतां परत खिशाकडे गेला नाहीं त्याची जणुं काय आपल्या दृष्टीनेंच निर्भर्त्सना करीत डार्ने एकदम वर उठला, पण कार्टनचा हात त्याच्या नाकावर घट्ट दाबला गेला आणि डावा हात त्याच्या कमरेभोंवतीं लपेटला गेला. त्याच्यासाठीं स्वतःच्या प्राणांचा बळी द्यायला आलेल्या कार्टनजवळ चार्लसची निष्फळ धडपड क्षीणपणें चालू होती, पण दोन चार मिनिटांतच त्याचा संज्ञाशून्य देह खालीं जमिनीवर पसरला.

अतिशय चपळाईनें पण स्थिरचित्तानें कार्टननें डार्नेनें काढून ठेवलेले कपडे आपल्या अंगावर चढवले आणि आपले केस जरा नीट करून ते चार्लसच्या रिबननें चांगले आवरून बांधले. आणि मग बाहेर पहात त्यानें हळूच हांक मारली, " या हं आंत ! " आणि बारसाडनें आंत प्रवेश केला

" बघा आतां, कसं काय आहे ? " त्या मूर्छित व्यक्तीजवळ खालीं बसून त्याच्या खिशांत तो कागद ठेवीत कार्टन म्हणाला; " कांहीं नाहींना फार धोका ? "

" मि कार्टन," आपलीं बोट घाबरटपणें मोडीत बारसाड म्हणाला, "तुम्ही आपला शब्द पुरा पुरा पाळलात कीं, आजच्या या गडबडींत हें मला मुळींच धोक्याचं नाहीं "

" मुळींच भिऊ नको त्याबद्दल. मी मरेपर्यंत आपला शब्द खरा करीन "

" केलाच पाहिजे खरा मि. कार्टन, नाहींतर तो बावन्नावा आंकडा कसा पुरा व्हायचा ? या पोशाकात तुम्ही ही जागा भरून काढलींत की मग माझ्या जीवाला मुळींच धास्ती नाहीं."

" अगदीं निर्धास्त रहा तू ! थोडयाच वेळांत माझी थॉड नाहींशी होईल, आणि बाकीचे ते इथून किती तरी दूर गेलेले असतील, देवालाच यांची काळजी आता ! बर, आतां बोलाव कोणाला तरी नि हलव मला इथून "

" तुम्हाला ? " भेदरटपणें बारसाड म्हणाला.

" अरे म्हणजे त्याला, ज्याची जागा मी घेतली आहे त्याला मला ज्या रस्त्यानें आत आणलास त्याच रस्त्यानें तू बाहेर जाणार ना ? "

" अर्थातच."

" मला तू आंत आणलास तेव्हांच मी असा मरगळल्यासारखा, खचल्यासारखा होतों, आणि आतां असा बाहेर जातांना अधिकच खचून गेलों आहें मी. आमच्या या अखेरच्या भेटीनें मी असा पार ढामळून गेलों, बर का. असले प्रसंग इथें काहीं नवीन नाहींत तुझा जीव आता तुझ्याच हातांत आहे. आटप लौकर ! बोलाव कुणी मदतीला ! "

' अगदीं शपथपूर्वक माझा घात नाहीं ना करणार तुम्ही ? " भयानें कांपत, जातांना एक क्षणभर थांबून बारसाड म्हणाला

" अरे दगडा, आतां काय सांगू तुला कपाळ ! " आपला पाय आपटीत कार्टन म्हणाला. " अगदीं परमेश्वराची शपथ घेऊन नाहीं का तुला मी वचन दिलं ? मग आतां कां उगाच हा मोलाचा वेळ घालवतो आहेस बाबा ? उचल त्याला नि जा घेऊन पुढल्या चौकांत तूच त्या गाडात त्याला आपल्या हातांनीं ठेव. त्या लॉरींना सांग कीं मोकळया हवेशिवाय कांहींहि दुसर औषध त्याला देऊं नका, आणि माझे कालचे शब्द आणि त्यांचं वचन यांची त्याना नीट आठवण दे आणि म्हणावं, गाडी जोरसे पिटाळा ! "

बारसाड बाहेर पडला नि कार्टन खालीं टेबलाजवळ कपाळावर हात टेकून बसला. दोन सेकंदांतच दोन लोक घेऊन बारसाड आंत आला.

" कायहो? आपल्या दोस्ताला सेंट गिलोटिनच्या लॉटरींतल तिकीट मिळालेल पाहून इनके घायाळ झाले का हे गृहस्थ?" त्यांतला एक म्हणाला.

" असलं तिकीट त्यानें नसत पैदा केल तर आपल्याला बुवा यापेक्षां जास्त वाईट वाटल असत. " दुसरे बोलले.

त्या दोघानींहि तो मूर्च्छित देह वर उचलला आणि दाराबाहेर ठेवलेल्या डोलींत त्याला ठेवून ते उभे राहिले.

" वेळ झाली आहे बहुतेक एव्हरमॉंड,' सावधगिरीच्या स्वरांत बारसाड म्हणाला

" मला माहीत आहे." कार्टननें उत्तर दिलें " नीट काळजी घ्या माझ्या त्या दोस्ताची मेहेरबानी करून, आणि जा तुम्ही. "

" चला रे तर पठ्ठ्यानों, उचला ती डोली नि चला इथून ! "

दार बंद झाल नि कार्टन एकटाच मागें खोलींत राहिला. बाहेरून ऐकू येणारा प्रत्येक आवाज तो अतिशय काळजीपूर्वक नि सावधगिरीने ऐकत होता. कांहीं धोका तर नाहा ना कुठें नाहीं, कुठेंच नहीं. कुलुप उघडल्याचा, दार उघडून बंद झाल्याचा आणि तिकडे रस्त्यानें दूर दूर जात असलेल्या पायांचा आवाज त्याच्या कानावर येत होता कसलीहि गडबड, ओरडा कुठें चालल्याचं चिन्ह नव्हत सर्व कांहीं नेहमींसारख चालल असल्याप्रमाणें ऐकू येत होत. मनाला मग थोडा धीर येऊन त्यानें मुक्ततेचा श्वास टाकला आणि खालीं बसून त्यानें परत बाहेर कान लावले. घड्याळात दोहोंचा ठोका पडला

बाहेर त्याच्या दिशेनें होत असलेला पाऊलाचा आवाज त्याला आतां नीट ऐकू येऊ लागला पण त्यांचा अर्थ त्याला चांगला माहीत होता नि त्यांची भीति त्याला वाटत नव्हती. दारं धडाधड उघडत होतीं त्याच्या खोलीचहि दार उघडल. हातात यादी घेतलेला एक जेलर आंत डोकावून म्हणाला, " माझ्यामागून या एव्हरमॉंड !" — आणि त्याच्यामागून जात त्यानें एका मोठ्या अंधाऱ्या जागेंत प्रवेश केला दिवस हिंवाळ्याचे होते, बाहेर आकाश अभ्राच्छादित होत नि सूर्यप्रकाश स्वच्छ नव्हता. आंत खोलींतहि त्यामुळें आणि आंत असलेल्या लोकांच्या गर्दीनें अंधार जास्त वाटत होता. सभोंवारचे चेहेरे

नीटसे ओळखू येत नव्हते. त्या सर्वांचे हात आतां पाठीमागें बांधले जात होते. त्यांतले कांही उभे तर कांही खालीं बसले होते आणि काहीं अस्वस्थपणें चुळ-बूळ करीत आपल्या दैवाला बोल लावीत होते पण हे असले रड्ये तेथें थोडेच होते बहुसख्य कैदी अगदीं शातपणें नि स्तब्धपणें खाली पहात उभे होते.

एका अधाऱ्या कोपऱ्यांत तो उभा होता. अधिक कैदी अजून आंत येतच होते आंत येत असलेल्यांतल्या कोणीतरी त्याला दृढालिंगन दिलें, आणि आपल गुपित फुटत कीं काय या भीतीनें त्याच्या हृदयाचा थरकांप झाला, पण ती व्यक्ति न थांबतां तशीच पुढें गेली. त्याच्या मागोमागच एक पोरगेली, उभार बांध्याची, फिकट पण मोठ्या गोंडस चेहेऱ्याची आणि शात स्निग्ध, विशाल नील डोळे असलेली एक तरुणी आपल्या बसल्या जागेवरुन उठून त्याच्याकडे आली.

" सिटिझन एव्हरमॉड, " आपल्या थडगार हातानें त्याला स्पर्श करून ती म्हणाली " तुमच्याबरोबरच ला फोर्सच्या तुरुगात आलेली मी एक गरीब शिंपीण आहें. "

" खर ? पण तुमच्यावरचा आरोप काय बर होता ? " तो उत्तरादाखल पुटपुटला.

" कट ! पण तो न्यायी, सर्व साक्षी परमेश्वरच साक्ष, मला कसलाच कट माहीत नाहीं. शक्य तरी आहे का तें ? माझ्यासारख्या दुबळ्या बाईजवळ कोण कसला कट करणार ? "

हें बोलताना तिच्या त्या अनाथ, दीन चेहेऱ्यावरील भकास हास्य पाहून त्याच अत करण कळवळून त्याच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले.

" मला मरणाची नाहीं भीति वाटत, एव्हरमॉड, पण मी कांहींच केलं नाहीं हो ! तरीहि माझ्या या मृत्यूनें आमच्यासारख्या गरीबांच कल्याण करण्यासाठीं अवतरलेल्या या लोकराज्याचा जर फायदा होत असेल, तर मर-णाला माझी खुषीने तयारी आहे, पण फायदा कसला तेंच मला कळत नाहीं मुळीं, सिटिझन एव्हरमॉड. एक गरीब दुबळी बाईमाणूस मी ! "

या जगांत सहानुभूतीनें त्याच हृदय आतां अखेरचच विरघळत होतं आणि अतिशय पवित्र आपुलकीनें त्याच हृदय तिच्याकडे ओढल जाऊन तिच्या दु:खाशीं समरस होत होत.

" तुमची सुटका झाली अस ऐकल नि किती बर वाटल होत मला ! "

" पण काल परत अटक होऊन इथे फेकला गेलों मी "

" तुमच्याबरोबरच जर मी असल्यें तर माझा हात धराल तुम्हीं, एव्हर-मॉड ? मरणाला मी भीत नाहीं, पण मी ही अशी अशक्त आणि तेवढाच अधिक धीर येईल मला त्यानें "

ते शांत स्निग्ध डोळे वर आतां त्याच्याकडे लागले एक क्षणभरच त्याला ते बावरल्यासारखे नि मग चकित झाल्यासारखे दिसले त्यानें तिचा तो क्षीण, झिजलेला हात उचलून आपल्या ओठावर टेकला

" तुम्ही देणार आपला बळी त्यांच्यासाठीं ? " ती हळूच कुजबुजली.

" — आणि त्यांच्या पत्नीसाठीं नि छोकरीसाठी ! पण गुपचूप, अगदीं आळीमिळी ! बो . . च नाहीं हा "

" तुमचा तो धाडसी शूर हात मला वरू द्याल, पाहुणे ? "

" शू ! हळू हळू, देईन वर, माझे बाई, अगदीं अखेरपर्यंत ! "

* * *

— तुरुंगाच्या त्या भीषण आवारावर पसरत असलेल्या त्याच सायतन छाया पॅरिसच्या प्रवेशद्वाराच्या परिसरावर आता पसरल्या होत्या आणि तपासणी-साठीं ती चौघाकी त्या बद लोहद्वाराजवळ येऊन उभी राहिली होती

" कोण आहे गाडीत ? परवाने आणा ! "

कागद बाहेर येऊन काळजीपूर्वक तपासले गेले

" अलेक्झॅंडर मॅनेट — डॉक्टर — फ्रेंच — कुठले ते ? "

" हे वृद्ध, हतबल, आपल्याशींच काहींतरी अस्पष्ट पुटपुटत असलेले गृहस्थ." — डॉक्टर दाखवले गेले

" डोकं ताळ्यावर नाहीं दिसत सिटिझन डॉक्टरांच ? क्रांतीचा ताप फण-फणलेला दिसतो आहे आंगांत ! "

" फारच झाला आहे परिणाम "

" हं हं ! पुष्कळांवर होतो असा ल्यूसी — त्याची कन्या — फ्रेंच. बर; कोणती ती ? "

" ही ती, त्यांची कन्या. "

" अस दिसत खर. ल्यूसी एव्हरमॉडची पत्नी, नव्हे ? "

" होय, बरोबर. "

" हं ह ! एव्हरमॉडच ठिकाण वेगळ ठरल आहे नाहीं का ! आणि ल्यूसी — तिची कन्या — इंग्लिश कुठची ? "

" हीच कीं, दुसरी कोण ! "

" पापी दे बाळ मला आतां तू एका पाक माणसाला पापी दिली आहेस, बरं का, तुझ्या कुटुंबांत नवीनच आहे तें, लक्षांत ठेव नीट ! आतां सिडने कार्टन — ॲडव्होकेट — इंग्लिश ते कोणते ? "

" हे, गाडींतल्या या कोपऱ्यांत निजलेले "

" ॲडव्होकेट साहेब मूर्छित पडलेले दिसतात ? "

" आतां मोकळ्या हवेवर येतील शुद्धीवर लौकर त्यांची प्रकृति नीट नव्हती आणि आत्तांच आपल्या एका जिवलग स्नेह्याला भेटून आले आहेत ते. आत्तांच तो फाशी जायचा आहे. "

" एवढच ? हात्त्यारे ! असे कित्येक चालले आहेत रोज बर, जार्व्हिस लॉरी — बँकर — इंग्लिश आणि हे कोणते ? "

" मी तो. आतां मीच उरलों कीं शिल्लक ! "

गाडीखालीं उतरून आत्तांपर्यंतच्या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीच दिलीं होतीं. नाक्यावरच्या अमलदारानीं आतां गाडीची आंतून बाहेरून कसून तपासणी केली, सामानहि तपासलें आणि ते खालीं उतरले. सभोंवार तमासगीराचा बराच घोळका गर्दी करून उभा होता आणि बुभुक्षित नजरेनें ते सारे आंत गाडींतले चेहेरे न्याहाळून पहात होते एका बाईनें तर आपली मुलगी उच धरून तिचा हात ल्यूसीच्या आंगाला लाऊन पवित्र केला, कारण फांशी जाणाऱ्या एका उमरावाची ती पत्नी होती.

" हे घ्या तुमचे कागद जार्व्हिस लॉरी, आमच्या सह्या झाल्या त्यावर. "

" आम्ही जाऊ तर सिटिझन ? "

" होय, खुशाल पिटाळ रे बाबा गाडी ! तुमचा प्रवास सुखाचा होवो — सिटिझन ! "

" गुड बाय सिटिझन — पहिला धोका तर सपला ! " लॉरी उद्गारले. त्यांची दृष्टि पुढे लागली होती. कुणाच्या तरी डोळ्यांतून अश्रु पाझरत होते नि हृदय

भीतीनें धडधडत होत, आणि कुणातरी मूर्च्छित व्यक्तीचा श्वास जडपणें येत होता.

" अधिक जोरानें नाहीं का घोडे पिटाळतां येणार ? किती हळू चालले आहेत हे ?" अधीर हृदयानें लॉरीचा हात पकडून ल्यूसी म्हणत होती

"सुरक्षित नाहीं तें माझे बाई; आपण पळून जात आहोंत असं वाटेल लोकांना त्यामुळें. अशी कुणाला शकाहि नाहीं येतां उपयोगाची ल्यूसी "

" पण मागें पहा, मागें पहा आपल्या. आपला पाठलाग नाहीं ना कोणीं करीत, लॉरी ?"

" अशी भिऊ नको, बाळ, रस्ता अगदीं पूर्ण मोकळा दिसतो आहे आपला. अजून नाहीं कोणी आपल्या पाठीवर."

घरामागून घर मागें पडत होती आणि मागें पडणाऱ्या त्या लांबच लांब शेत जमिनीची नि झाडाझुडपांची एकच एक अखड, अत्रुटित ओळ सारखी मागें पडत चालली होती घोडे चिखल मातींतून, दगडधोंड्यांतून गाडी ओढीत पुढे दौडत होते मधें जरा कुठे खुट्ट झाल कीं सर्वांची हृदय भीतीनें जशीं कांहीं क्षण बद पडत होतीं. आतां त्या धांवत्या गाडीतून खाली उडी टाकून असच पळत पळत कुठे तरी जाऊन दडाव, असाहि त्या भयभीत हृदयांना क्षणभर वाटे इतकी भीतीची प्रचड पकड त्या सर्वांच्या अतरगावर पसरली होती. कांहींहि करा — कुठेंहि जा, कसेहि दौडा पण थांबू नका, एवढा एकच मंत्र ते सर्व जीव त्या धावत्या गाडींत सारखा जपत होते नि परमेश्वराचा धांवा करीत होते

पण आतां ही पडक्या, मोडक्या घरांची नि कारखान्यांची गर्दी आपल्या-भोंवतीं परत कां वाढते आहे फसवल तर नाहींना आपल्याला या लोकांनीं? दुसऱ्याच रस्त्यानें मागें फिरून आपल्याला ते परत मागें घेऊन तर जात नाहीं ना ? हींच घर आपण मागें एकदां पाहिली होतीं नव्हे ? नाहीं, देव तुमचं भल करो ! चाललों आहोंत आपण पुढें हे पहा आल आणखीं एक खेडं. पहा, पण नीट मागें पहा, नाहीना — नाहींना नक्की आपल्या मागें कुणी येत ? चूप ! बोलू नका जरा. तें पहा पोस्ट हाऊस !

गाडीचे घोडे सावकाश सावकाश आतां सुटत आहेत कोचमन अगदीं सथपणें इकडे तिकडे पहात हिंडतो आहे. पण ते नवीन घोडे कुठे आहेत ?

बांधा बांधा, लोकर आणून बांधा त्यांना. काय ही दिरगाई ! — आणि आतां हिशेब करीत बसून हे वेळ मोडणार का आपला ? कांहींच कस समजत नाहीं यांना ! त्या प्रवाशांच्या मनांतील असल्या विचारांच्या घोडदौडीत ते गाडीघोडे तरी किती वेळ टिकले असते ?

पण अखेरीस घोडे तर जुपले गेले, गाडी परत पुढें दौडू लागली नि प्रवाशांची आशाळभूत मनेंहि त्याहून अधिक वेगानें इंग्लंडच्या दिशेनें दौडू लागली गावामागून गांव मागें पडत चालल होत, टेंकड्यांचे चढउतार होत होते नि नद्यानाले सावकाश सावकाश ओलांडले जात होते पण हा ओरडा कसला नि गाडी ही अशी एकदम खडी कां होते आहे ? आपला पाठलाग होतो आहे !

" कोण आहे गाडीत ? बोला ! "

" काय आहे ?" लॉर्डीनीं बाहेर पहात विचारलें.

" किती, एकदर किती ?"

" नाहीं, समजलों नाहीं मी "

" आज बळी किती ?"

" बावन्न."

" आम्ही म्हटलच तस. ठीक, छान — छान आहे ह आंकडा ! हा म्हणत होता बेचाळीस; अहो म्हणजे दहा कमी वा, वा — सुंदर चालल आहे गिलो-टीनच काम ! जाऊ द्या, जाऊ द्या, कोचमनसाहेब. चलो ! '

रात्रीचा अधार सभोंवार पसरत होता ती मूर्च्छित व्यक्ति आतां जरा हालचाल करीत होती, तिचा श्वास आता सुरळीत सथपणें चालू झाला होता आणि तिचे ओंठ कांहीं तरी पुटपुटत होते तो शुद्धीवर येत होता नि आपण कुठे आहोत आणि कार्टन कुठे आहे म्हणून तो विचारांत होता परमेश्वरा — परमेश्वरा, आतां तुलाच आमची लाज ! पहा — पहा नीट मागें पहा, नाहीं ना कुणी आपल्या मागें येत ?

सभोंवार वारा सुसाट वाहात घोघावतो आहे, वर आकाशांत लहानमोठे, काळे भुरके मेघखड अहमहमिकेनें एकमेकांना मागें टाकीत पुढे पळत सुटले आहेत, चद्राची गोरीमोरी कोरहि जशी पळत पळत आमच्या मागें धांवते

आहे, आणि ही मारी भयाण रात्र एखाद्या काळ सर्पिणीसारखी आमचा पाठलाग करते आहे, पण या व्यतिरिक्त अजून दुसरं कुणीच आमच्यामागून पिसाटासारखं पळत येत नाहीं आहे आमची चोचाकी निर्धास्तपणें इंग्लंडच्या रोखानें न थांबतां सारखी दौडते आहे

# १४

तिकडे कार्टन डार्नेची मुलाखत संपत असता इकडे सेंट अँटॉइनमध्ये मॅडम डेफार्ज, काली नि जॅकस तीन यांची गुप्त मजलस चालू होती दुकानाच्याजवळ ही मजलस भरवण इष्ट नसल्यानें त्याजानजीकच्या त्या अरकशी दुकानांत त्या अरकशाला दारावर पहारा करीत उभा ठेवून तीं यांनी मजलस त्या वेळीं चालली होती

"पण डेफार्ज मारख्या कट्टा सिटिझन, काय म्हणतो!" जॅकस तीन बोलत होता.

'दुसरा त्यांच्या इतका कडवा शिपाई साऱ्या फ्रान्समध्ये सुद्धां नाहीं सांपडणार," कालीची कर्कश पिपाणी किंचाळली

"ए बया, जरा गप्प बस पाहू," कपाळाला किंचित् आठ्या चढवून नि कालीच्या तोंडावर हात ठेवून मॅडम डेफार्ज म्हणाली "मी काय म्हणतें ते ऐक जरा माझे यजमान लोकराज्याचे कडवे अभिमानी आहेत यांत शंका नाहीं, त्यांचं धैर्यहि बेडर आहे. लोकराज्याची त्यांनी सेवा पण अमोल केली आहे. जनतेचा त्यांच्यावर पूर्ण विश्वासहि आहे पण त्यांच्यांत एक दोष आहे, नि दुसरं, त्यांना डाक्टराविषयीं कांहीं भलतं प्रेम आहे"

"अहं, अहं, हें मात्र नाहीं चांगलं पण." मान हलवीत जॅकस म्हणाला

"पण हें पहा, मला त्या डॉक्टराविषयीं कांहींच वाटत नाहीं तो जगला काय नि मेला काय, दोन्हीहि मला सारखींच आहेत त्याचं कसलंच सोहेर सुतक नाहीं मला पण ही एव्हरमॉंड अवलाद मात्र या जगांतून पार नाहींशीच झाली पाहिजे. ती बायको नि ती त्याची पोरसुद्धां गेली पाहिजेत त्याच्या मागोमाग"

" वा ! सुंदर आहे ह कल्पना तुमची. गिलोटीनच्या त्या चौकटींत मोठ सुंदर — अगदीं गोड दिसेल तें दृश्य ते निळे निळे डोळे नि ते रसरशीत सोन्या-सारखे केस ! " जॅकस घूत्कारला.

मॅडम डेफार्ज खालीं पहात विचार करीत होती

" आणि त्या छोकरीचेहि तसेच निळे निळे डोळे नि सोनेरी केस आहेत. मोठ सुंदर गोड दिसेल तें, असा कोवळा लुसलुशीत घास नसेल मिळाला गिलो-टीनला पुष्कळ दिवसात ! " जॅकसनें घूत्कार केला

" म्हणजे काय, " आपल्या विचारसमाधींतून जागी होऊन मॅडम बोलत होती " याबाबत त्यांच्यावर विश्वास टाकून नाहीं चालायच. काल रात्रीपासून मला सारख वाटत आहे की, आपल्या या बेतांचा सुगावा त्याना तर मुळींच लागतां कामा नाही कारण त्यांना सावध करून पळून जाण्यांत मदत करायला सुद्धां ते नाही कमी करणार "

" छट् ! तें तर कधींच नाहीं होतां कामा एकहि सावज नाही निसटतां कामा आपल्या हातून फारच थडाईनं चालल आहे नाहीं तरी आपल काम. अहो रोज शभरी तर खरी ! " परत एकदां जॅकसचा घूत्कार झाला

" म्हणजे त्यांची नि माझी दृष्टि या बाबतींत अगदीं भिन्न आहे त्यांच्या-सारख मला कांहीं डॉक्टरांबद्दल काडीचेहि प्रेम नाहीं. हें माझ काम मीच उरकल पाहिजे इकडे ये जरा पाहू सिटिझन "

आपल्या लाल टोपीला हात लावीत तो अरकशी आत आला तो भेदर-ल्यासारखा मॅडमकडे सारखा पहात होता तिच्या पहिल्या दृष्टिक्षेपानें त्याच्या हृदयांत भरलेली धडकी अजूनहि कमी झाली नव्हती. अजूनहि मॅडमच्या सान्निध्यांत त्याला अतिशय अस्वस्थ वाटे.

" काय रे, ती बया रोज त्याला खाणाखुणा करी म्हणून साक्ष देशील कीं नाहीं आज, मी सांगेन तेव्हां ? " मॅडमनें कठोरपणें त्याला विचारलें

" अलबत — अलबत, का नाहीं देणार ! चांगली रोज मी आपल्या डोळ्यानीं पाहिली आहे तिला, मग काय ? जें पाहिल तें पाहिलच आहे मी ! " नेहमीं-सारखे हातवारे करीत तो म्हणाला.

' कट ! — अगदीं चक्क कट ! दुसर काय ? " जॅकसचा आवाज आला.

" आणि तुमची ती ज्यूरी ? " कांहींशा खिन्नपणें हसत मॅडमनें विचारलें.

"त्याची नको हो तुम्हाला काळजी, तें माझ्याकडे लागल, सिटिझनेस."

' थांबा ह, मला फिरून एकदां विचार करून पाहू दे '" पुन्हा एकदां विचारमग्न होत मॅडम म्हणाली. ' त्यान्यासाठीं वाचवाव का डॉक्टराना ? मला तशीं ते हीहि भारर्यीच. वाचवाव का त्यांना ?"

' अहो पण एक मुडी कमी होईल कीं; अ ह, तें नाही बर ' " जॅकसनें मुंडी हलवात शेरा मारला

" डॉक्टरनां पण तिच्याबरोबर खुणा करतांना मी पाहिल आहे तिच्या-बरोबर त्याचहि नांव गुतल आहे. नि हें काम याच्या एकट्याच्य आंगावर सोंपवून नाहीं चालणार. माझीहि मात्र झालीच पाहिजे नि माझी मात्र म्हणजे अशी नर्शी नाही ' " मॅडम म्हणाली

काली नि जॅकस तीन मग आपल्या माना हलवीत, हे हे ' करीत नि अहो, तुम्ही त्या तुम्ही, तुमची सर कुणाला येणार, अस सारख म्हणत तिला चढवीत होते आणि ते अरकशी बोवाहि त्याला आपला हातभार लावीत होते.

' पाहू पाहू काय होईल तें अ ह नाहीं पण, तेहि नाहीच सुटता कामा ! तुलाहि जायच असेल ना तिथें ? मलाहि जायचच आहे म्हणा बर तर, तें सार आटोपल का असा आठला ये रात्री माझ्या इथे नि मग देऊ आपण त्यांची वर्दी " त्या अरकशाकडे पहात मॅडम म्हणाली, नि त्या दृष्टिक्षेपानें तो बिचारा गांगरून जाऊन निथून बाहेर निघून गेला त्या त्रिमूर्तींची बैठक मग परत पुढें चालू झाली

" आतां या वेळीं ती घरींच सापडेल, नि त्याच्या मृत्यूबद्दल रडत ओरडतच बसलेली असेल ती आणि आपल्या मनात त्या कोर्टावर नि ज्यूरीवर सपाटून चिडली पण असेल ती आताच कांहीं तरी बेसावधपणें ती बरळण शक्य आहे की बस, एकदम राजद्रोह ! ही अशी आत्तांच जातें मी तिकडे." आपल्या मनांतील विचार मॅडमनें सांगितले

" शाबास, शाबास ! याला म्हणतात डोक धन्य, धन्य आहे तुमची, मॅडम ! " जॅकसनें अत्यानदाने धन्योद्गार काढले, आणि तिकडे तिला घट्ट मिठी मारीत काली किंचाळली " आहेच तशी माझी सोनतुकडी ! "

" माझ हें विणकाम घे तुझ्याबरोबर, " तिच्या हातांत सुया देत मॅडम म्हणाली. " नि राखून ठेव माझी जागा नीट रोजच्यासारखी. खूपच गर्दी उडेल

आज बहुधा तिथे, मला वाटत. गुरुवातीच्या वेळे पात्रतो येतेच मी म्हण', उशीर नाहीं लागायचा मला ''

दुकानांतून तडक बाहेर पडून तुरुंगाला वळसा घालून रस्त्यावरील चिखल तुडवीत ती सपाट्यानें निघाली होती तिच्या त चालण्याचें अवसान नि तोंडा-वरील ताठर गांभीर्य कोणालाहि अस्वस्थ करण्यास पुरेस होत क्रांतिकालानें आपला भेसूर हात फिरवून किती तरी साध्याभोळ्या स्त्रीजीवाच क्रूर राक्षसिणीत रूपांतर केल होत त्या कठोर कलाकाराच्या कलमाच्या अचूक फटकाऱ्यांनी आपल रूप कायमच पालटून कितीतरी कोमल गृहदेवी डाकिनीच्या विक्राळ स्वरूपात आतां नाचत होत्या. पण मॅडम डेफार्जच्या तोडीची एकहि क्रूर कद-शीण अजून दुसरी म्हणून पैदा झाली नव्हती क्रौर्यात आज स्त्रीसमुदायांत तरी निदान ती केवळ अजोड अशीच होती येडर छाती, चोकस, चारग बुद्धि बुद्धिमत्ता, दांडग प्रभगावधान नि कठोर निश्चय या आपल्या गुणाच्या जोरावर त्या अराजक काळांत कशाहि परिस्थितींत ती पहिल्या रांकेंत येऊन उभी न राहण, केवळ अशक्य होत आणि आता तर, लहानपणापासून तिच्या अतरगांत सतत धुमसत असलेलो सूडाग्नि नि येथून तेथून साऱ्या धनवानांचा, अगदी हाडीमासीं खिळलेला दुर्दम्य द्वेष, योनीं तर ती मूर्तिमत वाघिणीसारखीच चालतीबोलती क्रौर्यमूर्ति बनली होती, आणि दया ही चीज औषधालासुद्धा आतां तिच्या हृदयांत शिल्लक उरली नव्हती

अशा स्थितींत, एक निरपराधी जीव केवळ आपल्या वाडवडीलांच्या दुष्कृत्यांमुळें बळी जात होता, याचं तिला काही वाटणच शक्य नव्हत. तिच्या डोळ्याना एक फक्त त्याचे ते पूर्वजमात्र दिसत होते, तो मुळी तिला दिसतच नव्हता त्याच्या पत्नीच्या कपाळींच कुंकू हें पुसलच पाहिजे नि त्याची तं पोरगीहि पोरकी झालीच पाहिजे पण ही शिक्षा अगदींच अपुरी, तेवढ्यावरच थांबून नाहीं चालणार ' जगांतुन तीपण पार नाहींशी होऊन त्याचा निर्वंश झालाच पाहिजे तिच्या स्वत बद्दलसुद्धां तिला दया वाटण शक्य नव्हत; आपली स्वत चीहि कींव तिला आली नसती आता अशी रस्त्यातच प्राणार्पण करतांना स्वत चा विचार तिच्या मनाला शिवला नसता मग इतरांची तर कथा काय !

असल्या कठोर निश्चयानें ती आतां डॉक्टराच्या घराची वाट चालत होती

आगावर एक जाडाभरडा झगा तिनें कसाबसा चढवला होता नि तिचा काळा विपुल केशभार त्या घस्मर लाल टोपीच्या आत कसा तरी कोंबला होता. छातीजवळ एक भरलेलं पिस्तुल लपविलेलं, आणि कमरबदांत एक तीक्ष्ण खंजीर तसाच लपवलेला, अशी मान ताठ ठेवून आत्मविश्वासानें रस्त्यावरून दाठर पण डौलदार पावलें टाकीत ती चालली होती.

* * *

इकडे पॅरिस सोडून जाण्याची तयारी चालू असता मिस प्रॉस आणि इतर सामान याना आपल्याच गाडीतून न्यावं कीं दुसऱ्या गाडींतून, याचा लॉरींच्या मनात मोठा गोंधळ उडाला होता एकाच गाडींत सर्व माणसं कोंबून गाडी अवजड करून तिची गति मंदावणं इष्ट नव्हतं शिवाय परवाने तपासणीच्या वेळी अधिक वेळ मोडणं हेंहि पण इष्ट आहे, असं लॉरींना वाटत नव्हतं त्या-पेक्षां आपल्या गाडींतलं ओझं कमी करून नि प्रवेशद्वाराशीं शक्य तितका कमी वेळ मोडण्याची काळजी घेऊन काय मिळतील ते चारदोन क्षणसुद्धां आपल्याला या घातक ठिकाणापासून जरा दूर जायला उपयोगीं पडतील, अशा विचारानें मिस प्रॉस नि जेरी यानीं एका वेगळ्या लहान हलक्या गाडींतून पॅरीसच्या बाहेर पडावं असं त्यानीं ठरविलं आणि त्यांना परवान्याची पण आवश्यकता नसल्यानें त्यांची वाटेंत तशी खोटींहि होणार नव्हती. त्यानीं सर्वांच्या मागून बाहेर पडावं नि बरोबर कांहीं ओझं नसल्यानें शक्य तितक्या झपाट्यानें आपल्या गाडीला मागें टाकून, पुढल्या प्रत्येक टप्प्यावर घोडे बदलण्याची व्यवस्था करीत पुढें जावं कारण रात्रीच्या वेळीत तेवढीसुद्धां वाटेंत खोटी होणं इष्ट नव्हतं

लॉरींची ही कल्पना मिस प्रॉसला अतिशय पसंत पडली होती कारण, आपल्या पोरीसाठींच नव्हती का ती हें सारं करणार ? मिस प्रॉस नि जेरी या दोघानींहि मग ती चौचाकी तुरुंगाजवळून पुढें निघून जातांना पाहिली होती; बारसाडनें आंत आणून कोणाला ठेवलं हेंहि त्यानीं पाहिलं होतं आणि छाती भयानें धडधडत असतां परमेश्वराचा कळवळून धांवा करीत दोघहि तिथें कांहीं वेळ उभीं राहून, आतां आपण बाहेर कसं पडायचं याचा विचार करीत होतीं. त्याच वेळी मॅडम डेफार्जची स्वारी त्यांच्या घराच्या दिशेनें वाट चालत झपा-ट्यानें निघाली होती.

" आतां आपण या घरांतून बाहेर न पडतां जर दुसऱ्या कुठून बाहेर पडलों तर कस मि. जेरी ? उगीच सशयाला कारणीभूत होईल मला वाटत ते. त्या पेक्षां मला वाटत, तुम्ही जरा पुढे व्हा आणि गाडी इथें न आणतां दुसऱ्या कुठें तरी माझी वाट पहात उभे रहा कशी काय पटते माझी कल्पना ?

" तें काही आपल्याला समजत नाही बुवा मिस प्रॅास मला एकच समजत. तुम्ही काय सांगाल तें ततोतंत ऐकायच तुम्ही फक्त सांगा, कीं असं असं कर म्हणून, का केलंच तसं बस्स दुसर तिसर कांही नाही ' "

" बर तर तसच गाडी इथें नाही आणायची पण कुठें उभे थांबाल तुम्ही ? ' मिस प्रॅास म्हणाली

पण जेरीच्या डोक्यात एक टेंपलबारशिवाय दुसर मुळी नावच नव्हत, त्याला तो तरी काय करणार ? आणि टेंपलबार तर तिथून शेंकडो मैल दूर होता, आणि मॅडम डेफार्जची पावल तर सारखी जवळ जवळ येत होतीं

' त्या प्रार्थनामंदिराजवळ उभ रहाव मला वाटतं तुम्ही, हो तसं ठ. ज नर तस जाऊन कळवा पोस्टहाउसमध्यें "

" पण तुम्हाला एकट्या सोडून कसा जाऊ मी, मिस प्रॅास कधी काय घडेल याचा कांहीं नियम आहे आजच्या दिवसात ? "

" तस खर, पण माझी नको तुम्हाला काळजी तीन वाजता येतेंच मी तिथें बरोबर, हेंच वर दिसत आहे मला — बस ठरल ' आता माझा नको विचार करूं जेरी, पण आपल्यावर अवलंबून असलेल्या त्या जीवाचा कर विचार, जा ' "

मिस प्रॅासची अखेरची ही विनति आणि तिच्या अन्तःकरणातली डोळ्यावाटे दिसत असलेली तळमळ पाहुन त्याच्याकडे मान हलवुन पहात पहात त्यान धीर देत अखेरीस जेरी आपल्या कामगिरीवर बाहेर पडला

आता काय राहिल. आता आपणहि असं घाबरल्यासारखं नि अस्तव्यस्त नाहीं दिसता उपयोगी, नाहीं ? मिस प्रॅासच्या मनात आल आपले हे डोळे व तोंड नीट धुतलींच पाहिजेत नाहींतर आपल्याकडे उगीचच लक्ष वेधायच लोकाच आणि आता हे दोन वाजून गेले वाटत चला चला, आटपा लौकर, आपल्याशींच ती विचार करीत नि सभोंवारच्या आता उदास दिसणाऱ्या दार खिडक्यांतून कुणी डोकाऊन पहात नाही ना, अशी कल्पन वारवार मनांत

येऊन भयभीतपणें दाराकडे पहात, पुढें घेतलेल्या पाण्याचे हपके ती आतां आपल्या तोंडावर नि डोळ्यावर मारीत होती. म्हणूनच एक दोन क्षण थांबून ती भोंवतीं पहात राही नि मग परत आपलें काम सुरू करी. हा असा कार्यक्रम चालू असतांनाच खोलींत कोणीतरी उभें असल्याचें पाहून दचकून थोडी मागें सरत ती मोठ्यानें ओरडली. तिच्या हातातलें भांडें खालीं पडलें नि आंतील पाणी मॅडम डेफार्जच्या अनेक वेळां रक्तानें भिजलेल्या पायाखालीं गेलें. मॅडम डेफार्जनें तिच्याकडे एकदां निष्काळजीपणें पाहून थंडपणें विचारलें, "एव्हरमॉंडची बायको कुठे आहे?"

हीं सारीं दारं अशीं सताड उघडीं पाहून या बयेला भलतीच शंका येईल असं एकदम मनांत येऊन मिस प्रॉसनें आधीं तीं सारीं दारें बंद केलीं आणि मग ती ल्यूसीच्या खोलीच्या दारापुढें उभी राहिली. तिच्या प्रत्येक हालचालीबरोबर फिरत असलेले मॅडम डेफार्जचे काळे, गूढ, ताठर डोळे आतां तिच्या चेहेऱ्याकडे स्थिरपणें लागले होते. वाढत्या वयामुळें मिस प्रॉसच्या चेहेऱ्यावरील उग्रपणा नि राकटपणा तिळमात्रहि कमी झाला नव्हता. तीहि पण आपल्या समोरच्यांइतकीच निश्चयी नि ताठर वृत्तीची होती. आणि म्हणून आतां मॅडम डेफार्जच्या मूर्तीचें आपादमस्तक निरीक्षण करीत ती निश्चल उभी होती.

'आप याला स्वतःला अगदीं यमराजाचीच अर्धांगी समजत असशील तू, पण ऊॅं असेल माझ्यापुढें नाहीं लटपट चालायची तुझी.' आपल्याशींच ती पुटपुटली.

मॅडम डेफार्जनें तिच्याकडे एकदां तिरस्कारानें पाहिलें. पण तिलाहि दिसलंच कीं ही पण आपल्यासारखीच अगदीं जीवावर उदार झाली आहे. किती तरी वर्षांपूर्वी लॉरीच्या दृष्टीस पडलेली ती ताठर, राकट, एकाद्या पोलादी कांबीसारखी मिस प्रॉस, आतां तिला आपल्यापुढें उभी असलेली दिसत होती. या कुटुंबाची ती एकनिष्ठ सेवक नि मित्र होती हें मॅडमला माहीत होतें: आणि त्याच कुटुंबाची ती दीर्घद्वेषी, दुष्टबुद्धि शत्रु आहे, हें मिस प्रॉसनाहि माहीत होतें.

"तिकडेच जात असतां — माझी जागा राखलेलीच आहे तिथें — जरा त्याच्या पत्नीची ख्यालीखुशाली घ्यावी म्हणून आलें आहें मी. मला भेटायचं आहे तिला."

"तुझे दुष्ट हेतु मलाहि माहीत आहेत, मी नाहीं ते साधू देणार," मिस प्रॉस म्हणाली.

दोघीनाहि एकमेकींची भापा कळत नव्हती. पण अतिशय जागरूकपणें एक-मेकींच्या हृतवाऱ्यांवरून नि चेहेऱ्यावरून त्याना एकमेकींचा आशय कळत होता.

"अस लपून रहायच कांही कारण नाहीं त्याचा अर्थ माझ्या सारख्या सच्चा सिटिझनला समजतो मी आलें आहे म्हणून साग कां ऐकायला येत आहे का ?" मॅडम म्हणाली

"एवढे डोळे फाडून पहाण्याचा काऽऽहीं उपयोग नाहीं मी कांहीं मेणाची बाहुली नाहीं आहें, विरून जायला, बर का बायजाबाई !"

मॅडम डेफार्जला जरी सारा अर्थ कळला नाही तरी आपल्याला ही जुमानीत नाहीं एवढ तिला समजल

"ए म्हशी ! तुला नाहीं कोणी विचारल मला तिला भेटायच आहे जा तिला जाऊन साग, नाहीतर मला जाऊ दे तिकडे समजल का, ए ' आपला उजवा हात फलकारीत रागानें मॅडम म्हणाली

दोघीहि तशाच एकमेकींकडे ताबारलेल्या डोळ्यांनी पहात कांही वेळ उभ्या होत्या दोघींनीहि आपली जागा अजूनपर्यंत एक तसूनेंहि हलवली नव्हती. पण आतां मॅडम डेफार्जेने आपलें पाऊल उचललें

"हें पहा, मी अस्सल इग्लिश आहे," मिस प्रॉस म्हणाली "माझ्या जीवाची मला मुळीच फिकिर नाही आहे जितका वेळ तुला मी अशी इथे अड-वून धरीन तेवढाच माझ्या त्या पोरीला, अधिक वेळ मिळेल, बर का बया. तुझ्या त्या डोक्यावरची एक झिपरी पण नाहीं उरू द्यायची मी, माझ्या अंगावर आलीस तर !"

तिचे डोळे रागानें जसे पेटले होते, प्रत्येक शब्दागणिक तिची मान हिसके देत होती आणि श्वास घेतच जशी कांही ती बोलत होती. आणि साऱ्या जन्मांत तिनें जरी कधी कोणावर हात टाकला नव्हता, तरी आतां मात्र त्या अवमानात ती सणसणत होती.

पण त्याच वेळीं संतापानें तिच्या डोळ्यात पाणीहि उभें राहिलें होंत या असल्या सतापाची कल्पना नसल्यामुळें मॅडमला तिच अवमान आपण ओळ-खल्याभारख वाटल. "हा, हा !" ती खदखदून हासत म्हणाली, ' अहो

शेंदाड शिपाई ' कळलं बर आपलं अवमान ' मी डॉक्टरांनाच हाक मारतें आतां " नि मग आपला आवाज चढवून तिनें हांक मारली, ' सिटिझन डॉक्टर ' मिसेस एव्हरमांड ' ए एव्हरमॉंडच्या पोरी ' मी सिटिझनेस डेफार्ज पुकारतें आहे, कुणीहि बोला, हे खत्रुड खेरीज करून ' "

आणि मग कशावरून तरी, मुळीच उत्तर न मिळाल्यानें किंवा मिस प्रॉसच्या चेहेऱ्यावरील कांहीं विकारछटामुळें तीं सर्व पळून गेलीं असावी म्हणून तिला शंका आली आणि तिन्ही दारें झपाझप उघडून तिनें आंत डोकावून पाहिलें

" या साऱ्या खोल्या अस्ताव्यस्त दिसताहेत, सामानसुमानहि काही घाई-घाईनें हलवलेलें दिसत आहे आणि खालीं पण पसारा दिसतो आहे चल उघड ती खोली, कोणी नाहीं आहे त्यांत ' उघड लौकर "

" कधींहि नाहीं ' ' तिच्या त्या एकदर अवतारावरून तिचा तो प्रश्न ओळखून मिस प्रॉसनें उत्तर दिले मॅडम डेफार्जलाहि तिचे उत्तर तितक्याच स्पष्ट-पणें कळलें.

" तीं जर आत नसलीं त्या खोलींत, तर असतील तेथून खेचून आणतां येतील की " मॅडम आपल्याशींच पुटपुटली

" पण नक्की कळेपर्यंत काय करणार ग तू बया " मिस प्रॉसहि आपल्या-शींच पुटपुटली " आणि तें तर मी तुला कळू द्यायची नाही काही झालं तरी, आणि कळलं किंवा न कळलं तरी इथून तुला मी अशी जीवन असेपर्यंत जाऊ देईन होय ' "

" अशा सत्राशें पाहिल्या आहेत तुझ्यासारख्या आतापर्यंत कुणींच नाहीं मला अडवू शकलं आतापर्यंत — सारे फाडुन तुकडे तुकडे करीन तुझ्या सर्वां-गाचे, पण तुला त्या दारापासून दूर खेचल्याशिवाय नाहीं राहणार मी," मॅडम त्वेषानें म्हणाली

" सामना आहे आता आपला दोघींचाच बर का, बयाबाई, आपली जागा आहे अगदीं एकांतातील नि रस्ते झाले आहेत सारे निर्मनुष्य. ईश्वरानें आता मला शक्ति मात्र द्यावी की पहाते मग मी तुझा समाचार इथे तुझा मोडलेला एकेक क्षण म्हणजे माझ्या त्या बाईला नुसता पृथ्वीमोलाचा आहे, " मिस प्रॉस म्हणाली.

मॅडम डेफार्जनें एकदम पुढें चाल केली. मिस प्रॉसनें एक क्षणाचाहि विचार

न करतां जशी कांहीं उपजत बुद्धीनेंच तिच्या कमरेला दोन्हीहि हातांनीं विळखा घालून तिला घट्ट दाबून धरलें. मॅडम डेफार्जनें अतिशय त्वेषानें तिची मिठी सोडवण्याचा प्रयत्न केला. पण हाताची पकड इतकी वज्रासारखी घट्ट बसली होती कीं तिला आपले हात हलविणेंहि मुष्कील होऊं लागलं कारण प्रेमाचं सामर्थ्य हें द्वेषसूडाच्या सामर्थ्यापेक्षां अधिक पोलादी असतं आणि त्याच प्रचंड, चिवट सामर्थ्यानें मिस प्रॉस तिला आवळून धरीत होती. त्यांच्या त्या झटापटींत मॅडम डेफार्जला तिनें जवळजवळ अल्लाद वर उचललें. तिचे क्रूर हात, मुक्तबंध आपल्या वज्रमुष्टींचा प्रहार मिस प्रॉसच्या आंगावर, मस्तकावर सारखे करीत होते, तिचीं बोटें तिचं तोंड बोचकारीत होतीं, पण आपली मान पार खालीं घालून, तिच्या कमरेला, तुटून तुटली नसती इतक्या विलक्षण चिकाटीनें, एखाद्या जळूसारखी मिस प्रॉस तिला चिकटली होती.

आस्ते आस्ते मग मॅडमच्या हातांचा वेग मंदावला आणि ते हात आपल्या हत्यारासाठीं आपला कमरबंद चाचपू लागले. "माझ्या हाताखालीं आहे तो," घुसमटलेल्या आवाजात मिस प्रॉस म्हणाली "तुला नाहीं काढतां येणार तो. माझी ताकद तुझ्याहून जास्त आहे खास. माझ्या या हातात परमेश्वरानं आता वज्राचं सामर्थ्य उत्पन्न केलं आहे एक तू किंवा मी कोणाचा तरी खालीं इथे मुडदा पडल्याशिवाय, माझी ही मिठी सुटणार नाहीं, त्यानंतर ठेव !"

मॅडम डेफार्जचे हात आपल्या छातीजवळ गेले. मिस प्रॉसनें वर पाहिलें नि तिच्या हातात तें काय आहे तें दिसतांच तिनें त्या हातावर जबरदस्त तडाका दिला, ठो असा एकदम धडाकून आवाज होऊन कांहीं तरी लाल चमकलें नि कानठळ्या बसून नि धुरानें आंधळी होऊन ती एकटीच तिथें आतां उभी राहिली.

हें सारं कांहीं एका क्षणातच घडलं. सभोंवार परत एकदां निगूढ शान्ता पसरून धूर हळूहळू हवेंत दिसेनासा झाला जणु काय आता खालीं पसरलेल्या त्या निष्प्राण देहातील राक्षसी क्रूर आत्मा हळूच बाहेर निघून जाऊन दिसेनासा झाला होता

भीतीनें आंगावर शहारे देत मिस प्रॉसनें तो मृत देह दूर ढकलला नि भीतीच्या त्या पहिल्या क्षणांत ती तडक खालीं कोणाला तरी हाक मारीत धांवत गेली. आसपास कुणीच नव्हतें. पण तरीहि आपण काय करतों आहोंत

याची जाणीव होऊन तिनें स्वतःला आवरलें नि ती परत फिरली. पण आतां त्या घरांत परत प्रवेश करणं तिला अतिशय भयप्रद वाटत होत. तरीहि पण कशी तरी आत जाऊन त्या मृत देहाच्या जवळच असलेली आपली टोपी नि इतर सामान घेऊन मॅडमच्या त्या देहाकडे न पाहता ती बाहेर आली. दाराला कुलूप लावून नि ती किल्ली घेऊन ती खालीं आली आणि चारदोन क्षण विश्रांतीसाठीं धापा टाकीत स्वस्थपणें पायरीवर बसली आणि मग डोळे पुसून ती उठली नि तशीच घाईघाईनें बाहेर रस्त्यावर आली.

तिच्या सुदैवानें तिच्या बॉनेटला झिरझिरीत पडदा होता म्हणून ठीक नाहीं-तर तिच्या त्या अस्ताव्यस्त स्थितींत रस्त्यानें चार पावलेंहि लोकांच लक्ष वेधल्याशिवाय जाणं तिला अशक्य होत आणि सुदैवानें तिचा एकदर अवतारच पुरुषी नि राकट, नि त्यांतून आतां वृद्धावस्थेमुळें अधिकच विरूप झाला असल्यानें, रस्त्यानें तस जाणं तिला कठीण गेलं नाहीं नाहींतर तिचे केस अस्ताव्यस्त, पोशाक विस्कळीत नि ओढाताणींत काहीं ठिकाणीं फाटलेला आणि तोंडावर त्या वाघिणीच्या नखानें उठलेले ओरखडे, यानीं लोकांचं लक्ष तिच्याकडे गेल्याशिवाय राहिलं नसतं पण या सर्वांची तिनें घाईघाईनें केलेली साफसुफ तिच्या थोडीफार उपयोगी पडली आणि लोकहि कांहीं वेगळ्याच मन स्थितींत रस्त्यानं चालले होते

नदीच्या पुलावरून जातांना आपल्या हातांतील किल्ली तिनें खालीं पाण्यांत फेकली पण ही किल्ली जाळ्यात पडून कोणाला सापडली तर, आणि ती घेऊन तिनें तें दार उघडलं तर, किंवा आंत खोलीतला तो मृत देह कुणी पाहून आपल्याला पॅरिस सोडतांनाच अटक करून तुरुंगात नेऊन डांबलं तर, आणि मग तो खुनाचा आरोप आपल्यावर जर ठेवला --' तिच्या मनात विचार येत होते पण पाऊल मात्र अपाय्यांने आपल्या इष्ट स्थळाच्या दिशेनें सारखं पुढंच पडत होतं. ती प्रार्थनामंदिराजवळ येऊन एकदोन सेकंद होतात न होतात तोंच जेरी गाडी घेऊन हजर झाला. नि ती आंत बसतांच गाडी दौडूहि लागली.

"रस्त्यावर कसला आवाज चालला आहे का, जेरी?' तिनें विचारलं

"नेहमींचेच आवाज चालले आहेत कीं," त्या तिच्या प्रश्नानें आणि तिच्या एकंदर अवतारानें चकित होऊन जेरी म्हणाला

" काय म्हटलस तूं ? मला ऐकू नाहीं आल."

त्या बिचाऱ्यानें पुन पुन्हां आपण काय म्हटल तें तिला सांगितल. पण तिला कांहींच ऐकूं येत नव्हत " बर तर, मी आता मान हलवून तिला खुणेनें सांगतों, म्हणजे तर कळेल." चकित होऊन तो म्हणत होता, आणि तिलाहि तें कळल.

"आता तरी चालला आहे का काहीं आवाज ?" कांही वेळानें तिनें पुन्हा विचारलें.

परत त्यानेंहि मान हलवून खूण केली

" मला नाहीं कांहीं ऐकू येत."

" एका तासात बहीरी झाली ?" अस्वस्थ होऊन जेरी पुटपुटला " काय झाल तरी काय हिला ?"

" मला वाटत कीं कांही तरी माझ्यापुढें एकदम लक्कन चमकल नि कसला तरी धडाका उडाला. आणि तो धडाकाच मला शेवटचा ऐकू आला, असं वाटत आहे मला."

" कांहीं ग्यायली बियली तर नाहीं ना हो, आपल्याला भीति वाटू नये म्हणून ?" अधिकच घाबरून जेरी म्हणत होता. " ऐका ' तो पहा त्या भयकर गाड्यांचा आवाज घुमतो आहे ' आल ऐकू मिस ?"

" मला काहींहि ऐकायला येत नाहीं," आपल्याला तो कांही सांगतो आहे अस वाटून ती म्हणाली " अरे बाबा, केवढ्यानें धडाका झाला तो नि मग अस काहीं सगळ मेल्यासारख शात झाल कीं मला वाटत तीच निगूढ स्मशान-शांतता माझ्या जन्मांत आता कायमचीच रहायची आहे."

" आता इतका जवळचा नि असला यमराजाच्या वाजत असलेल्या ढोला-सारखा हा भीषण आवाज जर नसेल ऐकू येत, तर आतां जन्मांत तिला दुसरं कांहींच ऐकू येणार नाहीं, मला वाटत." तिच्याकडे पहात जेरी म्हणाला.

आणि साऱ्या जन्मांत तिला मग नाहींच कांहींहि ऐकू आल. ती ठार बहिरी झाली होती.

.... १५ ..

पॅरिसच्या राजरस्त्यांवरून मृत्युरथाची ती अवजड धुड, आपल्या प्रचंड चाकांचा खडखडाट करीत नि तो कर्णकटु आवाज दशदिशा घुमवीत, सथपणें चालली होतीं त्या प्रचंड खडखडाटानें रस्त्यावरील दुतर्फा इमारती जशा कांहीं हादरत होत्या, आणि लोकांच्या आरडाओरडयानें सारा आसमंत दुमदुमत होता आपल्या विक्राळ जबडयातील भक्ष्य घट्ट धरून त्या सहा गाडया धडधडत चालल्या होत्या देवी करालेचा — ला गिलोटीनचा नैवेद्य बळी तिच्या पायांजवळ नेला जात होता नि त्या नरबळीच्या ग्रासानें ला गिलोटीन आजच्या-पुरती शांत होणार होती.

जगाच्या प्रारंभकालापासून उदय पावलेले सर्वभक्षक बकासुर आज जसे कांहीं त्या एकट्या ला गिलोटीनमध्ये केंद्रित झाले होते आणि तिची भूक कांहीं काळ तरी अशीच वखवखलेली राहणार होती. या असंख्य नरबळींच्या यज्ञानें तिची भूक कालांतरानें शांत होणार होती. तरीहि जगातील मानवी जीवन मात्र कायमचं सुधारलं जाणार नव्हतं जगाचा हा क्रम असाच परत आपली पुनरावृत्ती करीत पुढें चालू राहणार होता. क्रांतीच्या असल्या असंख्य आवृत्त्या आत्तापर्यंत या भूमातेनें पाहिल्या होत्या आजहि ती क्रांतीची ताजी आवृत्ति पहातच होती आणि पुढंहि ती तशीच पहाणार होती मनुष्यप्राणी हा अनुभवानें शहाणा कधीच होत नाहीं क्षणिक स्मशानवैराग्य त्याला अनेक वेळां आलेलं आहे. तरीहि लोकस्वातंत्र्याच्या संवर्धनासाठी, असंख्य जुलमी सत्ताधीशांचं रक्त, स्वातंत्र्यवृक्षावर त्याला वारंवार सिंचावंच लागतं. आणि भूमातेला मानवी रक्तानें सचैल स्नान घालावं लागतं. कांहीं काळ मग तिची तहान शमते, नि सर्व कांहीं सुरळीत चालू रहातं पण परत समाजपुरुष आपल्या जातीवर जातोच, भूमातेला रक्ताची तहान लागतेच, मनुष्य मनुष्यत्व विसरून, — अंत-रंगांतील सर्व कोमलभावनांना विसरून क्रूर पिशाच्च बनतो आणि कालकालीचा भैरव नाच पृथ्वी पाठीवर परत एकदां सुरू होतो जगाचं हें रहाटगाडगं, काल-चक्राचे हे फेरे असेच शतकानुशतकें, ठराविक अंतरानें पुनरावृत्ती करीत चालत आलेले आहेत. जगावर रामराज्य स्थापन होऊन टिकत नाहीं आणि 'संभ-वामि युगे युगे,' ही आपली प्रतिज्ञा विश्वाच्या त्या नियामक शक्तीला नेहमीं

पुरी करावी लागते. मत्युरथांचा धडधडाट तसाच एकाच दिशेनें अटळ असा चाललाच आहे.

त्या अजस्ररथांची ती दौड त्या राजरस्त्यावरून जात असतां, एखाद्या प्रचंड नांगराच्या फाळाने खालीं खोल शिरून वर उफाळून फेकलेल्या मातीच्या ढेंकळांसारखा, रस्त्यांवरील तो मानवी समुदाय दुभंग होत होता, नि तो प्रचंड फाळ पुढें चालला होता सभोंवार लोकांचे दैनदिन उद्योग नित्याप्रमाणें चालूच होते. रस्त्याच्या बाजूच्या घरांतील गवाक्ष कोणत्याहि लोचनांनीं कुवलयित होत नव्हते. त्या नित्य परिचित अशा दृश्यार्चे कुणाला कौतुक वाटत नव्हत. पण मधूनच काहीं ठिकाणी मात्र पॅरिसमधील पाहुणे गर्दी करून उभे राहून त्या गाड्यांकडे टवकारून पहात होते आणि कोणीतरी त्या गाड्यांतील कोणाकडे तरी बोट दाखवी आणि त्या सर्वांच्या माना मग त्या एकाच व्यक्तीकडे वळत.

मृत्युरथांतील, या क्षणभंगुर जगांतील आतां ते क्षणजीवि मुशाफिर आपल्या सभोंवारच्या त्यांना आतां परत कधींच न दिसणाऱ्या दृश्याकडे स्वस्थपणें पहात होते. त्यांना त्या दृश्यांत कांहींच स्वारस्य वाटत नव्हत खालीं मान घालून कांहींजण आपल्याच उदास विचारांत गढून गेले होते, तर काही, त्याहि वेळीं आपण जसे काहीं एखाद्या नाट्यमंदिरांत किंवा नृत्यमंदिरात वावरत असल्या-सारखे, बेगुमान कुतूहलानें त्या भोंवतील जनसमर्दाचें निरीक्षण करीत होते. कांहीं गंभीरपणें आपले डोळे बंद करून घेऊन आपली वृत्ती अंतर्मुख करीत बसले होते. पण मात्र कुणी एकहि जीव त्या सभोंवारच्या समाजपुरुषाकडे मूक लाचारीनें सुद्धां पहात नव्हता सारे जण एकच धीरगंभीर वृत्तीनें मृत्यूला सामोरे जात होते!

पण लोकाची विशेष गर्दी मात्र तिसऱ्या नंबरच्या मृत्युरथाच्या भोंवती सारखी होत होती. एकच प्रश्न त्या रथरक्षकाना पुन पुन्हा विचारला जात होता नि एकाच व्यक्तीकडे हस्तनिर्देश परत परत केला जात होता. त्या सर्वांचं कुतुहल बनलेली ती व्यक्ति रथाच्या मागच्या बाजूला उभी होती. आपल्या-जवळच रथाच्या कठड्यावर बसलेल्या एका पोरसवदा स्त्रीचा हात धरून, खालीं मान घालून स्वस्थपणें तो बोलत उभा होता. सभोंवारच्या दृश्याकडे त्याचं लक्ष जात नव्हत कीं त्याला त्याची फिकीर वाटत नव्हती. त्या तरुण स्त्रीशीं त्याचं संभाषण शांतपणे चालू होतें. मधून मधून होत असलेला त्याच्या नांवाचा

गालिप्रधान उल्लेख त्याच्याहि कानावर पडत होता. पण किंचित् हंसून नि आपली मान हलवून आपले केस अधिक अस्ताव्यस्त करण्यापलीकडे त्या ओरड्याची दखल तो घेत नव्हता. त्या स्त्रीचा हात धरून त्याच सभाषण शांतपणें चालू होतं.

एका प्रार्थनामंदिराच्या पायरीवर बारसाड आपल्या दोनचार सोबत्यांसह कुणाची तरी उत्सुकतेनें वाट पहात उभा होता प्रत्येक गाडींत तो डोकावून पहात होता, पण त्याला अपेक्षित असलेली व्यक्ति त्याला अजून सांपडत नव्हती. 'म्हणजे माझा गळा सफा कापला कीं काय या बेट्यानें '' तो स्वत शींच बोलत होता पण ती तिसरी गाडी त्याच्या समोर येतांच त्याचा चेहेरा उजळला

" कोणता रे एव्हरमॉड यांतला ? " त्याच्या एका सोबत्यानें विचारलें.

" तो, गाडीच्या मागच्या बाजूला "

" कोणता, त्या पोरीचा हात धरलेला ? "

" होय, तोच "

" एव्हरमॉडच निमतान होवो ! माज्या शेटजीभटजींच पार निमतान होवो ! एव्हरमॉडचा नायनाट होवो ! "

' अरे, अरे, गप ' " अजीजीच्या स्वरांत बारसाड आपल्या त्या दोस्ताला म्हणाला

" काय म्हणून गप बसू ? "

" अरे, आपल्या कर्माचीं फळ तो भोगणारच आहे, आतां काय चारदोन क्षण फक्त उरले मिळू दे तेवढी शांति त्याला '

पण त्याच्या दोस्ताचा शखध्वनि चालूच राहिला. एव्हरमॉडचा चेहेरा एक क्षणभर त्याच्याकडे वळला त्याची दृष्टि बारसाडकडे गेली: त्यानें त्याच्याकडे एक क्षणभरच नीट टक लावून पाहिलें आणि गाडी पुढें झाली.

शेवटची गाडी गिलोटिनच्या आवारांत शिरली आणि तीनचे ठोके पडण्यास सुरुवात झाली लोकांचा तो प्रचड जमाव आतां गिलोटीनभोंवतीं लाटांसारखा हेलावू लागला. सर्वांच्या पुढें खुर्च्या टाकून, हवा खाण्यासाठीं एखाद्या सुदर प्रशस्त उद्यानांत बसल्यासारख्या, शांतपणें हातांतील विणकाम करीत कांहीं स्त्रिया विराजमान झाल्या होत्या अगदी पुढल्याच खुर्चीवर कराला आपल्या मैत्रिणीची वाट पहात बसली होती तिचे डोळे मॅडमची मूर्ति धुडीत अस्वस्थपणें चौफेर गिरगिरत होते

" थेरेस ! " कर्कश आवाजांत तिने आरोळी दिली. " थेरेस डेफार्ज ' कुणी पाहिली आहे का तिला ? "

" आज कुठें गेली ही, आजपर्यंत चुकली नाहीं ती कधीं यायला, " तिची जोडीदारीण म्हणाली

" छे ग, पण आजसुद्धा नाही चुकायची ती." काली काहींशी चिडुन म्हणाली. " थेरेस — थेरेस ! "

ओरड, ओरड, अगदी घसा फाटेपर्यंत ओरड बर बया, पण तुझी थेरेस आतां परत नाहीं यायची ! कांहीहि केलस, जीवाचा अगदी आटापिटा केलास, सारीं सप्तपाताळ जरी आता उलथीपालथी घातलींस, तरी थेरेस आता परत येणार नाही नाही — या जगात कधींच परत येणार नाहीं !

" काय करावं आतां ! " आपला पाय आपटीत काली ओरडली " या गाड्या तर साऱ्या आल्या ! आतां कसा चुटकीसरसा तो एव्हरमॉड खतम होईल, नि ती इथं नाहीं ! ही तिची खुर्चीसुद्धा राखून ठेवली आहे नि तिचं हें विणकामहि मी घेऊन आलें आहे पण तिचा पत्ता काय ! किती करू आतां मी कठशोष ! — थेरेस ! "

मृत्युरथ आपले बळी खालीं उतरीत रिते होत होते सेंट गिलोटिनचे सर्वाधिकारी हात सरसाऊन तयार झाले होते. खाड ! — रक्त ठिबकत असलेलं एक मस्तक उंच केलं होतं आणि हातातील विणकामावरून त्या बायाचे डोळे वर न होताच एकाचा आंकडा मोजला गेला

दुसरा रथ रिता होऊन निघून गेला, तिसरा पुढें झाला खाड ! — आणि त्या बायांनीं आपला हात न थांबवतां दोनचा आंकडा मोजला

तो एव्हरमॉडचा अवतार खालीं उतरला नि त्याच्या पाठोपाठ ती पोरसवदा शिंपीण खालीं उतरली गेली तिचा हात त्यानं वचन दिल्याप्रमाणें अजून त्याच्याच हातांत होता. त्यानें अतिशय हळुवारपणें तिची पाठ, खाड खाड असा आवाज करीत मस्तकें धडावेगळीं करीत असलेल्या गिलोटिनकडे केली. तिनें कृतज्ञपणें त्याच्याकडे पाहिलें

" तुमचा जर धीर नसता मला पाहुणे, तर इतकं शांत मला आज कधींच वाटलं नसतं. अगदींच दुबळ आहे माझं हें हृदय, पण त्या दयाघन परमेश्वरानेच तुमच्यासारख्या एका अपरिचित गृहस्थाला माझ्या मदतीला पाठवलं,

नाहींतर, अशा या आता शेवटच्या घटकेला त्याची आठवण मला नसती झाली."

"किंवा तुला माझ्या मदतीला," सिडने म्हणाला "अशी माझ्याकडेच पहात रहा, बाळ ! नि दुसरा कसलाहि विचार करू नको."

"तुमचा हा हात असा मी धरला असता दुसरा कसलाहि विचार मनांत उत्पन्नच व्हायचा नाहीं आणि जर त्यांनीं सार झटपट उरकल तर तुमचा हात सोडतांना मला काहीं वाटणार नाहीं"

"उरकतील — उरकतील धर झटपट, अगदीं भिऊ नको !"

त्याच्या बाजूची नरवळींची संख्या कमीकमी होत होती पण तीं दोघ तिथें एकटीं असल्यासारखींच एकमेकाशीं शांतपणें बोलत होतीं एकमेकाला पूर्ण अपरिचित, एकमेकाशीं अतिशय विसदृश अशीं त्या जगन्मातेचीं तीं दोन बालकें, डोळयाला डोळा, आवाजाला आवाज, हाताला हात नि हृदयाला हृदय अशीं त्या स्वर्गसोपानद्वाराशी, आत स्वर्गमंदिरात प्रवेश करून तिच्या अंकावर विश्रब्धपणें पडुण्यासाठीं, शांतपणें तिथें उभी होतीं

"माझ्या उदार हृदयी शूर मित्रा, तुला एक प्रश्न विचारू ? मी अतिशय अज्ञानी आहे — करशील माझं तू समाधान ?"

"विचार, विचार"

"माझी एक चलत बहिण आहे पोरकी आहे बिचारी, माझ्याचसारखी ! नि तशीच अगदी गरीब किती, किती आवडते पण ती मला पाचसहा वर्षांना लहान आहे माझ्यापेक्षां ती आणि दूर तिकडे दक्षिणेला एका खेडयात ती असते तिला विचारीला कांहीं कांहीच पत्ता नाहीं लागायचा हा — आणि मला तिला पत्रहि नाहीं पाठवता येत. नि आता असत तरी तिला सांगायच तरी काय ! त्यापेक्षा आहे तेंच बर नाहीं ?"

"खर आहे. अज्ञानातच सुख आहे !"

"आतां असा येता येतां विचार आला मनांत — नि तुमच्या या वत्सल, धीरगंभीर चेहेऱ्याकडे पाहिल कीं आत्तांहि तो येतो आहे की, ही क्रांति आमच्यासाठीं जी एवढ मोठं कराला निघाली आहे, सगळ्यांना पूर्ण सुखी करणार आहे, त्या तिच्या अमदानीत माझी बहीण खूप खूप जगेल नाहीं ? अगदीं म्हातारी होइपर्यंतसुद्धां जगेल नाहीं ?"

"तर मग काय बाळ?"

"मग तिथे मला तिची वाट पाहून कंटाळा नाहीं ना येणार, आपण दोघं तिथें गेल्यावर? कंटाळवाणे नाहीं ना वाटणार मला ते दिवस?" तिचे आता-पर्यंत धीरानें बोलणारे डोळे पाण्यानें भरले होते नि ओठ आता थरथरत होते

"तस नाहीं व्हायचं पर बाळ, तिथें काळ वेळ काहीं नि काहींच नाहीं"

"किती धीर देत आहांत मला तुम्ही! मी आपली वेडी भाबडी आहे झाली का आतां वेळ? मी [illegible] आता?"

"हं!"

तिनें आपले ओठ त्याच्या मुखावर टेकले नि त्यानेंहि आपले ओठ तिच्या ओठावर ठेवून त्यांचें हळुवारपणें चुंबन घेतलें, दोघांनीहि गंभीरपणें एकमेकांना आशीर्वाद दिला. त्यानें तिचा हात सोडला. पण तो दुर्बळ क्षीण हात यत्किंचि-तहि कांपत नव्हता, नि तिच्या त्या प्रशांत शांत चेहऱ्यावर [illegible] हास्य मुग्ध चांदण्यासारखं पसरलं होतं. तो त्याच्या जवळून दूर आला — [illegible] त्यांतला तो चिमणा जीव उडून दूर निघून गेला. आचार्यांनीं [illegible] बाविस म्हणून पुकार केला।

> "जगाचं पुनरुत्थान नि जीवन मीच आहे." भगवान म्हणाले "माझ्यावर अनन्य भाव ठेवणारा मरूनहि जग-तच असतो. माझा अनन्य भक्त सदा अमरच आहे — मृत्यूनंतरहि अमरच आहे"

असंख्य आवाज आतां वातावरणात घुमत होते, असंख्य चेहरे उत्कंठेनें वर माना करून पहात होते, त्या जनसमर्दाच्या काठावरील लाटा फुटफुटे भरत होत्या, आणि एकच प्रचंड महासागरी लाट आसमंतात आता उसळली होती

—— तं वी र.